


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






# अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २५३–एप्रिल-जून १९९०

(म. रा. साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत)

**संपादक : शंकर सारडा**
संपादक मंडळ : डॉ. गं. ना. जोगळेकर, डॉ. वीणा देव,
डॉ. वसंत सावंत, प्रा. चंद्रकुमार नलगे

**या अंकाची किंमत : १० रुपये**
वार्षिक वर्गणी (संस्थांसाठी : ४० रुपये)

मुखपृष्ठ : लक्ष्मीकांत तोष्णीवाल, पुणे

मुद्रक-प्रकाशक : राजा फडणीस, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०
मुद्रणस्थळ : स्मिता प्रिंटर्स १०१९, सदाशिव, पुणे ४११०३०
टाईपसेटिंग : प्रमोद वि. बापट, प्रमोद प्रिंटर्स, ११२०, सदाशिव पेठ, पुणे ३०.

अनुक्रमणिका

*म. सा. प. च्या कार्यकारिणीची बैठक आळंदी येथे घेऊन, ज्ञानेश्वर मंदिर ट्रस्ट व म. सा. प. यांनी काही उपक्रम संयुक्तपणे साजरे करावेत अशी कल्पना मांडली. ती स्वीकारण्यात आली असून, त्यानुसार व्याख्यानमाला वगैरेंची आखणी चालू आहे.*

*म. सा. पत्रिकेचा एक अंक ज्ञानेश्वरी विशेषांक म्हणून काढावा अशीही सूचना या बैठकीत करण्यात आली. ७७ साली पत्रिकेने काढलेला ज्ञानेश्वर अंक गाजलेला होता. ज्ञानेश्वरीवर नवा प्रकाशझोत टाकणारे लेखन मिळाले तर असा विशेषांक पुन्हा काढण्यासही हरकत नाही. -रा. कृ. धोंगडे (सातारा) आणि वैकुंठवासी रा. ना. सराफ (बेळगाव) यांचे दोन लेख या अंकात दिले आहेत. धोंगडे यांचा दृष्टिकोण ज्ञानेश्वरीची पाठशुद्धी करण्याचा असून त्यासाठी गेली तीस वर्षे ते सतत अभ्यासमग्न आहेत. त्यांची भूमिका वादविषय होऊ शकेल हे स्पष्टच आहे. परंतु त्यांचे लेखन प्रसिद्ध होणे ही प्राथमिक गरज आहे. ज्ञानेश्वरीच्या संशोधित आवृत्तीच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे दरवाजे त्यांनी ठोठावले. परंतु तेथे त्यांची दाद लागली नाही असे ते म्हणतात. जर ज्ञानेश्वरीचा अन्वयार्थ अधिक नेटका व तर्क शुद्ध लावण्यासाठी धोंगडे यांचे संशोधन सहाय्यकारी होत असेल तर त्याची उपेक्षा होता कामा नये. रां. ना. सराफ यांच्या हयातीत त्यांची ज्ञानेश्वर, अमृतानुभव व चांगदेव पासष्टी यावरील पुस्तके प्रसिद्ध झाली. परंतु त्याकडे विशेष कोणाचे लक्ष गेले नाही. १९८४ साली ते वैकुंठवासी झाले. त्यानंतर सहा वर्षांनी त्यांची अनुभवामृतावरील टीका प्रसिद्ध होण्याचा योग आला. मूळ त्यांच्या लेखनातील फक्त ओव्या व त्यांचे विवरणासह अर्थ एवढाच भाग ग्रंथरूपात घेतला तरी तो सव्वाचारशे पृष्ठांचा झाला. प्रत्येक प्रकरणाच्या आरंभीचे प्रास्ताविक निवेदन व शेवटचा निष्कर्षाचा भाग यांचा पुस्तकात समावेश केला गेला नाही. रा. ना. सराफ यांच्या या प्रास्ताविक– निष्कर्षाच्या भागात त्यांचे अध्ययन साररूपाने आले आहे. त्याची झलक दाखवण्यासाठी पहिल्या प्रकरणाच्या निष्कर्षाचा भाग या अंकात दिला आहे. डॉ. सदानंद मोरे प्रभृती ज्ञानेश्वरींच्या अभ्यासकांनाही साक्षात्कारी सराफांच्या निवदेनातील वेगळेपणा विलक्षण वाटतो; जाणकारांनी त्याकडे अवधान द्यावे असाच त्याचा अर्थ होतो. मधू पटवर्धन यांनी हे प्रकरण उपलब्ध करून दिले त्याबद्दल त्यांना धन्यवाद.*

*ज्ञानेश्वर हे मराठी भाषेच्या आद्यप्रणेत्यांपैकी आघाडीवरचे प्रतिभावंत. त्यांची पहिलीच झेप अशी नेत्रदीपक ठरली की आज सातशे वर्षे होऊनही, 'ज्ञानेश्वरी'ची मोहिनी व महत्ता यांना तुलना नाही. महाराष्ट्राच्या पिढ्यान्‌पिढ्या ज्ञानेश्वरीने घडवल्या. ज्ञानेश्वरांनी अवघ्या सोळाव्या वर्षी ज्ञानेश्वरी लिहिली; अमृतानुभवासारख्या ग्रंथातून आत्मसाक्षात्काराचा अलौकिक अनुभव शब्दांकित केला. एकविसाव्या वर्षी समाधी घेऊन आपले लौकिक पातळीवरचे अवतारकार्य संपवले. गीतेवरील टीका म्हणून, तत्त्वज्ञानात्मक ग्रंथ म्हणून, काव्य म्हणून ज्ञानेश्वरीकडे पाहताना दर वळी ती नवनवे उन्मेष धारण करते आणि रसिकांना गुंग करते. अध्यात्माचे विवेचन करताना दैनंदिन*

*व्यवहारातले चपखल अनुभव दृष्टान्तासाठी वापरून ऐहिक जीवनाचीही मूल्यप्रणाली प्रस्थापित करते. 'एक तरी ओवी अनुभवावी' या त्यांच्या आर्जवी आवाहनामागचा त्यांचा आत्मविश्वास निश्चित सार्थ होता. ज्ञानेश्वरीची पारायणे नित्य सर्वत्र चालू असतात. शब्द आपले काम करीत असतात, पारायणे करणाऱ्यांच्या भावजीवनात ते किती खोलवर संस्कार करतात हेही ध्यानी घ्यायला हवे. शब्दांना मंत्रांचे सामर्थ्य येते ते केवळ पाठांतराने वा पारायणाने नव्हे, तर त्यामागचा आशयाचा गाभा आत्मसात केल्याने.*

## ६३ वे साहित्य संमेलन

*पुणे येथे ६३ वे अ. भा. मराठी साहित्य संमेलन उत्तम प्रकारे जानेवारीत संपन्न झाले. डॉ. यू. म. पठाण यांनी आपल्या सौजन्यशील स्वभावाने सर्वांना लोभावून टाकले. पुणे मराठी ग्रंथालयाच्या कार्यकर्त्यांनी व्यवस्था सर्व दृष्टींनी चोख ठेवली. भरगच्च कार्यक्रम, उत्तम भोजन व्यवस्था आणि ग्राहकांचा उदार आश्रय लाभलेले लक्षवेधक ग्रंथप्रदर्शन, यामुळेसंमेलन कसे असावे याचा एक वस्तुपाठच जणू समोर ठेवला गेला. सर्व कार्यकर्त्यांना आम्ही मनःपूर्वक धन्यवाद देतो. मराठी भाषेच्या अभिवृद्धीच्या दृष्टीने नव्या जागतिक क्षितिजांचे भान आवश्यक आहे. या संमेलनात त्याची थोडीफार चुणूक दिसली.*

## पुस्तकांचे दिवस

*मराठी पुस्तकांना बरे दिवस येत आहेत हे या संमेलनातील ग्रंथविक्रीवरून लक्षात येत होते. 'महाभारत'सारख्या संपूर्ण आर्टपेपरवर चौरंगी छापलेल्या पुस्तकाची प्रारंभिक घोषणा या संमेलनाच्या वेळीच करण्यात आली. तीनशे रुपये किंमत असूनही या पुस्तकाचा खप चांगला होत आहे. 'पानिपत'च्या तीनशेवर प्रती या संमेलनात विकल्या गेल्या हेही एक अद्‌भुतच! पानिपतच्या पाच आवृत्त्या दीड वर्षाच्या अवधीत निघाल्या आणि मराठीत खपाचा तिने उच्चांक निर्माण केला. त्यानिमित्ताने पानिपतचे प्रकाशक दिलीप माजगावकर यांनी जास्तीत जास्त ग्रंथविक्री करणाऱ्या विक्रेत्यांचा सन्मानचिन्हे देऊन सत्कार केला. ग्रंथविक्रेत्यांना मानचिन्हे देण्याचीही कल्पना निश्चितच नावीन्यपूर्ण होती. गावोगावी जागरूक ग्रंथविक्रेते असले तरच मराठी पुस्तकांचा खप झपाट्याने होऊ शकेल. केशव भिकाजी ढवळे या नामवंत प्रकाशन संस्थेच्या कारभाराची सूत्रे नव्या पिढीकडे आली, त्यालाही २५ वर्षे झाली. त्या निमित्त मुंबईत झालेल्या समारंभातही ग्रंथविक्रेत्यांचा सत्कार करण्यात आला. धनंजय ढवळे यांनी केशव भिकाजी ढवळे या संस्थेचा प्रचंड व्याप उत्तम प्रकारे सांभाळला; नव्या योजनाही राबवल्या. केशव भिकाजी ढवळे व सोन्याबापू ढवळे यांच्या नावे पारितोषिकेही सुरू केली. ढवळे ग्रंथयात्रेद्वारे रघुवीर ढवळे यांनी तीन वर्षांत अवघा महाराष्ट्र पिंजून काढला आहे आणि पुस्तके वाचकांपर्यंत पोचवण्याचे माध्यम चांगल्याप्रकारे विकसित केले आहे. इंद्रायणी*

साहित्यही यंदा रौप्यमहोत्सवी वर्षात पदार्पण करीत आहे. श्याम कोपर्डेकर यांनी गेल्या २५ वर्षात साडेचारशेवर पुस्तकांचे प्रकाशन करून, विक्रीचेही नवे आक्रमक तंत्र बसवले आहे. प्रकाशन व्यवसायाचे स्वरूप लोकाभिमुख असले तरच त्याला उर्जितावस्था येईल हे त्यांनी जाणले आहे. सुशीलकुमार शिंदे यांच्या हस्ते या रौप्यमहोत्सवी वर्षाचा नारळ फोडून शंकरराव खरातांची दोन पुस्तके मुहुर्तावर काढण्यात आली.

### प्रकाशक संमेलन

मराठी प्रकाशक परिषदेचे सहावे अधिवेशन मुंबईला दि. ३ जून रोजी साहित्य संघात मधुकाका कुलकर्णी यांच्या अध्यक्षतेखाली भरणार आहे. मधुकाकांची निवड या अधिवेशनासाठी होण्यात वेगळेच औचित्य आहे. गेल्या काही वर्षात दर आठवड्याला एक दोन प्रकाशने असा वेग ठेवून मधुकाकांनी आपला दरारा प्रस्थापित केला आहे. नवनव्या लेखकांना पुढे आणणे, नवनव्या कल्पना राबवणे, अनेकांना लिहिते करणे या दृष्टीने मधुकाकांनी मोठीच कामगिरी बजावली आहे. परदेशात मराठी पुस्तके नेण्यासाठी व परदेशातील मराठी लेखकांना प्रकाशझोतात आणण्यासाठी मधुकाकांनी परदेशातही प्रकाशन समारंभाचे योग जुळवून आणले. परखडपणे मते मांडण्यातही ते कधी कसूर करीत नाहीत. त्यामुळे त्यांच्या अनुभवांचे सार मराठी प्रकाशकांना या अधिवेशनाच्या निमित्ताने अनायासे उपलब्ध होणार आहे. या अधिवेशनाला आमच्या शुभेच्छा.

### दूरदर्शनवर पुस्तक परिचय

दूरदर्शनवर नाट्यावलोकनासारखा मराठी पुस्तकांचे परिचय करून देणारा एखादा कार्यक्रम नियमितणे व्हावा अशी मागणी साहित्य संमेलनांतून व प्रकाशक परिषदेकडून सातत्याने केली जात होती. त्या प्रयत्नांना आता यश लाभेल असे दिसत आहे. नव्या मराठी पुस्तकांच्या परिचय करून देणारा एक कार्यक्रम 'शरदाचे चांदणे'मध्ये मे अखेरीस होणार आहे. दर तीन महिन्यांनी असे कार्यक्रम होत राहतील असे सांगण्यात येत आहे. खरे म्हणजे हा कार्यक्रम दरमहा हवा. वाचक-रसिक-प्रेक्षकांनी दूरदर्शनवर पत्रांचा पाऊस पाडून हा कार्यक्रम दरमहा असावा अशी मागणी करावी. या कार्यक्रमाला हिरवा कंदील दाखवल्याबद्दल मुंबई दूरदर्शन केंद्राच्या प्रमुखांना मनःपूर्वक धन्यवाद द्यायला हवेत.

### कुसुमाग्रज प्रतिष्ठान

ज्ञानपीठ पुरस्कारविजेते कविवर्य कुसुमाग्रज यांची कर्मभूमी म्हणजे नाशिक. तेथे त्यांचा भव्य सत्कार करण्यात आला. कुसुमाग्रजांना निवासस्थान प्रदान करण्यात आले. जनस्थान साहित्य पुरस्कार हा ज्ञानपीठाच्या धर्तीवरील एक लाखाचा पुरस्कार कुसुमाग्रज प्रतिष्ठानतर्फे देण्याची योजना आहे. शिक्षण, ज्ञान, विद्या इ. क्षेत्रातील व्यक्तींना प्रत्येकी

*१० हजाराचे ५ पुरस्कार देण्याचाही या ट्रस्टचा मानस आहे. पंचवीस लाखांचा निधी गोळा करण्याचा संकल्प सोडण्यात आला आहे. या सर्व कल्पनांना भरघोस प्रतिसाद निश्चित मिळेल.*

### आनंदे साधले : सत्तरी

*आनंद साधले यांच्या वयाला ७० वर्षे पूर्ण झाली. हा जय नावाचा इतिहास आहे, मातीची चूल, आनंदध्वजाच्या कथा वगैरे त्यांची पुस्तके गाजलेली आहेत. 'महाराष्ट्र रामायण' या त्यांच्या लेखनावर खूष होऊन डॉ. रा. ना. दांडेकर यांनी साधले यांना 'महाकवी' म्हटले आहे. सत्तरी ओलांडल्याचे निमित्त साधून पुण्याला मॅजेस्टिक गप्पांच्या वेळी त्यांचा सत्कार केला गेला.*

### पॉप्युलरचे कविता वर्ष

*पॉप्युलर प्रकाशनने हे वर्ष कविता वर्ष म्हणून साजरे करण्याचे ठरवले आहे. पॉप्युलरने गेल्या ३५ वर्षात १०० कवितासंग्रह प्रसिद्ध केले. ना. धों. महानोर यांचा 'प्रार्थना दयाघना' हा पॉप्युलरचा शंभरावा काव्यसंग्रह आहे. त्याचे प्रकाशन मार्चमध्ये झाले. यंदा १२ नवीन काव्यसंग्रह व १२ पुनर्मुद्रणे असा दणदणीत प्रकाशन कार्यक्रम आहे.*

### कर्तृत्वाला मुजरा

*मराठी माणसाच्या कर्तृत्वाला भारतीय पातळीवर मान्यता मिळाली की आनंद वाटतोच. महाराष्ट्रातील अग्रगण्य विनोदकार पु. ल. देशपांडे यांना भारत सरकारने पद्मभूषण देऊन गौरविले. लोकसत्ताचे झुंजार संपादक माधव गडकरी यांनाही पद्मश्री बहाल करण्यात आली. स्वरसम्राज्ञी लता मंगेशकर यांना ७ मे रोजी दादासाहेब फाळके अॅवार्ड हा चित्रपट सृष्टीतील सर्वोच्च सन्मान देण्यात आला. मराठवाडा दैनिकाचे संपादक अनंतराव भालेराव यांना उत्कृष्ट व निर्भीड पत्रकारितेबद्दल बी. डी. गोएनका पुरस्कार देऊन सन्मानित करण्यात आले. कलकत्त्याच्या भारतीय भाषा परिषदेने ज्योत्स्ना देवधर यांच्या 'रमाबाई'ची निवड दहा हजारांच्या पुरस्कारासाठी केली. शिवाजी विद्यापीठाच्या मराठी विभागाचे प्रमुख डॉ. गो. मा. पवार यांची आदर्श अध्यापक पुरस्कारासाठी निवड करण्यात आली.*

*श्री बडाबाजार कुमारसभा पुस्तकालय या कलकत्त्याच्या संस्थेने ज्येष्ठ संस्कृत-मराठी-हिंदी भाषातज्ज्ञ डॉ. श्रीधर भास्कर वर्णेकर यांना डॉ. हेगडेवार प्रज्ञा पुरस्कार दिला. २१ हजार रुपयांचा हा पुरस्कार आहे. डॉ. वर्णेकरांची २० संस्कृत, ४ मराठी व ३ हिंदी पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. शिवराज्योदयम् या संस्कृत महाकाव्याबद्दल १९७४चा अकादमी पुरस्कारही त्यांना मिळाला होता.*

*कर्तृत्वशाली मराठी व्यक्तींना भारतीय पातळीवर मिळणारी ही मानमान्यता आपणा सर्वांनाच अभिमानास्पद आणि सुखद वाटणारी आहे. या सर्वांचे हार्दिक अभिनंदन.*

*अनेक मराठी लेखकांना इतरही पुरस्कार लाभले आहेत. त्या सर्वांचीच नोंद करणे येथे अभिप्रेत नाही. परंतु काहींचा सहज निर्देश करता येईल.*

*'स्वातंत्र्यसंग्रामाचे महाभारत'बद्दल ग. प्र. प्रधान यांना हेंद्रे रिसर्च फाउंडेशनने २५ हजार रुपयांचा पुरस्कार प्रदान केला. ही रक्कम सार्वजनिक कार्यासाठी वापरण्यात येईल अशी घोषणा प्रा. प्रधान यांनी केली.*

*फाय फाउंडेशन (इचलकरंजी) या संस्थेने दहा हजार रुपयांचा पुरस्कार 'मिळून साऱ्याजणी' मासिकासाठी संपादिका विद्या बाळ यांना दिला आहे.*

*बालकुमार साहित्य संमेलनाच्या वतीने देण्यात येणारा दिनकर लोखंडे पुरस्कार यावर्षी वि. म. कुलकर्णी यांना देण्यात आला.*

*पत्रकार-साहित्यिकांच्या ललित कृतीबद्दलचा जयहिंद प्रकाशन पुरस्कार गोमंतकचे संपादक नारायण आठवले उर्फअनिरुद्ध पुनर्वसू यांना प्रभंजन या महात्मा फुले यांच्यावरील कादंबरीबद्दल देण्यात आला.*

*शकुंतला जोग स्मृतिपुरस्कार प्रतिमा इंगोले यांना देण्यात आला. त्यांच्याच 'सुगरनीचा खोपा' या कथासंग्रहाला नी. स. गोखले पुरस्कार व 'जावयाचं पोर'ला (परिवर्तनवादी साहित्याबद्दलचा) नागसेन पुरस्कार मिळाला.*

*मॅजेस्टिक बुकस्टॉलचा केशव कोठावळे पुरस्कार 'प्रस्थान' या कथासंग्रहाबद्दल ज्ञानेश्वर नाडकर्णी यांना देण्यात आला.*

*हरी नरके यांच्या महात्मा फुले यांची बदनामी– एक सत्यशोधन या पुस्तकाला पुरोगामी विचारमंच (रत्नागिरी) पुरस्कार जाहीर करण्यात आला.*

*पीकपाणी (इंद्रजित भालेराव) यांना राहेमारे ग्रामीण काव्य पुरस्कार मिळाला.*

*या सर्वांचे अभिनंदन. पारितोषिकांची संख्या वाढत आहे. तशी गुणवत्ताही वाढायला हवी. नव्या लेखकांची भरारी उंच जायला हवी.*

**शंकर सारडा**
संपादक

# दत्तो वामन : एक ज्ञानदीप

## जन्मशताब्दीनिमित्त आदरांजली

म. श्री. दीक्षित

यंदा दोन महापुरुषांचे शताब्दी समारंभ महाराष्ट्रात साजरे होणार आहेत. महात्मा फुले आणि महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार.

५ ऑगस्टला दत्तो वामनांची जन्मशताब्दी तर २८ नोव्हेंबरला महात्मा फुले यांची स्मृतिशताब्दी आहे. या दोघांमध्ये दोन गोष्टींचे साम्य आहे.

समाजाभिमुख लोकशिक्षण हे दोघांच्या जीविताचे समान ध्येयसूत्र होते. त्या ध्येयासाठी लेखणी-वाणीद्वारे दोघेही अहर्निश राबले. दोघांची भाषा शुद्ध मराठमोळी, सरळ, भेदक आणि प्रभावी. 'समग्र फुले' या ग्रंथाची भाषा पहा किंवा 'श्रोते हो' हा पोतदारांच्या व्याख्यानांचा संग्रह वाचा. अस्सल मराठमोळ्या भेदिक भाषाशैलीचा डौल काय असतो याची तुम्हास प्रचीती येईल. अर्थात फुले हे प्राधान्याने कृतिशूर, आक्रमक वृत्तीचे समाजसुधारक होते, तर दत्तो वामन हे मुखयतः भाषण-संभाषणचतुर असे सर्वस्पर्शी नेमस्त वृत्तीचे विचारवंत होते. महाराष्ट्राच्या शैक्षणिक आणि सामाजिक क्षेत्रात दोघांच्या कर्तृत्वाचा अमीट ठसा उमटलेला आहे.

म. फुले यांच्या निर्वाणाआधी तीन-साडेतीन महिने म्हणजे ५ ऑगस्ट १८८९ रोजी दत्तो वामनांचा जन्म बिरवाडी, जि. कुलाबा येथे झाला आणि ६ ऑक्टोबर १९७९ रोजी ८९ व्या वर्षी पुणे येथे आपल्या धाकट्या बंधूंच्या घरी त्यांचे निधन झाले. दत्तोपंतांना आम्ही दादा म्हणत असू. दत्तोपंत म्हणजे खरोखरी एक चालतेबोलते ज्ञानपीठ होते– नव्हे, ज्ञानकोश होता. शिक्षण, इतिहास, साहित्य, संस्कृती, धर्म, तत्त्वज्ञान, भाषा इत्यादी नाना विषयांत त्यांना रस होता. अमुक एका विषयात ते अज्ञानी आहेत असा जाणकारांना तरी अनुभव नाही. कुणाकडे जेवायला गेले अन्, एखादा पदार्थ बिघडल्यासारखा वाटला तर प्रसंगी त्या गृहिणींना पाकशास्त्राचे धडेसुद्धा ते देत.

दत्तोपंत पुण्याच्या नूतन मराठी विद्यालयातून मॅट्रिक झाले व फर्ग्युसन कॉलेजमधून इतिहास हा ऐच्छिक विषय घेऊन १९१० साली बी. ए. झाले. बस्स्. रूढार्थाने त्यांचं शिक्षण झालं ते एवढंच. पुढे त्यांनी नू. म. वि. आणि एस. पी. कॉलेजात अध्यापनाचं दीर्घकाळ कार्य केलं खरं, पण त्यांचं खरंखुरं व्यापक समाजाभिमुख शैक्षणिक कार्य सुरू झालं ते या चाकोरीबद्ध शिक्षणसेवेनंतरच. ज्या शिक्षणामुळे बुद्धी चिकित्सक होते, मन विकसित होते, विवेक जागृत होतो, परमतसहिष्णुता अंगी बाणते, जुन्यातील

चांगल्याचा स्वीकार करून नव्या काळाबरोबर चालण्याचे औदार्य येते आणि मुख्य म्हणजे शास्त्रशुद्ध ज्ञानाची गोडी लागून इतरेजनांनाही त्याचा लाभ करून देण्याची सद्‌बुद्धी होते ते खरे शिक्षण– असा व्यापक शैक्षणिक ध्येयवाद दत्तोपंतांच्या वर्तनात, वाणीत आणि लेखणीत होता. संशोधन, स्वभाषा, राष्ट्रभाषा, भाषिक विद्यापीठ, भाषिक प्रांतरचना– चळवळ कोणतीही असो, दत्तोपंत या ध्येयापासून तसूभरही ढळले नाहीत. बहुतांची अंतरे राखून त्यांनी आपल्या न्यायप्रिय सभापांडित्याने नानाविध संस्थांचे जे लालनपोषण केले, ते ध्यानी घेता इतिहासाचार्य राजवाड्यांपेक्षा न्यायमूर्ती रानडे यांचेच ते शिष्य होते असे म्हणावे लागेल. महाराष्ट्रातील संस्थारूपी थंड गोळयात दत्तो वामनांनी आपल्या बुद्धिचातुर्याने आणि प्रसन्न खेळकर वृत्तीने चैतन्य ओतले यात शंका नाही.

दत्तो वामनांनी लालनपोषण केलेल्या नि नावारूपाला आणलेल्या संस्था किमान पन्नास तरी निघतील. यांपैकी प्रत्येक संस्थेशी चिटणीस, कार्याध्यक्ष, उपाध्यक्ष, अध्यक्ष अशा विविध भूमिकेतून त्यांचा ममत्वाचा संबंध होता. त्यांच्या कर्तृत्वाने उजळून निघालेल्या संस्थांची नुसती नावे घेतली तरी त्यांच्या कामाची व्याप्ती नि त्यांची लोकप्रियता यांची कल्पना येते.

१९१५ ते १८ या काळात, म्हणजे लोकमान्य टिळकांच्या हयातीत वसंत व्याख्यान मालेचे ते चिटणीस झाले (१९१५-१८). या मालेशी आणि मालेची मातृसंस्था असणाऱ्या वक्तृत्वोत्तेजक सभा या दोन संस्थांशी पुढे त्यांचा आमरण म्हणजे ६० वर्षे संबंध राहिला. शिक्षण प्रसारक मंडळींशी त्यांचा याच सुमारास संबंध आला. मंडळीच्या नूतन मराठी विद्यालयात शिक्षक, मुख्याध्यापक, पुढे स. प. कॉलेजात प्राध्यापक आणि निवृत्तीनंतर त्याच मंडळीच्या नियामक मंडळीचे अध्यक्ष या नात्यांनी ते या संस्थेशी पन्नास वर्षे निगडित होते. टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे कुलगुरू, कुलपती; महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभेचे अध्यक्ष, पुणे विद्यापीठाचे कुलगुरू अशी एकापेक्षा एक जबाबदारीची, प्रतिष्ठेची पदे त्यांनी नंतरच्या काळात नेकीने सांभाळली. इतिहासक्षेत्रापुरते बोलायचे तर १९०६ साली इतिहासाचार्य राजवाडे यांचे बोट धरून भा. इ. सं. मंडळाच्या छावणीत ते प्रविष्ट झाले, आणि एकदा झाले ते मंडळाशी त्यांचे कायमचे अतूट नातेच जडले. चिटणीस, कार्याध्यक्ष आणि निबंधलेखक या नात्याने मंडळाची दत्तो वामनांनी केलेली सेवा ऐतिहासिक स्वरूपाची म्हणावी लागेल. अखिल भारतीय इतिहास परिषदेचे संस्थापक आणि पहिले सरचिटणीस होण्याचा मान त्यांना लाभावा ही एकप्रकारे त्यांच्या इतिहास संशोधन विषयक निष्ठेची पावती होती.

दत्तो वामनांचे बहुभाषिक पांडित्य ही सुद्धा एक आश्चर्यजनक गोष्ट होती. साधा बी. ए. माणूस केवळ आकांक्षेपोटी स्वबळावर मराठीप्रमाणे हिंदी, इंग्रजी आणि संस्कृत भाषेवर प्रभुत्व मिळवून या तिन्ही भाषेत अस्खलित वक्तृत्व करीत असे. स्वभाषेइतकाच त्यांना राष्ट्रभाषेचाही अभिमान होता. महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभेचे चाळीसएक वर्षे अध्यक्षपद

सांभाळून त्यांनी महाराष्ट्रभर केलेले प्रचारकार्य ही एक प्रकारे राष्ट्रसेवाच नाही का?

स्वभाषा मराठीचा अभिमान तर त्यांच्या रोमारोमांत भिनलेला होता. भाषावार प्रांतरचना, संयुक्त महाराष्ट्र, भाषिक विद्यापीठं– या सर्व चळवळींना चालना देण्यात, त्यांचा तोल सांभाळण्यात दत्तोपंत अग्रेसर असत. त्यांची साहित्यसेवा अल्प असूनही मराठी बांधवांनी त्यांना अहमदनगर येथील मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा बहुमान दिला. महाराष्ट्र साहित्य परिषदेचा आणि साहित्य संमेलनाचा सर्वांगीण इतिहास लिहून आणि साहित्य पत्रिकेचे चोख संपादन करून दत्तो वामनांनी परिषदेचा नावलौकिक वाढविला. साहित्य संमेलनाची वारी त्यांनी सहसा चुकवली नाही. १९७७ च्या पुणे संमेलनाला जराजर्जर आणि काहीशा उपेक्षित अवस्थेतही ते उपस्थित राहिले. अनेक संमेलनांच्या व्यासपीठावरील त्यांची उपस्थिती, त्यांची चैतन्यपूर्ण संयमशील भाषणे आणि सर्व सानथोरांशी आपुलकीचे वागणे या सर्व गोष्टी मी चाळीस वर्षे जवळून पाहात आलो. वेदशास्त्रोत्तेजक सभेपासून ते तमाशा सुधार कमिटीपर्यंत– नानाविध संस्थांचे त्यांनी संगोपन केले आणि अनेक कार्यकर्त्यांना कार्यप्रवण केले. ते कार्य फार मोलाचे आहे. दत्तोपंतांनी संस्था स्थापिल्या नाहीत, पण ज्या अस्तित्वात होत्या त्यांना खतपाणी घालून वर्धिष्णु केले. न्यायमूर्ती रानडे, साहित्यसम्राट न. चिं. केळकर यांच्या परंपरेत चपखल बसणारा दत्तो वामन हा सार्वजनिक संस्थांचा आधार होता.

दत्तो वामनांचे अनेक क्षेत्रांतील कर्तृत्व आणि त्यांची योग्यता जाणून शासनाने त्यांना महामहोपाध्याय आणि पद्मभूषण या पदव्या दिल्या. हिंदी साहित्य संमेलनाने त्यांना साहित्यवाचस्पती केले, तर काही विद्यापीठाने त्यांना डी. लिट् बहाल केली. पण या चतुरस्त्र विद्वानाचा मोठेपणा असा की, हा सदैव नम्र, प्रसन्न, मनमोकळा आणि साधासीधा माणूस राहिला. थोरांपासून पोरांपर्यंत मिसळणारा आणि यशवंतराव चव्हाणांपासून ते पु. ल. देशपांड्यांपर्यंत सर्वांना हवाहवासा असा हा माणूस होता. आचार्य अत्रे असे बलदंड, व्रात्य पत्रकार होऊन गेले की, त्यांच्या टीकेच्या टणत्कारातून महाराष्ट्रातील एकही बडी व्यक्ती सुटली नाही. अपवाद एकच आणि तो म्हणजे दत्तो वामन पोतदार. १९४२ च्या सुमारास 'नवयुग' साप्ताहिकात 'पुण्याचा तेजस्वी ब्राह्मण' नावाचा एक अप्रतिम लेख लिहून अत्र्यांनी पोतदारांचे अगदी भरभरून गुणगान केले. ('अत्रे उवाच' या पुस्तकात हा लेख आला आहे.) गुणी आणि गुणग्राहक या उभयतांची योग्यता त्यावरून सहज कळून येते.

माझा आणि दत्तो वामनांचा जवळजवळ ३०-३२ वर्षांचा जवळून परिचय. साहित्य परिषद आणि वसंत व्याख्यानमाला हा आम्हाला जोडणारा समान दुवा. श्री. जयंतराव टिळकांच्या प्रेमळ आग्रहामुळे १९७५ साली मी मालेचा शताब्दी इतिहास लिहिला व सचित्र स्मरणिका संपादन केली आणि अलीकडे तर त्यांचा शताब्दी स्मृतिग्रंथ संपादण्याचाही योग आला. तीर्थरूप दादांचा सहवास म्हणजे बौद्धिक मेजवानी असे.

शेकडो जुन्या-नव्या ग्रंथांच्या आणि हजारो कागदपत्रांच्या सहवासात राहणारा हा माणूस जितका विद्वान, आनंदी, मिस्कील तितकाच चारित्र्यसंपन्न होता. बुद्धिपुरस्सर अविवाहित राहून शैक्षणिक नि सार्वजनिक कार्याला आजन्म वाहून घेणे ही गोष्ट सामान्य नाही. सोनोपंत दांडेकर, प्रि. आर. पी. सबनीस आणि दत्तो वामन पोतदार या पुण्यातील तीन व्यक्तींचे चरित्र नि चारित्र्य या दृष्टीने खरोखरी धवल आहे. या त्रयीने संसार चालविला तो संस्थांचा. दत्तो वामन तर संस्थाजीवनासाठीच जणू जन्माला आले होते. त्यांची मूर्ती, वेषभूषा, वक्तृत्व, संभाषणं, चालणंबोलणं सारं काही खास त्यांचं होतं. फणसासारखं डोकं, त्यावर काळी टोपी, समारंभ प्रसंगी पगडी, अंगात बंद गळयाचा लांब पार्शी कोट, त्यावर करवतीकाठी, घडीचे उपरणे, पायांत पुणेरी जोडा, चटपट लगबगीने चालणे आणि खुमासदार, खोचक बोलणे– हे सारे आज या क्षणी माझ्या दृष्टीसमोर तरळते आहे. हळहळ एवढीच वाटते की आज वाकून नमस्कार करावा किंवा पाहताक्षणीच जळती सिगरेट आपसूक फेकून दिली जावी असा मोठा माणूस महाराष्ट्रात उरला नाही. स्नान झाल्यावर कपाळावर लांबलचक आडवे गंध नेमाने लावणारा हा माणूस जुन्यातला नवा आणि नव्यातला जुना होता. अजातशत्रू तर होताच होता. विशेष म्हणजे सर्व भाषिकांत नि जातिजमातीत त्यांचा चाहतावर्ग होता.

व्याख्यानबाजीचा आणि मानसन्मानांचा दत्तोपंतांना मोह फार, अशी त्यांच्यावर काहीजण टीका करीत. ती कानी गेली की तपकीर नाकाशी नेत ते म्हणत, 'हे पाहा, मी आपणहून कधी कुणाजवळ काही मागत नाही की निमंत्रणं लावत नाही. लोक आग्रह करतात, मला नाही म्हणवत नाही.' वाईच्या 'आनंदी धामात' ते पंचाहत्तरीनंतर राहू लागले तरी त्यांचा संचार महाराष्ट्रभर चालूच होता. अखेरपर्यंत ते मोठ्या स्वाभिमानाने जगले. होता होईतो कुणालाही ते तसदी देत नसत. तब्येत कशी काय आहे असं कुणी विचारलं तर 'मला काय झालंय?' असं उत्तर देत. कुणी आधारासाठी हात दिला तर 'मला हात देऊ नका, स्वतःला सांभाळा म्हणजे झालं.' असं त्यांचं उत्तर असे. आणि असं असूनही अनेक माणसं त्यांची सेवा करण्यासाठी धडपडत असत.

दत्तो वामनांवर दोन आक्षेप नेहमी घेतले जात. एक म्हणजे त्यांनी प्रत्यक्षात साहित्यसेवा काही केली नाही. आणि दुसरे म्हणजे शिवचरित्राचे काम पत्करूनही पूर्ण केले नाही. आता हे आक्षेप म्हटले तर बरोबर, म्हटले तर चूक आहेत. संस्थासंचालन आणि सभापांडित्य हेच ज्यांचे मर्मस्थान होते, त्यांच्याकडून ग्रंथपांडित्याची अपेक्षा मुळात करणे हेच चूक नाही का? पण दत्तो वामनांच्या नावावर काहीच पुस्तके नाहीत असे नाही. सर्वसामान्य जनांना ती माहीत नसतात हे खरे. पण जाणकारांना 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार', 'मराठी इतिहास व इतिहास संशोधन', 'साहित्य परिषद आणि संमेलने यांचा इतिहास', 'सुमनसप्तक' आणि 'ओळख' हे व्यक्तिचित्रसंग्रह, 'श्रोतेहो' हा भाषणसंग्रह, 'लो. टिळकांचे सांगाती' आणि 'श्री शिवचरित्राचे पैलू', 'भारताची भाषासमस्या',










'इनसाईड महाराष्ट्र' अशी त्यांची आठ-दहा पुस्तकं चांगली परिचित आहेत. 'लो. टिळकांचे सांगाती' या पुस्तकात सुमारे १०० व्यक्तींची छोटीमोठी शब्दचित्रे आहेत. त्यांना बोलते करून मी हे पुस्तक लिहून घेतले. आवश्यक तिथे त्यांच्याच अनुमतीने पूरक माहितीची भर घातली. पण या एकूण उद्योगापायी मला त्यांनी वर्षभर कुथवले. त्यांच्या सवडीनुसार नि लहरीनुसार मी आनंदाने हे काम करीत होतो. वर उल्लेखिलेल्या दत्तोपंतांच्या लेखणी-वाणीतून स्रवलेल्या या एकूण ज्ञानसरितेचे अमृतजल जो कुणी प्राशन करील तो खात्रीने बहुश्रुत होऊन कार्यप्रवण होईल. नानाविध संस्थांच्या व्यापात देहमन गुंतवत गेल्यामुळे त्यांच्या हातून बैठक मारून खास असे लेखन होणे शक्य नव्हते. पण जे सवड काढून स्वतंत्रपणे त्यांनी केले आणि चाहत्यांनी संपादन करून छापले ते निःसंशय विचारप्रवण करणारे आहे.

दत्तो वामनांचे शिवचरित्र हा शेवटीशेवटी थट्टेचा विषय झाला होता. योग्यता असूनही बहुविध कार्यमग्नतेमुळे त्यांच्या हातून हे कार्य झाले नाही आणि लोकांना थट्टेला विषय गवसला. शिवचरित्र कधी पुरे होणार असे कोणी त्यांना विचारले की ते अगदी धीमेपणाने म्हणत, 'होईल. सरकारने मला काही कालमर्यादा घातलेली नाही.' या बाबतीतले आणखी दोन किस्से सांगण्यासारखे आहेत. एकदा दत्तोपंत रायगडवर गेले होते. तिथे समाधीजवळ जाऊन पाहतात तो साक्षात शिवाजीमहाराज काही तरी लिहीत बसलेले दिसले. दत्तोपंतांनी विचारलं, 'महाराज, आपण काय लिहिण्यात एवढे मग्न आहात?' महाराजांनी उत्तर दिलं, 'दत्तो वामनाचं चरित्र लिहितोय.' दुसरा किस्सा– एक विद्वान 'शिवचरित्र पुरं करा बुवा' अशी फार गळ घालू लागला तेव्हा दत्तोपंत जरा खेकसलेच. 'अहो, मला कुल्ले खाजवायला वेळ नाही आणि तुम्ही शिवचरित्राचं काय टुमणं लावलंय?' बिचारा विद्वान गप्प बसला. काही दिवसांनी हे बोलणं न. र. फाटकांच्या कानी गेलं. फाटक दत्तोपंतांचे मित्र. पुन्हा थट्टामस्करी करणारे. पुण्याला एकदा दोघांची भेट झाली तेव्हा फाटकांनी विचारले, "गाडी कुठवर आली?"

"आहे तिथेच आहे. पुढे बोला."

"तुम्ही आता असं करा– एक बाई ठेवा."

"बाई ठेवून काय करू?"

"अहो ती तुमचे एकीकडे कुल्ले खाजवील आणि दुसरीकडे तुम्हाला शिवचरित्र लिहिता येईल."

दत्तोपंतांच्या सभापांडित्याविषयीचे असेच दोन किस्से. आमच्या साहित्य परिषदेची वार्षिक साधारण सभा दत्तोपंतांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. घटनानियमात तज्ज्ञ समजणारे एक वादपटु सभासद आरंभीच उठून म्हणाले, "अध्यक्षमहाराज, आजची सभा बेकायदा आहे." त्यावर दत्तोपंत लगेच म्हणाले, "असं? मग तुम्ही या बेकायदा सभेला उपस्थित कसे? उपस्थितीची सही केलीत. तेव्हा बसा खाली."

वसंत व्याख्यानमालेत आचार्य अत्रे वक्ते तर दत्तो वामन अध्यक्ष असा योग आला होता. गर्दी अर्थात प्रचंड. त्यातून विषय १८५७चे स्वातंत्र्यसमर. मग काय- अत्र्यांचे तेजस्वी वक्तृत्व चौखूर उधळू लागले. तासाभराच्या हशा-टाळ्यांच्या भाषणात त्यांनी न. र. फाटकांचीही हजेरी घेतली. त्यांचे भाषण संपल्यावर दत्तोपंत समारोप करताना मिस्कीलपणे म्हणाले, "अत्र्यांनी आपल्या भाषणाने तुम्हाला वाहून नेलं ही कौतुकाची बाब झाली. पण फेकला तटाहुनि घोडा हे फक्त काव्यात असते, हे विसरू नका. राणी लक्ष्मीबाई काय मूर्ख होती का? तटावरून घोडा फेकला असता तर त्याचे पाय आणि राणी सुरक्षित राहिली असती काय? विचार करा. अहो, इतिहास तो इतिहास, काव्य ते काव्य. पराभव दिसू लागताच राणी गुप्तमार्गाने पोराला पाठीशी बांधून वेगाने निसटून गेली हा इतिहास. ५७ चा उठाव हे मर्यादित अर्थाने स्वातंत्र्यसमर होतं. उगाच भावनेच्या भरात त्या उठावाचं प्रमाणाबाहेर गौरवीकरण करू नका. ज्यांनी या उठावात झुंजारपणे बलिदान केलं त्या सर्वांविषयी आदर ठेवून मी हे सांगतो आहे. अत्रे आणि फाटक या दोघांच्या भूमिका टोकाच्या आहेत. त्या नीट पारखून ५७ च्या प्रकरणाचा अर्थ समजून घ्या म्हणजे पुष्कळ काही आपणाला शिकता येईल." असा हा विवेकपूर्ण समारोप करताच अत्र्यांसकट सारे श्रोते क्षणभर अंतर्मुख झाले. दत्तोपंतांना बोलण्याची उदंड हौस. म. सा. परिषदेतील एका कार्यक्रमप्रसंगी पाऊस पडू लागला. दिवे गेले, बहुसंख्य श्रोते उठून गेले. आम्ही चार-सहाच श्रोते नाईलाज म्हणून बसून होतो आणि तरीसुद्धा दत्तोपंतांचे बोलणे चालूच. त्यांच्या वक्तृत्वाचा विशेष असा की त्यांची स्वतंत्र भाषणे विद्वत्तापूर्ण होत, तर आभाराची, समारोपाची भाषणं विशेष रंगत. कुणी डिवचलं की त्यांचे वक्तृत्व नागासारखे फणा काढून तरारून येत असे. हा आनंदी माणूस इतरांची थट्टामस्करी करण्यातही पटाईत होता. भारत इतिहास संशोधक मंडळाच्या उत्सवात य. ग. फफे यांनी 'सोयराबाई शिर्क्यांची की मोहित्यांची' या विषयावर निबंध वाचला होता. सर्वांचं निबंधवाचन झाल्यावर भोजनाची पंगत बसली. बेत बुंदीच्या लाडवांचा होता. दत्तोपंत आग्रह करकरून सर्वांचा समाचार घेत होते. फफे यांच्या पानाजवळ वाढपी आला तशी ते म्हणाले, "अरे, यांना दोन मोठ्ठे लाडू वाढ." फफे काकुळतीने म्हणाले, "अहो, नको हो. दोन कशाला?" दत्तोपंत उद्गारले, "एक शिर्क्यांकडचा आणि हा दुसरा मोहित्यांकडचा." पंक्तीत एकच हशा पिकला.

असा हा निरागस विद्वान माणूस कुलगुरू असतानाचा एक प्रसंग. होस्टेलमधल्या विद्यार्थ्यांचे गॅदरिंग होते. मेजर जनरल थोरात प्रमुख पाहुणे म्हणून यावेत अशी छात्रगणाची मागणी होती. ती पूर्ण करायला दत्तोपंतांनी दिल्लीला फोन लावला. तिकडे रिंग वाजताच सेक्रेटरीला थोरातसाहेबांनी विचारलं, "कुणाचा फोन या वेळी?"

"सर, पुण्याहून डी. व्ही. पोतदार बोलताहेत."

बस्स, पोतदारांचे नाव ऐकताच थोरात कागदपत्र बाजूला सारून चटकन उठले. फोनला त्यांनी आधी सॅल्यूट ठोकला आणि अदबीने म्हणाले,

"बोला सर, काय सेवा करू?"

"पुण्याला अमुकअमुक तारखेला यायचं. गॅदरिंग आहे."

"येस सर. आपण माझा बहुमान केलात याबद्दल फार आभारी आहे." थोरातांनी फोन ठेवला आणि पुन्हा एकदा फोनला सॅल्यूट करून ते कामाला लागले. नू. म. वि. मधील आपल्या गुरुवर्यांविषयी इतका आदरभाव दाखवणारा शिष्य खरोखर विरळा. (ही हकिकत खुद्द थोरातांनी प्रत्यक्ष गॅदरिंगचे वेळी सांगितली.)

दत्तो वामनांचा संचार महाराष्ट्रात, भारतात सर्वत्र असला तरी पुण्यावर त्यांचे अलोट प्रेम होते. ते जितके बुद्धिवादी, चिकित्सक तितकेच मनाचे कोवळे, श्रद्धाळू होते. पुणे शहर, शनिवार पेठ, ओंकारेश्वर, आपले वडिलार्जित घर, पूज्य वडील वा. मो. तथा बाबासाहेब, धाकटे बंधू दामुअण्णा, वहिनी, त्यांची मुले, सुना, नातवंडे यांच्यावर ते उदंड मायाममता करीत. मातृप्रेमाखातर त्यांनी वाईच्या घराला 'आनंदीधाम' असे नाव दिले होते. त्यांच्या वडिलांच्या शब्दचित्रातून त्यांची पितृभक्ती ओसंडून वाहताना दिसते. निबंधमालाकार चिपळूणकर, लोकमान्य टिळक आणि इतिहासाचार्य राजवाडे ही त्रयी त्यांना गुरुस्थानी होती. पण विशेष असा की, टिळकाईट असूनही हा माणूस न्या. रानडे, गांधी, नेहरू यांच्याविषयीही परमआदर बाळंगून होता. दत्तो वामनांची प्रसन्न तेजस्वी मूर्ती आठवली की मला तरी रामशास्त्र्यांची आठवण येते. समतोल बुद्धीने त्यांनी आपल्या प्रदीर्घ सार्वजनिक जीवनात बहुतांची अंतरे आणि स्वतःचा बाणा राखला आणि एक प्रकारे समर्थांचा दासबोध आपल्या कर्तृत्वाने सार्थ करून दाखवला. आचार्य कालेलकरांनी त्यांची एकदा फार मार्मिक शब्दांत प्रशंसा केली आहे.

पोतदारजी सबके साथ सहयोग रखते है। लेकिन सहमत किसके भी साथ नही है।

दत्तो वामनांची अखेरची दोन वर्षे फार अनुकंपनीय अवस्थेत गेली. ८७ वर्षे उलटून गेल्यावर त्यांच्या पायावर सूज आली ती कधी गेलीच नाही. अप्पा केंजळकर नामक गृहस्थाने वाईला त्यांची सेवाशुश्रूषा उत्तम केली. दाढी वाढलेली आहे, चालणं कठीण झालं आहे, किंबहुना खुरडतच चालावं लागतंय, ही त्यांची अवस्था पाहताना डोळे भरून येत. 'शेवट पुण्याला घरी व्हावा' ही त्यांची उत्कट इच्छा मात्र पूर्ण झाली. नाना फडणीस निधन पावले तेव्हा पुण्याच्या रेसिडेंटाने 'पुण्यातलं सारं शहाणपण लयाला गेलं.' असे सार्थ उद्‌गार काढले होते. दत्तोपंतांच्या बाबत असंच म्हटलं तर खचित शोभून दिसेल. त्यांच्या लेटरहेडवर वा पत्रांवर 'ज्ञानदीप लावू जगीं' हे वचन छापलेलं असे. ते गेल्यामुळे खरोखरीच एक ज्ञानदीप मालवला. पण ज्योतीने ज्योत लावावी त्याप्रमाणे त्या दीपाने माझ्यासारखे हजारो दीप प्रकाशमान केले.

(म. श्री. दीक्षित, सदाशिव पेठ, पुणे ३०)

# म. म. पोतदार

## आमचे प्रेरणास्थान

सेतुमाधवराव पगडी

आज माझे ऐंशीवे वर्ष चालू आहे. या दीर्घ कालखंडात अनेक लहानथोर माणसे माझ्या आयुष्यात येऊन गेली आणि त्यांनी माझ्या जीवनावर अनेक संस्कार केले. अशा प्रेरक व्यक्तींत एक नाव गेली पन्नास वर्षे माझ्या डोळ्यांसमोर सातत्याने दिसते ते 'महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार' यांचे होय. भारत इतिहास संशोधक मंडळाच्या त्रैमासिकातून मी पोतदारांच्या नावाशी प्रथम परिचित झालो. निजामी राजवटीत एका तालुक्याचा मी मामलेदार. इतिहासाच्या अभ्यासाकडे मी ओढला गेलो तो राजवाडे, सरदेसाई, पोतदार, वासुदेवशास्त्री खरे आणि ग. ह. खरे इत्यादींच्या साहित्याच्या वाचनाने. पोतदार हे संशोधक तर होतेच, पण त्याहूनही अधिक महत्त्वाचे असे संघटनेचे कौशल्य त्यांच्यात होते. 'भारत इतिहास संशोधक मंडळाला' अखिल भारतात जे महत्त्व प्राप्त झाले त्याचे मोठे श्रेय पोतदारांच्या मनमिळाऊ, प्रसन्न अशा व्यक्तिमत्त्वाला द्यावे लागेल. त्यांनी ती संस्था नावारूपाला आणली. अनेकांना संशोधनकार्याकडे वळविले. 'आधुनिक भारतीय इतिहास परिषद' ही संस्था स्थापिली आणि तिची अनेक अधिवेशने भरवून तिची सातत्याने जोपासना केली.

पोतदारांचा आणि माझा परिचय झाला तो काहीसा उशिराने. इ. स. १९५० नंतर ते हैद्राबादेस आले असताना त्यांच्या अध्यक्षतेखाली एका हिंदी संमेलनातून भाषण करण्याचा मला योग आला. पोतदारांच्या सहवासात मला एक गोष्ट प्रामुख्याने जाणवली, ती म्हणजे त्यांची अनेक विषयांशी समरस होण्याची सहजवृत्ती होय. त्यांना अनेक भाषा येत होत्या आणि त्यांतून ते उत्कृष्ट भाषणे करीत. त्यांचे वक्तृत्व त्यांच्या व्यक्तिमत्त्वासारखेच प्रसन्न आणि सुखविणारे असे. सार्वजनिक कामाची त्यांची हौस अनिवार असे. त्यामुळे महाराष्ट्रातील अनेक संस्थांशी ते जणू काय एकरूप होऊन गेले होते. मराठी साहित्य संमेलनाशी त्यांचा जवळजवळ ६० वर्षे संबंध होता. हिंदी भाषिक संस्था, संस्कृत विद्येचे पुनरुज्जीवन, पुणे विद्यापीठाच्या स्थापनेचा प्रश्न, महाराष्ट्रातल्या एकीकरणाची चळवळ असे अनेक व्याप पोतदारांनी सांभाळले. परप्रांतांत मराठी संस्कृतीचे प्रतिनिधी म्हणून पोतदारांची जी ख्याती झाली तीत आपल्याला त्यांच्यात वसत असलेल्या विद्या, व्यासंग, गुणग्राहकता आणि लोकसंग्रह इत्यादी गुणांची कल्पना येते. न्यायमूर्ती रानड्यांच्या नंतरची पुढील साठ-सत्तर वर्षे महाराष्ट्रातील सांस्कृतिक जीवनाचे क्षेत्र पोतदारांच्यामुळे अधिक

व्यापक आणि समृद्ध होत गेले, असेच कोणीही म्हणेल.

इ. स. १९५६ च्या अखेरीस मी हैद्राबादेहून मुंबईस आलो. त्यानंतर पोतदारांशी माझे संबंध निकटचे झाले. मुंबई आणि पुणे येथे त्यांच्या आणि माझ्या अनेक वेळा गाठीभेटी होत. पोतदारांशी अनेक विषयांवर बोलणे म्हणजे आम्हाला मिळणारी एक चमचमीत मेजवानीच असे. आज मला असे अनेक भाषणांचे प्रसंग आठवतात. प्रत्येक बैठक तास, दोन तासांहून कधीच कमी नसे. इतिहासातील कितीतरी बारकावे पोतदारांच्यामुळे मला उलगडता आले. अफजुलखान प्रसंग, संभाजीराजांचे शिंगारपुरातील वास्तव्य, जयराम पिण्डये याचा 'राधामाधवविलास चंपू', बखर वाङ्मय, मराठेशाहीतील प्रमुख घराणी असे किती म्हणून विषय सांगावेत ! काहींना पोतदारांच्या बोलण्यात पाल्हाळ आहे असे वाटे. मी मात्र प्रत्येक वेळी त्यांच्याकडून अनेक विषयांची माहिती गोळा करून घेत असे. पोतदारांनाही माझ्याबद्दल विशेष आस्था वाटे, ती माझ्या फारसी भाषेच्या व्यासंगामुळे आणि मराठे-निजाम संबंधाच्या जाणकारीमुळे. माझ्या अनेक भाषणांच्या वेळी पोतदार हेच अध्यक्ष होते. 'वसंत व्याख्यानमाले'तील एक प्रसंग मला आजही आठवतो.

'मोगल राजवटीत प्रौढ पदव्यांची खैरात असे. त्यामानाने मराठेशाहीतील साधेपणा उठून दिसे. उत्तरकालीन मराठेशाहीस जिद्दीने सांभाळणारे सर्वाधिकारी 'फडणीस', पण सामान्य लोकांत त्यांचा उल्लेख फक्त 'नाना' असाच होत असे. मोगल बादशहाला निव्वळ बाहुले बनवून हरियानाच्या उत्तर टोकापर्यंत धडक मारणारे महादजी शिंदे, त्यांना लोक शेवटपर्यंत 'पाटीलबुवा' असेच म्हणत राहिले. यामुळे काही विनोदही निर्माण झाले. मोगल काळात प्रत्येक मराठ्याचा उल्लेख शिवाजी म्हणूनच होऊ लागला. अधिकाऱ्यांनी पाठविलेल्या वृत्तांत 'पाच मराठे समोरून गेले' असे म्हणण्याच्या ऐवजी 'पाच शिवाजी समोरून गेले,' असे म्हणण्याची प्रथा पडली.' त्यामुळे 'शिवाजीला का जाऊ दिले?' म्हणून त्या अधिकाऱ्याला तंबी देण्यात आली. तसेच पेशवाईत मुख्य सचिवाला 'नाना' ही पदवी असते अशी मोंगलांची समजूत. त्यामुळे 'नाना फडणीसाच्या' नंतर कोण 'नाना' होणार? अशी चर्चा मोंगलांच्यात सुरू झाली. मनुचीलाही 'शिवाजी' ही पदवी असावी असे वाटत असावे. त्यानेही लिहून ठेवले की, 'संभाजी मेल्यावर राजाराम हा शिवाजी' झाला. मी मोगलांच्या भरघोस पदव्यांची यादी सांगू लागलो. तेजाह (आसफ जाह), दौला (शुजउदौला), मुल्क (मुशीरउल्मुल्क), उमरा (अमीरूल उमरा), जंग (नुसरत जंग) अशा पदव्या मी भराभर सांगत गेलो. तेव्हा पोतदार हसून म्हणाले, "माधवराव, आम्ही तुम्हालाही 'विद्वत्‌जंग' ही पदवी बहाल करतो." तेव्हा एकच हंशा पिकला.

पोतदारांशी माझे मतभेद झाले नाहीत, असे नाही. शिवजन्मतिथी हा आमचा वादाचा एक विषय होता. पण धन्य आहे पोतदारांची. कपाळाला आठ्या नाहीत, मनात क्षोभ नाही, बोलण्यात कटुता नाही, कुणावर टीका नाही, हट्टाग्रहीपणाची भूमिका नाही. आयुष्यभर प्रत्येक गोष्टीत समन्वय साधण्याची धडपड. असे पोतदारांचे व्यक्तित्व. अशी माणसे आज



अनुक्रमणिका

समाजात किती दुर्मिळ होत चालली आहेत हे पाहून मन विषण्ण होतं.

पोतदारांच्या या अनेकविध गुणांमुळे मानसन्मान त्यांच्यामागे चालत आले. समाजात, सरकारदरबारात सर्वत्र त्यांचा आदर होऊ लागला. ते होते तोपर्यंत सांस्कृतिक क्षेत्रात महाराष्ट्राचा एकमेव प्रतिनिधी म्हणजे 'पोतदार', असे अखिल भारतात त्यांचे नाव पसरले.

व्यासंग दांडगा, निरीक्षण सूक्ष्म, संघटनेचे कौशल्य अप्रतिम, वक्तृत्व अमोघ. पण पोतदारांना लेखनाची बैठक फारशी लाभली नाही. त्यामुळे शिवचरित्राचे काम त्यांच्या हातून पार पाडले नाही. आणखी अधिक माहिती मिळते का पाहू अशा हव्यासात त्यांचे शिवचरित्र लेखन लांबणीवर पडले ते पडलेच. कुठेतरी मनाची निश्चितता करून लेखणी हातात धरावीच लागते. आदर्शाकडे पोतदार डोळे लावून बसले.

उर्दू कवीने म्हटले आहे, "जे आहे ते चांगले आहे, उत्तम आहे, मग अत्युत्तम काय बरे असेल? त्याचा शोध घेण्याची धडपड. मग नजर कुठेतरी स्थिरावेल काय?"

"अब जुस्तजू के है खूब से खूबतर कहाँ ।
अब देखीये जाकर ठहरती है नजर कहाँ ।"

यामुळे पोतदारांचे डोळे आदर्शाकडे लागले. पण बोटे काम करीनाशी झाली.

इंग्रजी साहित्यात गाजलेल्या डॉ. जॉन्सन या विद्वानाची आठवण या प्रसंगी होते. त्याची विद्वत्ता दांडगी, पण लेखन कमी. सुदैवाने बॉसवेलसारखा चरित्रकार त्याला लाभला. त्याने त्यांचा प्रत्येक शब्द टिपून घेतला. त्यामुळे जॉन्सनची कीर्ती अजरामर झाली. पोतदारांना असा कुणी 'बॉसवेल' लाभला नाही.

पण याची खंत बाळगण्याचे कारण नाही. लेखक पुष्कळ होतात. त्याचे तंत्र आणि शिस्त ही प्रयत्नाने साध्य होतात. पण उत्तुंग व्यक्तिमत्त्वाची माणसे ही योगायोगानेच समाजाला लाभतात. आजचे वातावरण हेवेदावे, स्पर्धा, मत्सर इत्यादींच्या कर्कश स्वरांनी भरून गेले आहे. समन्वयाचे, एकात्मतेचे नाव कुणीही काढीत नाही. अशा वातावरणात पोतदारांसारख्यांच्या मधुर वाणीची नितांत आवश्यकता आहे. ती वाणी आता ऐकू येत नाही. आम्ही पोतदारांच्याकडून प्रेरणा घेतलेली माणसे. त्यांचा प्रत्येक शब्द आम्ही हातोहात झेलीत होतो आणि एक दिवस पोतदार हे चिरनिद्रेच्या अधीन झाले. कथाकार बोलत असावा आणि बोलता बोलता त्याचा डोळा लागावा, तो कायमचा ठरावा असे झाले.

"बडे शौक से सुन रहा था जमाना ।
तुम ही सो गये दास्ताँ कहते कहते ।"

काळ किती तल्लीन होऊन तुमच्या गोष्टी ऐकत होता. पण हाय ! बोलता बोलता तुम्हालाच झोप लागली.

(पोतदार शताब्दी-स्मृतिगौरव ग्रंथातून)

# सौंदर्य-रस

डॉ. आनंदप्रकाश दीक्षित

अनुवाद- डॉ. ह. श्री. साने

*(१९६८च्या 'हंस' च्या दिवाळी अंकातील 'सौंदर्य-रस' नावाच्या डॉ. पु. ग. सहस्त्रबुद्धे यांच्या लेखाने मराठी रसचर्चेमध्ये आणखी एका रसाची भर पडली. 'सौंदर्य-रस' (१९८०) या नावाने प्रकाशित पुस्तकात या लेखाचा समावेश आहे. डॉ. सहस्त्रबुद्धे यांच्या सौंदर्य-रस स्थापनेविषयी पुणे विद्यापीठाच्या हिंदी विभागाचे निवृत्त प्रमुख डॉ. आनंदप्रकाश दीक्षित यांनी समीक्षत्माक लेख 'आनंद विजानीयात्' मध्ये प्रकाशित केला. त्याचा हा अनुवाद.)*

डॉ. सहस्त्रबुद्धे यांनी आपल्या प्रतिपादनात मुख्यतः पुढील मुद्द्यांचा परामर्श घेतला आहे.

१. जगात होत असलेल्या घटनांमध्ये कार्य-कारण संबंधातील विसंगती पाहून माणूस दैवाची वक्रगती गृहीत धरू लागला आणि भाग्यवादी, दैववादी बनला. परिणामतः माणसाच्या वाट्याला दुःख अधिक आले. तसे पाहिले तर मनुष्य सुख मिळवण्यासाठीच सुसंगती, क्रमबद्धता, व्यवस्थापन पद्धत इत्यादींचा अवलंब करीत असतो. ही सुसंगत मांडणी, क्रमबद्ध पद्धत म्हणजेच माणसाची नवनिर्मिती असते; ही मांडणीच सौंदर्याची जननी असते. या सौंदर्यापासून मनुष्याला आनंद मिळत असतो; या क्रमबद्ध मांडणीमुळेच माणसात सौंदर्य भावना जागृत होत असते, इतकेच नाही, तर या मांडणीच्या, निर्मितीच्या इच्छेतूनच आपल्या संस्कृतीचा आणि कलांचा जन्म होतो.

२. माणसाच्या मूळ प्रवृत्तींपैकी सौंदर्य भावना ही एक आहे. मूळ प्रवृत्तीच्या उत्कट अवस्थेतून रसाची निष्पत्ती होते. तशीच सौंदर्यभावनेच्या उत्कटतेमधूनच सौंदर्य-रसाची निर्मिती होते असे मानणे सयुक्तिक होईल. विसंगतीमुळे जशी हास्यरसाची निष्पत्ती होते तशीच क्रमबद्धता, सुसंगती म्हणजे कलानिर्मिती पाहून आनंद होत असतो. आनंदाची परमोत्कट अवस्था म्हणजेच जर रसनिष्पत्ती असेल तर नवनिर्मितीच्या उत्कट इच्छेमुळे 'सौंदर्य रसा'ची निष्पत्ती होते असे मानावयास हरकत नाही.

३. हे सौंदर्य मानवनिर्मित कलांमध्ये आणि साहित्यात जसे असते तसेच ते निसर्गातसुद्धा असते. कलाकाराच्या स्मृतीने संचय केलेल्या प्रतिमांची नव्या तऱ्हेने केलेली मांडणी म्हणजेच कला होय. विषय दर वेळी नवीन असेलच असे नाही. जुन्या घटकांची जुळणी, आकृती किंवा जडणघडण नव्या धर्तीने करणे हेच नवनिर्मितीत



अनुक्रमणिका

महत्त्वाचे असते. ही नवीन जुळणी, जडणघडण म्हणजेच कलेचा आत्मा किंवा प्राणतत्त्व असते. यालाच 'संरचना' असा पारिभाषिक शब्द वापरलेला आहे; या शब्दातून कलेची रूप-रचना जसी सुचवली जाते तशीच कलाकाराच्या मनातील उद्देशाची किंवा प्रयोजनाची सुद्धा माहिती मिळणे अभिप्रेत आहे. विशिष्ट प्रयोजनाने सिद्ध केलेली रचनाच संरचना असते. कारण प्रत्येक कलाकृतीचे काही ना काही पण नेमके प्रयोजन असतेच.

सप्रयोजन असण्याच्या वैशिष्ट्यामुळेच साहित्य ही 'सार्थ आणि साभिप्राय अनुभूती' मानली जाते. घटनांची, प्रसंगांची विशृंखलता, असंबद्धता, तर्कहीनता आणि असंगती या साहित्याच्या रचनात्मकतेच्या दृष्टीने नेहमीच ह्यनिकारक मानल्या गेल्या आहेत. घटकांचे किंवा अवयवांचे मूळ अवयवीशी सुसंबद्ध नसणे किंवा आरोपित अथवा अनावश्यक वाटणे यामुळे मूळ अवयवीचा सार्थपणा बाधित होत असतो.

४. मानवनिर्मित आणि निसर्गनिर्मित सौंदर्यात मूलतः काहीच फरक नाही. फूल, फूलपाखरू इत्यादी सगळ्या या अर्थाने संरचनाच असतात आणि यांचे सौंदर्य उचित जुळणी आणि जडणघडणीमुळेच निर्मित होत असते. सगळ्या नैसर्गिक सौंदर्यात संरचनाजन्यतेमुळे रसत्व असते आणि हाच सौंदर्य रसाचा आशय आहे. परंतु मानवनिर्मित सौंदयपिक्षा निसर्गनिर्मित सौंदर्यात थोडे आणखी वेगळे सौंदर्य असते. अशा सौंदर्याला फक्त संरचनाजन्य सौंदर्य असे म्हणता येणार नाही. उदाहरणार्थ, समुद्र, घनदाट जंगल, ओढे, धबधबे, विशाल आणि उत्तुंग वृक्ष, निळे आकाश, उत्तुंग पर्वत यांतही अनुपम सौंदर्य आहेच, पण हे सगळे पाहून उत्पन्न होणारी उदात्ततेची, भक्तीची आणि आश्चर्याची भावना प्रस्तुत सौंदर्य-रस मीमांसेच्या क्षेत्राबाहेरची आहे म्हणून तिचा विचार इथे अप्रस्तुत आहे.

५. सार्वत्रिकतेच्या आणि सार्वजनिकतेच्या दृष्टीने पाहिले तर भय, प्रेम यांसारख्या भावना आणि सौंदर्यभावना यांत काहीच फरक दिसणार नाही. याचप्रमाणे संरचना प्रवृत्तीसुद्धा कृमी-कीटकांपासून मनुष्यापर्यंत सार्वत्रिक आणि सार्वजनिक आहे. ही प्रवृत्ती सगळ्यांना निसर्गापासूनच मिळालेली आहे. ज्याप्रमाणे क्रोध-द्वेष इत्यादी भावनांचा आत्मसंरक्षण आणि वंशवर्धन यांच्याशी जवळचा संबंध आहे, तसाच सौंदर्य भावनेचासुद्धा आहे. इतर भावना जर संपुष्टात आल्या तर मनुष्याचे अस्तित्व ज्याप्रमाणे संकटात पडते त्याप्रमाणे सौंदर्य भावनेच्या संपुष्टात येण्याने निर्मितीची प्रक्रियाच थांबते. सगळ्याच भावना उपयोगाच्या विचाराकडून आनंद विचाराकडे जाताना दिसतात म्हणून अगदी आरंभीच्या 'रचना' जीवनोपयोगी आणि वंशसातत्योपयोगी स्वरूपाच्या होत्या. या संरचनांचे विकसित रूप आनंद किंवा मनोरंजनाच्या वाटेने कलेमध्ये दिसते. या संरचनांमुळे मनात जागृत होणारी भावना म्हणजेच सौंदर्यभावना होय आणि हिचेच पूर्ण विकसित रूप म्हणजे सौंदर्यरस होय.

६. कारक घटकांपासून मिळणारा आनंद आणि या घटकांच्या सम्यक्

सुसंवादीपणामुळे मिळणारा आनंद यांत फरक आहे. सुसंवादीपणामुळे मिळणारा आनंद म्हणजेच सौंदर्यानंद होय आणि ज्यामुळे हा आनंद मिळतो तो सौंदर्यरस होय.

७. इतर रसांच्या तुलनेत सौंदर्य रस हा अधिक प्रमाणात सर्वव्यापक असल्याचे दिसते. कारण संरचनेशिवाय कोणतीही रचना कलाकृती होऊ शकत नाही. म्हणूनच ही संरचना म्हणजे सगळ्या कलांचा प्राण आहे. 'संरचने'मुळेच सौंदर्यरसाची अनुभूती होते.

८. सौंदर्यभावना प्रत्येक रसाच्या मुळाशी असतेच. तिला वेगळे स्थान देण्याची आवश्यकता नाही असे म्हणणे योग्य होणार नाही. कारण प्रत्येक कलाकृतीत कोणता ना कोणता तरी रस असलाच पाहिजे असा आग्रह धरता येत नाही. उदाहरणार्थ, मीनाक्षी मंदिर, ताजमहाल, कोणार्क इत्यादींमध्ये अन्य कोणताही रस नाही. या सर्वांत फक्त सौंदर्य रस आहे.

९. केवळ जुनी झाली म्हणून आपण श्वसनव्यवस्था त्याज्य ठरवत नाही, तसेच जुनी असली तरी रस व्यवस्थासुद्धा त्याज्य म्हणता येणार नाही; तिच्यात गरजेप्रमाणे बदल नक्कीच केले जाऊ शकतात.

११. सौंदर्य रसाचे शास्त्रीय स्वरूप पुढीलप्रमाणे सांगता येते–

अ. संरचना करायची किंवा नवनिर्मितीची म्हणजेच निरनिराळ्या घटकांमध्ये सुसंगती स्थापित करण्याची उत्कट इच्छा म्हणजे सौंदर्य रसाचा स्थायी भाव.

आ. शिल्प, चित्र, संगीत आणि साहित्यासारख्या नवनिर्मिती म्हणजे आलंबन विभाव.

इ. अशा कलाकृतींचे, त्यांच्या कौशल्याचे किंवा सौंदर्याचे वर्णन म्हणजे उद्दीपन विभाव.

ई. अशा कलाकृती पाहत असताना डोळे विस्फारणे, त्यांची प्रशंसा करणे किंवा त्या पाहून अवाक् होणे इत्यादी म्हणजे अनुभाव.

सुसंगती, क्रमबद्धता, जुळणी, जडणघडण यांमधूनच कोणतीही कलाकृती साकार होत असते आणि या सुसंगतीमध्येच कलेचे सौंदर्य असते ही बाब प्राचीन साहित्याचार्यांनी मान्य केलेली आहेच आणि म्हणूनच डॉ. सहस्रबुद्धे यांच्या वरील मताशी असहमत होण्याचेही कारण नाही. तसेच सौंदर्यानुभूतीमुळे सहृदय रसिकाला आनंद मिळतो याबद्दलही दुमत असण्याचे कारण नाही.

डॉ. सहस्रबुद्धे यांनी आपल्या संपूर्ण विवेचनात एकही संस्कृत (अवतरण) उद्धरण दिलेले नसले तरी त्यांच्या विचाराचे मूळ प्राचीन काव्यशास्त्रामध्ये सहजासहजी मिळते. एक तर स्वतः भरताने केलेल्या विवेचनातच सुसंगती आणि क्रमबद्धता यांचे सूत्र सापडते. भरत ज्याला अनुरूपता म्हणतो त्याचेच दुसरे नाव सुसंगती किंवा क्रमबद्धता आहे. भरताच्या म्हणण्याप्रमाणे नाटकातील पात्रांची वेषभूषा वयाच्या अनुरूप असावी. वेषभूषेच्या अनुरूप पात्रांची गती असावी, गतीच्या अनुरूप पाठ्य असावे आणि पाठ्याच्या अनुरूप

अभिनय असावा. अनुरूपता किंवा अनुगतताच भरताला अपेक्षित आहे–

'वयोऽनुरूपः प्रथमस्तु वेषः वेषानुरूपश्च गतिप्रचारः ।

गतिप्रचारानुगतं च पाठ्यं, पाठ्यानुरूपोऽ अभिनयश्च कार्यः ।' १४/६८, नाट्यशास्त्र

पाठ्यभाषा, रस-स्वरूप, नाट्यस्वरूप, प्रवृत्तिनिरूपण, प्रकृतिविचार आणि भूमिकाविन्यास् यांचे वर्णन करताना भरताचा प्रयत्न औचित्य विचाराला प्रस्थापित करण्याचा आहे आणि या प्रयत्नातूनसुद्धा सुसंगतीचाच विचार प्रकट होतो. भरताचे ध्येय रस असल्याने त्याने त्याच दृष्टीने अनुरूपता किंवा औचित्य यांचे विवेचन केले आहे आणि अनुरूपता ही नेहमीच रस सिद्धीच्या प्रक्रियेत सहाय्यक मानली गेली आहे.

यालाच भामह 'युक्तता' किंवा 'सन्निवेश' असे म्हणतो. 'युक्तं लोकस्वभावेन रसैश्च सकलैः पृथक्' (काव्यालंकार, १/२१) असे सांगताना लोकस्वभाव हा औचित्याचा नियामक असतो असे सांगितले आहे आणि दोषयुक्त कथनसुद्धा सन्निवेश विशेषामुळे शोभादायक होते असेसुद्धा सांगितले आहे! भामहाच्या म्हणण्याप्रमाणे असाधू पदार्थसुद्धा साधू पदार्थाच्या संगतीने सुशोभित होत असतात. उदाहरणार्थ, काळे काजळसुद्धा सुंदर रमणीच्या डोळयांच्या संगतीने शोभादायक वाटते.

१. सन्निवेशविशेषात्तु दुरुक्तमपि शोभते ।

नीलं पलाशमाबद्धमन्तराले स्रजामिव ।।१/५४।।

२. किंचिद् आश्रय सौंदर्याद् धत्ते शोभामसाध्वपि ।

कातांविलोचनन्यस्त मलीमसमिवांजनम् ।।१/५५।। (काव्यालंकार)

हीच अनुरूपता किंवा हाच सन्निवेश– विशेष विचार प्राचीन आचार्यांच्या परंपरेत औचित्य विचार म्हणून मान्यता पावला. ध्वनिवादी आचार्य आनंदवर्धनापर्यंत ज्या वेळी हा विचार पोहोचला त्या वेळी रस आणि औचित्य विचार यांमध्ये असा काही घनिष्ट संबंध स्थापित झाला होता की, त्याच्या मते रसभंगाचे एकच कारण शक्य होते आणि ते म्हणजे अनौचित्य!

आनंदवर्धनाच्या मते रसाचे 'पराउपनिषद' किंवा परम रहस्य 'औचित्य' हेच आहे.

अनौचित्यादृते नान्यद्रसभंगस्य कारणम् ।

प्रसिद्धौचित्यबंधस्य रसस्योपनिषत्परा ।।३/१५।। ध्वन्यालोक ।

पुढे कुंतकाने पदौचित्यावर भाष्य करीत असताना वक्रता आणि औचित्य यांमध्ये अभिन्नता मानली आणि काव्याच्या प्रयोजनीय सौंदर्यालाच नूतनऔचित्य मानले–

व्यवहारपरिस्पंदसौंदर्यव्यवहारभिः ।

सत्काव्याधिगमादेव नूतनौचित्यमाप्यते ।।१/४।। (वक्रोक्तिजीवित)

याच प्रयोजनीय सौंदर्याचे, कुंतकाने साधारण आणि असाधारण असे दोन प्रकार मानले आणि औचित्य हाच काव्याचा साधारण म्हणजेच स्वाभाविक गुण असतो असे सांगितले

आणि या गुणांच्या अभावामुळे काव्य निरर्थक होते असे सुद्धा सांगितले. क्षेमेंद्राने औचित्य विचाराला स्वतंत्र सिद्धांत म्हणूनच मानले आणि त्यावर भाष्य करताना 'उचिता'लाच सदृश म्हणजेच 'अनुरूप' म्हटले आहे. अलंकारांचे अलंकारत्व उचित स्थानामुळेच मान्य होते तसेच औचित्यामुळेच अ-च्युत गुणाचे गुणत्व मान्य होते, असे सांगितले–

उचितं प्राहुराचार्याः सदृशं किल यस्य यत् ।
उचितस्य च यो भावस्तदौचित्यं प्रचक्षते ।।७।। औचित्यविचार चर्चा।
उचितस्थानविन्यासादलंकृतिरलंकृतिः ।
औचित्यादच्युतानित्यं भवन्त्येव गुणा गुणाः ।।६।। औचित्यविचार चर्चा।

थोडक्यात, भारतीय काव्यशास्त्रात वापरल्या गेलेल्या अनुरूपता, उचितस्थान विन्यास, अनुगतता आणि सदृशता या शब्दांतून सुसंगती असाच अर्थ निघतो. सहस्रबुद्धे यांनी 'शांकुतला'चे टीकाकार राघवभट्ट यांचा हवाला देऊन 'उचित सन्निवेश अथवा सुश्लिष्ट संधिबंध' म्हणून सुसंगतीला काव्याचा आत्मा मानले आहे. परंतु 'उज्ज्वलनीलमणी' आणि 'भक्तिरसामृतसिंधु'च्या कर्त्यांनी– रूपगोस्वामींनी स्पष्ट शब्दात ही गोष्ट आधीच सांगितलेली आहे–

अंगप्रत्यंगकानां यः सन्निवेशो यथोचितम् ।
सुश्लिष्ट संधिबंधः स्वात्तसौंदर्यमितीर्यते ।।उ. नी. ।।
'भवेत्सौंदर्यमंगानां सन्निवेशो यथोचितम्।'

(भ. र. सिं, दक्षिण विभाग प्रथमा विभाव लहरी, कारिका १२५ ।)

अशा प्रकारे डॉ. सहस्रबुद्धे यांनी सांगितलेल्या सुसंगती आणि क्रमबद्धता यांचा मूळ आधार प्राचीन भारतीय काव्यशास्त्रीय चिंतनात आहे. याचप्रमाणे सौंदर्यामुळे होणाऱ्या आनंदप्राप्तीबद्दलही म्हणता येईल; ही कल्पनासुद्धा परंपरामान्य अशीच आहे. काव्यशास्त्रातील सर्व संप्रदायांनी काव्याचे प्रयोजन म्हणून प्रीती, आल्हाद आणि आनंद यांचेच प्रतिपादन केले आहे. विशेषेकरून रससिद्धांतामध्ये तर सुसंगती किंवा क्रमबद्धता आणि आनंद यांची स्थिती युगपत् मानली गेली आहे. रससूत्राच्या चर्चेमध्ये विभावादींच्या उल्लेखाबरोबरच त्यांच्या संयोगाने रसनिष्पत्ती होते असे सांगितले आहे, याचा अर्थ विभावादींची फक्त एकत्रित उपस्थितीच नाही, तर त्यांतील परस्परअनुकूलता आणि संतुलनसुद्धा आवश्यक मानलेले आहे. विभावादींपैकी एक जरी थोडा इकडे-तिकडे झाला किंवा परस्परविपरीत झाला तर संपूर्ण व्यवस्था, क्रमबद्धता कोलमडून पडेल. काव्यातील प्रयुक्तीचे कारण असणारे विभावादी आपल्या विशिष्ट गतीमुळेच आनंददायक होत असतात. आनंदानुभव हाच रसाचा स्वभाव आहे. आनंद होण्याचे कारण अभ्यंतर आणि बाह्य यांची अनुकूलता हे आहे. रससूत्रामध्ये यानाच भाव-विभाव यांचा

संयोग असे म्हटले आहे. बाहेरच्याचे प्रतिनिधित्व विभाव करतात, तर भावानुभाव अभ्यंतराचे! दोघांच्या अनुकूल मीलनामधून किंवा संयोगातून किंवा घनिष्ट संबंधातून रसनिष्पत्ती होत असते. अशा तदात्म स्थितीमध्ये कुठलेच बाधक किंवा प्रतिकूल तत्त्व नसल्याने मन विकल होण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. यालाच मनाची विश्रांत अवस्था म्हटले आहे. या अवस्थेत आत्मचैतन्याचाच प्रकाश सर्वत्र असल्याने सर्वत्र आनंदच असतो. कारण आत्मचैतन्य हे नेहमीच आनंदरूप मानले गेले आहे. रससिद्धांताच्या शब्दातच सांगायचे म्हटले तर जो रस असतो तेच सौंदर्य असते. स्वभावतः रस हा आनंदात्मक, स्मृती, अनुमान आणि लौकिक स्वसंवेदनांच्या नेहमीच पलीकडला असल्याने विलक्षण किंवा चमत्कार करणारा मानला गेला आहे. अशा रसाचा अनुभवसुद्धा नेहमीच विलक्षण आनंददायक असतो. अशा तऱ्हेने सौंदर्याचा अनुभव हा नेहमीच विलक्षण आनंददायक आणि चमत्कार निर्माण करणारा असतो. सौंदर्य आणि रसाच्या या संबंधाकडे कुंतकाचेसुद्धा लक्ष गेलेले आहे. अन्य पर्यायवाचक शब्द जरी उपलब्ध असले तरी विवक्षित अर्थवाचक शब्दच खऱ्या अर्थाने 'शब्द' असतो आणि सहृदय आल्हादक स्वभाव सुंदर अर्थच खराखुरा 'अर्थ' असतो–

शब्दो विवक्षितार्थैकवाचकोऽन्येषु सत्स्वपि ।
अर्थः सहृदयाल्हादकारि स्वरुपसुंदरः ।।१/९।। व. जी. ।

काव्यातील या 'आल्हादक' आणि 'स्वभावसुंदर' अर्थतत्त्वाला कुंतकाने अतिशय महत्वाचे स्थान दिले आहे. कुंतकाच्या मताने या तत्त्वांमुळेच काव्य वाचत असताना आणि वाचनानंतरसुद्धा ते प्रवाहित होणाऱ्या रसाने सुंदर होते–

आयत्यांच तदात्वंच रसनिः स्यंदसुंदरम् ।
येन संपद्यते काव्यं तदिदानीं विचार्यते । कारिका ५, अंतःश्लोक।

कुंतकाच्या म्हणण्याप्रमाणे 'सहृदय आल्हादकत्व' किंवा 'रंजकत्व' म्हणजेच सौंदर्य होय (आणि ज्या काव्यात हे तत्त्व असते ते काव्य सुंदर असते.)

वाच्यवाचकवक्रोक्तित्रितयातिशयोत्तरम् ।
तद्विदाल्हादकारित्वं किमप्यामोद सुंदरम् ।।१/२३।। व. जी.

अन्यच किदृशम्– 'किमप्यामोदसुंदरम् । किमप्यव्यपदेश्यं सहृदयहृदयसंवेद्यं, आमोदः सुकुमारवस्तुधर्मो रंजकत्वं नाम, तेन, सुंदरं रंजकत्वं रमणीयम् ।— हिंदी वक्रोक्तिजीवितम्, पृ. ९७.

या सर्व विवेचनाचा असा निष्कर्ष काढता येईल की सौंदर्य म्हणजे सामान्य अर्थाने रस शब्दाचा पर्यायवाची शब्द आहे. विशिष्ट रसाच्या अर्थाने याचा उपयोग केलेला नाही. डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे नेमके या ठिकाणीच आपले भिन्न मत नोंदवतात, सौंदर्य भावनेला एक स्वतंत्र प्रवृत्ती मानतात आणि एकदम नवीन अशा 'सौंदर्यरसा'ची कल्पना करतात, जणू काही शृंगारादी नऊ रसानंतर हा दहावा रस आहे!

मानसशास्त्रीय दृष्टीने सौंदर्यप्रवृत्ती स्वीकारण्यात काहीच अडचण नाही आणि तशी ती मान्य पण झालेली आहे. तसेच प्राचीन भारतीय काव्यशास्त्रामध्येसुद्धा सौंदर्यप्रवृत्तीचे अस्तित्व कुणीही नाकारलेले नाही. परंतु संपूर्ण काव्यशास्त्रात कुणीही सौंदर्यरसाची कल्पनासुद्धा करीत नाही.

मानव संस्कृतीची वर्णने वाचून एक गोष्ट स्पष्ट होते आणि ती म्हणजे सृजन किंवा रचना करणे, विसंगती असेल तिथे सुसंगती स्थापित करणे, विशृंखलता असेल तिथे क्रमबद्धता स्थापित करणे, निसर्गातील जड घटकांना एकत्रित आणून त्यांच्या क्रमबद्ध मांडणीतून नवनिर्मिती करणे इत्यादीसुद्धा माणसाच्या काम, युद्ध, वात्सल्य इत्यादींप्रमाणे सहज किंवा मूळ प्रवृत्तीच आहेत. प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञ मॅक्डुगल यांनीसुद्धा या प्रवृत्तीचे नामकरण कंस्ट्रक्शन असे केले आहे. आणि मूळ प्रवृत्तींच्या यादीमध्ये हिचा समावेश सुद्धा केला आहे. म्हणूनच इतर प्रवृत्तींपासून जशी वेगवेगळया रसांची निष्पत्ती होते असे मानले आहे, तसेच या प्रवृत्तीपासून सौंदर्य रसाची निष्पत्ती मानली जावी. डॉ. सहस्रबुद्धे यांनी दिलेल्या या कारणमीमांसेबद्दल इतकेच सांगता येईल की मॅकडुगल यांनी पहिल्यांदा चौदा मूळ प्रवृत्तींची यादी दिली आहे आणि नंतर अठरा प्रवृत्तींची. पहिल्या यादीमध्ये भोजनोपार्जनाचा समावेश आहेच आणि नंतर जी चार नावे जोडली त्यांमध्ये शरीर सुखासाठी उत्तम घर, आराम किंवा झोप, भ्रमण आणि खोकणे, शिंकणे, श्वासोच्छ्वास सारख्या बाबींचा समावेश केला आहे.

रससिद्धांतातील स्थायी भावांच्या यादीत वरील प्रवृत्तींचा अंतर्भाव नाही. एकतर भूक वगैरेचा संबंध शरीराशी आहे आणि दुसरे म्हणजे या सर्वांचा अंतर्भाव एकमेकात कोणत्या ना कोणत्या पातळीवर होतच असतो. निर्माणाच्या प्रवृत्तीचा मूळ संवेगाचा-सर्जनोत्साहाचा अंतर्भाव आत्मप्रतिष्ठारूप अहंकारात किंवा परिग्रहजन्य अधिकार भावनेत होतच असतो. सर्जनोत्साहाला स्थायीभाव मानण्यात अशी अडचण आहे की उत्साह या स्थायीभावामुळे वीर रसाची निष्पत्ती होत असते, हा स्थायीभाव सौंदर्यासारख्या ललितभावाला अभिव्यक्त करीत नाही. म्हणूनच सर्जनोत्साहाचा जरी अहंकार किंवा अधिकार भावनेशी संबंध आहे असे मानले, तरी त्यांमध्ये त्याचा अंतर्भाव करता येणार नाही. युंग आणि एडलर यांचा हवाला देऊन यांच्यातील संबंधाची कल्पना करता येईल, पण फक्त यांच्यापुरतेच मर्यादित ठेवणे योग्य होणार नाही. असे असले तरी रेनल्ड फ्लॅचर यांनी मूळ प्रवृत्तींच्या यादीमध्ये ज्या प्रकारच्या स्फूर्ती आणि उत्साहाचा उल्लेख केला आहे त्याच्या क्रीडा आणि कौतुहलाच्या रूपात सर्जनोत्साहाचा अंतर्भाव केला जाऊ शकेल.

खरे पाहता कलानिर्मितीचा संबंध माणसाच्या जिज्ञासा, काम किंवा रमणेच्छेशी जास्त आहे, प्रत्यक्ष निर्मितीशी नाही. सौंदर्य रचनेच्या प्रवृत्तीत नवीन आकारांचे अन्वेषण, सृजन आणि निर्मित रूपाबद्दल स्निग्ध आकर्षण म्हणजेच कुतुहल किंवा विस्मय, काम किंवा प्रेम यांच्या बरोबरीनेच उत्साह भावही थोड्याफार प्रमाणात असतो. सौंदर्य भावनेचा

तर कामवृत्तीशी घनिष्ट संबंध मानलेला आहेच. शिवाय अवस्थाभेदानुसार या भावनेचे ऐंद्रिय किंवा स्थूल आणि मानसिक किंवा सूक्ष्म असे प्रकारही केलेले आहेत. आपल्या अधिक संवेदनशक्तीच्या साहाय्याने कलाकार आपल्या निर्मितीत सौंदर्यभावनेच्या सूक्ष्म रूपालाच अधिकाधिक वाव देत असतो. थोडक्यात म्हणजे सौंदर्यभावना ही रती, भय, विस्मय इत्यादींप्रमाणे स्वतंत्र किंवा अन्य-भाव-निरपेक्ष अशी भावना नाही. उलट या भावनेत इतर संवेगाचे थोड्याफार प्रमाणात मिश्रणच झालेले आहे. अशा परिस्थितीत सौंदर्यभावनेला स्वतंत्र स्थायीभाव मानून स्वतंत्र सौंदर्यरसाची निष्पत्ती होते असे मानणे निव्वळ अशक्य आहे.

सौंदर्य ही स्वतंत्र भावना आहे का नाही याबद्दल स्वतः सहस्रबुद्धे साशंक आहेत. पण दुसऱ्या बाजूने ते प्रेम, भय, क्रोध यंच्या बरोबरीने सौंदर्यभावना स्वतंत्र आहे असेही मानतात. डॉ. नगेंद्र यांनी आपल्या 'रससिद्धांत' नामक ग्रथांत पृ. २६७ वर शांत रसाच्या चर्चेमध्ये, शम या स्थायिभावाच्या संदर्भात घेतल्या जाणाऱ्या आक्षेपाबद्दल सांगितले आहे की 'शम' भावामध्ये समस्त भावांची समाहिती असते असे म्हणणे तर्कशुद्ध होणार नाही, हा विचारच तर्कसंगत होऊ शकत नाही. हाच तर्क सौंदर्यभावनेवर लागू केला तर सौंदर्य रसाच्या संदर्भात अन्य बाजूंनी विचार करणे सुद्धा अगत्याचे होईल. या बाबतीत सर्वात महत्त्वाची बाजू म्हणजे 'चित्ताची समाहित अवस्था तरी स्वतंत्रपणाने अनुभूतीचा विषय होऊ शकते का नाही?' ही होय.

या सर्व विवेचनामधून एक गोष्ट लक्षात येते आणि ती म्हणजे डॉ. सहस्रबुद्धे हे रती, हास यांच्याबरोबरीनेच सौंदर्यभावनेला स्थान देतात आणि हास्य रसाच्या विशेष संदर्भामध्ये हास्याचे मूळ विसंगती असल्याचे सांगतात. त्यांच्या मते ज्याप्रमाणे हास्याचे मूळ विसंगतीत आहे, त्याप्रमाणेच सौंदर्य रसाचे मूळ सुसंगतीत आहे. परंतु हा विचार मांडत असताना सहस्रबुद्धे यांना इतर रसांमध्ये सुद्धा सुसंगती असतेच याचा विसर पडलेला दिसतो. क्षणभर असे जरी मानले की इतर रसांचा सुसंगतीशी किंवा विसंगतीशी काहीही संबंध नाही, तरी या म्हणण्यासाठी पुरावे देणे नक्कीच आवश्यक आहे; जर अन्य रसांमध्येही सुसंगती असते, असे मान्य केले तर मग हे सिद्ध करून दाखवणे अगत्याचे आहे की सुसंगतीमुळे 'सौंदर्य रसाची' किंवा 'फक्त सौंदर्य रसाचीच' निष्पत्ती होते. सुसंगती काय फक्त सौंदर्यरसातच असते?

या प्रश्नाबद्दल विचार करण्यापूर्वी हे पण लक्षात घ्यायला हवे की डॉ. सहस्रबुद्धे सौंदर्य रसाची संकल्पना रचनेच्या किंवा नवनिर्मितीच्या सम्यक् संदर्भात करीत आहेत; म्हणजेच कलाकृतीच्या सम्यक् प्रभावामुळे निर्माण होणाऱ्या सौंदर्याच्या संदर्भात चर्चा करीत आहेत. पण अशा उद्देशाने ज़री ते चर्चा करीत आहेत तरी त्यांचा आव मात्र नऊ रसांमध्ये दहाव्या सौंदर्यरसाची भर घालावी असाच आहे. खरे पाहता सहस्रबुद्धे यांच्यासमोर कलाकृतीच्या रचनेचा किंवा निर्मितीचा क्रमिक मार्ग अजिबात दिसत नाही. ते

कलाकृतीचा विचार सम्यक् रूपाच्या अंगानेच करताना दिसतात. परिणामतः डॉ. सहस्रबुद्धे यांनी पारंपरिक पद्धतीने निर्मित होणाऱ्या आवयविक आकारांची, त्यातील नवीन पद्धतीची, संपूर्ण कलाकृतीची निर्मिती आणि तदनुषंगिक अंगांचीच चर्चा करतात. आणि सम्यक् कलाकृतीतच सौंदर्य असते असा निष्कर्ष काढतात. डॉ. सहस्रबुद्धे यांच्या या तर्काने गेले असता शृंगारादी रस हे सम्यक् कृतीच्या मार्गावरील अधले-मधले टप्पेच मानावे लागतात. आणि या सर्व टप्प्यांना मागे टाकून कृतीच्या सम्यकपणावर आधारित फक्त सौंदर्य रसच निष्पन्न होतो. असे जर मानले नाही तर हास्य रसाचे काहीच महत्त्व उरणार नाही! सहस्रबुद्धे यांच्या मताप्रमाणे संपूर्ण कलाकृतीमध्येच हास्य रस असतो असे मानले तर हेही मान्य करावे लागेल की, हास्य रसात्मक रचनाप्रक्रिया ही विसंगतीशी संबंधित असते. परंतु डॉ. सहस्रबुद्धे सदैव सुसंगती असण्याबद्दल आग्रही आहेत. डॉक्टरांच्या म्हणण्याप्रमाणे जर तात्पर्य काढायचे म्हटले तर हास्य रसात्मक कृतीला सुंदर म्हणता येणार नाही आणि जर सुंदर म्हणायचे असेल तर हे मान्य करायला लागेल की कलाकाराने हास्य रसाच्या निष्पत्तीसाठी विसंगत स्थितींचे, विसंगत अनुभवांचे असे काही सुसंगठित रूप सादर केले आहे की, प्रत्येक प्रसंगात ते हास्य रसाला अनुरूप आणि सुसंगत असेच आहे. अर्थात् हे मान्य करताना हास्य-कृती निर्माण करत असताना कलाकाराने विसंगतींनासुद्धा सुसंगतपणे सादर केले आहे असे मानावे लागेल. तरच ती कृती सुंदर आहे असे म्हणता येईल आणि तरच त्या कलाकृतीमुळे आनंद होईल आणि तरच ती कृती हास्य रसाच्या पलीकडे जाऊन सौंदर्य रसाचा अनुभव देऊ शकेल.

याच तर्काच्या आधाराने पुढे जाऊन असे सिद्ध करता येईल की ज्याला सहस्रबुद्धे सौंदर्यरस म्हणू इच्छितात ती रसांची औपधिक नामभेदाची स्थिती नसून अद्वैत, अखंड आणि अनौपाधिक रसाची साधी कल्पना आहे. सौंदर्यरस इथे अंगी रस नाही हे लक्षात घ्यायला हवे. सौंदर्यरस अंगीरस नसण्याची चार कारणे देता येतात. पहिले म्हणजे प्रत्येक कलाकृतीत अंगीरस वेगवेगळा असतो, परंतु डॉ. सहस्रबुद्धे यांच्या म्हणण्याप्रमाणे प्रत्येक कलाकृतीत फक्त सौंदर्यरसच असतो. दुसरे म्हणजे महाकाव्यात शृंगार, वीर, शांत पैकी एकाच रसाला अंगीरस मानले जाते, अन्य कोणत्याही रसाला अंगीरसाचे स्थान दिले गेलेले नाही. 'शृंगारवीरशांतानामेकोऽङगीरस इष्यते।' (साहित्यदर्पण, ६/३१७) तिसरे म्हणजे, ध्वन्यालोककारांच्या मते अंगीरस हा सर्वत्र व्याप्त नसतो आणि तो पुनः पुनः 'अनुसंधीयमान' असला पाहिजे. (प्रबंधेषु प्रथमतरं प्रस्तुतः सन्-पुनः अनुसंधीयमानत्वेन-स्थायी यो रसः ।' ध्वन्यालोक, ३/२२ ची वृत्ती.) परंतु डॉक्टरसाहेबांचा सौंदर्यरस सर्वत्र व्याप्त-स्वरूपाचा तरी आहे किंवा परिणती स्वरूपाचा तरी आहे, पुनः पुनः अनुसंधीयमान तर तो नक्कीच नाही. चौथे कारण म्हणजे अंगीरसाची निष्पत्ती एक तर नायकाच्या कार्यव्यापारापासून व्हायला हवी किंवा त्याला प्राप्त होणाऱ्या फलाच्या आधारे तरी व्हायला हवी. परंतु सौंदर्य रसाची निष्पत्ती या दोन्हीमुळेही होत नाही. थोडक्यात सांगायचे झाले तर अंगीरस म्हणून

तर कामवृत्तीशी घनिष्ट संबंध मानलेला आहेच. शिवाय अवस्थाभेदानुसार या भावनेचे ऐंद्रिय किंवा स्थूल आणि मानसिक किंवा सूक्ष्म असे प्रकारही केलेले आहेत. आपल्या अधिक संवेदनशक्तीच्या साहाय्याने कलाकार आपल्या निर्मितीत सौंदर्यभावनेच्या सूक्ष्म रूपालाच अधिकाधिक वाव देत असतो. थोडक्यात म्हणजे सौंदर्यभावना ही रती, भय, विस्मय इत्यादींप्रमाणे स्वतंत्र किंवा अन्य-भाव-निरपेक्ष अशी भावना नाही. उलट या भावनेत इतर संवेगाचे थोड्याफार प्रमाणात मिश्रणच झालेले आहे. अशा परिस्थितीत सौंदर्यभावनेला स्वतंत्र स्थायीभाव मानून स्वतंत्र सौंदर्यरसाची निष्पत्ती होते असे मानणे निव्वळ अशक्य आहे.

सौंदर्य ही स्वतंत्र भावना आहे का नाही याबद्दल स्वतः सहस्रबुद्धे साशंक आहेत. पण दुसऱ्या बाजूने ते प्रेम, भय, क्रोध यंच्या बरोबरीने सौंदर्यभावना स्वतंत्र आहे असेही मानतात. डॉ. नगेंद्र यांनी आपल्या 'रससिद्धांत' नामक ग्रथांत पृ. २६७ वर शांत रसाच्या चर्चेमध्ये, शम या स्थायिभावाच्या संदर्भात घेतल्या जाणाऱ्या आक्षेपाबद्दल सांगितले आहे की 'शम' भावामध्ये समस्त भावांची समाहिती असते असे म्हणणे तर्कशुद्ध होणार नाही, हा विचारच तर्कसंगत होऊ शकत नाही. हाच तर्क सौंदर्यभावनेवर लागू केला तर सौंदर्य रसाच्या संदर्भात अन्य बाजूंनी विचार करणे सुद्धा अगत्याचे होईल. या बाबतीत सर्वांत महत्त्वाची बाजू म्हणजे 'चित्ताची समाहित अवस्था तरी स्वतंत्रपणाने अनुभूतीचा विषय होऊ शकते का नाही?' ही होय.

या सर्व विवेचनामधून एक गोष्ट लक्षात येते आणि ती म्हणजे डॉ. सहस्रबुद्धे हे रती, हास यांच्याबरोबरीनेच सौंदर्यभावनेला स्थान देतात आणि हास्य रसाच्या विशेष संदर्भामध्ये हास्याचे मूळ विसंगती असल्याचे सांगतात. त्यांच्या मते ज्याप्रमाणे हास्याचे मूळ विसंगतीत आहे, त्याप्रमाणेच सौंदर्य रसाचे मूळ सुसंगतीत आहे. परंतु हा विचार मांडत असताना सहस्रबुद्धे यांना इतर रसांमध्ये सुद्धा सुसंगती असतेच याचा विसर पडलेला दिसतो. क्षणभर असे जरी मानले की इतर रसांचा सुसंगतीशी किंवा विसंगतीशी काहीही संबंध नाही, तरी या म्हणण्यासाठी पुरावे देणे नक्कीच आवश्यक आहे; जर अन्य रसांमध्येही सुसंगती असते, असे मान्य केले तर मग हे सिद्ध करून दाखवणे अगत्याचे आहे की सुसंगतीमुळे 'सौंदर्य रसाची' किंवा 'फक्त सौंदर्य रसाचीच' निष्पत्ती होते. सुसंगती काय फक्त सौंदर्यरसातच असते?

या प्रश्नाबद्दल विचार करण्यापूर्वी हे पण लक्षात घ्यायला हवे की डॉ. सहस्रबुद्धे सौंदर्य रसाची संकल्पना रचनेच्या किंवा नवनिर्मितीच्या सम्यक् संदर्भात करीत आहेत; म्हणजेच कलाकृतीच्या सम्यक् प्रभावामुळे निर्माण होणाऱ्या सौंदर्याच्या संदर्भात चर्चा करीत आहेत. पण अशा उद्देशाने ज़री ते चर्चा करीत आहेत तरी त्यांचा आव मात्र नऊ रसांमध्ये दहाव्या सौंदर्यरसाची भर घालावी असाच आहे. खरे पाहता सहस्रबुद्धे यांच्यासमोर कलाकृतीच्या रचनेचा किंवा निर्मितीचा क्रमिक मार्ग अजिबात दिसत नाही. ते



अनुक्रमणिका

कलाकृतीचा विचार सम्यक् रूपाच्या अंगानेच करताना दिसतात. परिणामतः डॉ. सहस्रबुद्धे यांनी पारंपरिक पद्धतीने निर्मित होणाऱ्या आवयविक आकारांची, त्यातील नवीन पद्धतीची, संपूर्ण कलाकृतीची निर्मिती आणि तदनुषंगिक अंगांचीच चर्चा करतात. आणि सम्यक् कलाकृतीतच सौंदर्य असते असा निष्कर्ष काढतात. डॉ. सहस्रबुद्धे यांच्या या तर्काने गेले असता शृंगारादी रस हे सम्यक् कृतीच्या मार्गावरील अधले-मधले टप्पेच मानावे लागतात. आणि या सर्व टप्प्यांना मागे टाकून कृतीच्या सम्यक्पणावर आधारित फक्त सौंदर्य रसच निष्पन्न होतो. असे जर मानले नाही तर हास्य रसाचे काहीच महत्त्व उरणार नाही! सहस्रबुद्धे यांच्या मताप्रमाणे संपूर्ण कलाकृतीमध्येच हास्य रस असतो असे मानले तर हेही मान्य करावे लागेल की, हास्य रसात्मक रचनाप्रक्रिया ही विसंगतीशी संबंधित असते. परंतु डॉ. सहस्रबुद्धे सदैव सुसंगती असण्याबद्दल आग्रही आहेत. डॉक्टरांच्या म्हणण्याप्रमाणे जर तात्पर्य काढायचे म्हटले तर हास्य रसात्मक कृतीला सुंदर म्हणता येणार नाही आणि जर सुंदर म्हणायचे असेल तर हे मान्य करायला लागेल की कलाकाराने हास्य रसाच्या निष्पत्तीसाठी विसंगत स्थितींचे, विसंगत अनुभवांचे असे काही सुसंगठित रूप सादर केले आहे की, प्रत्येक प्रसंगात ते हास्य रसाला अनुरूप आणि सुसंगत असेच आहे. अर्थात् हे मान्य करताना हास्य-कृती निर्माण करत असताना कलाकाराने विसंगतींनासुद्धा सुसंगतपणे सादर केले आहे असे मानावे लागेल. तरच ती कृती सुंदर आहे असे म्हणता येईल आणि तरच त्या कलाकृतीमुळे आनंद होईल आणि तरच ती कृती हास्य रसाच्या पलीकडे जाऊन सौंदर्य रसाचा अनुभव देऊ शकेल.

याच तर्काच्या आधाराने पुढे जाऊन असे सिद्ध करता येईल की ज्याला सहस्रबुद्धे सौंदर्यरस म्हणू इच्छितात ती रसांची औपधिक नामभेदाची स्थिती नसून अद्वैत, अखंड आणि अनौपाधिक रसाची साधी कल्पना आहे. सौंदर्यरस इथे अंगी रस नाही हे लक्षात घ्यायला हवे. सौंदर्यरस अंगीरस नसण्याची चार कारणे देता येतात. पहिले म्हणजे प्रत्येक कलाकृतीत अंगीरस वेगवेगळा असतो, परंतु डॉ. सहस्रबुद्धे यांच्या म्हणण्याप्रमाणे प्रत्येक कलाकृतीत फक्त सौंदर्यरसच असतो. दुसरे म्हणजे महाकाव्यात शृंगार, वीर, शांत पैकी एकाच रसाला अंगीरस मानले जाते, अन्य कोणत्याही रसाला अंगीरसाचे स्थान दिले गेलेले नाही. 'शृंगारवीरशांतानामेकोऽङ्गीरस इष्यते।' (साहित्यदर्पण, ६/३१७) तिसरे म्हणजे, ध्वन्यालोककारांच्या मते अंगीरस हा सर्वत्र व्याप्त नसतो आणि तो पुनः पुनः 'अनुसंधीयमान' असला पाहिजे. (प्रबंधेषु प्रथमतरं प्रस्तुतः सन्-पुनः अनुसंधीयमानत्वेन स्थायी यो रसः ।' ध्वन्यालोक, ३/२२ ची वृत्ती.) परंतु डॉक्टरसाहेबांचा सौंदर्यरस सर्वत्र व्याप्त स्वरूपाचा तरी आहे किंवा परिणती स्वरूपाचा तरी आहे, पुनः पुनः अनुसंधीयमान तर तो नक्कीच नाही. चौथे कारण म्हणजे अंगीरसाची निष्पत्ती एक तर नायकाच्या कार्यव्यापारापासून व्हायला हवी किंवा त्याला प्राप्त होणाऱ्या फलाच्या आधारे तरी व्हायला हवी. परंतु सौंदर्य रसाची निष्पत्ती या दोन्हीमुळेही होत नाही. थोडक्यात सांगायचे झाले तर अंगीरस म्हणून



अनुक्रमणिका

सौंदर्यरसाची कल्पना करून घोळ वाढवण्यात अर्थ नाही!

नऊ रसांच्या बरोबरीने दहाव्या सौंदर्य रसाच्या कल्पनेचा विरोध कालिदासाच्या म्हणण्याप्रमाणेसुद्धा होतो. कालिदासाच्या म्हणण्याचा आधार रसनिष्पत्ती समजून घेत असता स्वतः अभिनव गुप्तानेसुद्धा घेतला आहे. कालिदासाच्या म्हणण्याप्रमाणे कोणतीही रम्य वस्तू किंवा दृश्य पाहिल्यामुळे किंवा मधुर शब्द ऐकल्यामुळे माणसाचे मन पर्युत्सुक होते, मग तो माणूस सुखी असला तरीही बेचैन होतोच. कदाचित् ही व्याकुळता पूर्वजन्मीच्या स्थिर भावांच्या आणि प्रेमसंबंधांच्या अजाणतेपणी झालेल्या आठवणींमुळेही असू शकेल.

'रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान्
पर्युत्सको भवति यत् सुखितोऽपि जंतुः
तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वम्
भावास्थिरासाणि हि जननांतरसौहृदानि । अ. शाकुंतल ५/२

वेगळ्या शब्दात सांगायचे झाले तर म्हणता येईल की खोलवर पाहिले असता मनुष्याच्या उपचेतन किंवा अचेतन मनाशी सौंदर्याचा संबंध आहे असे दिसते. सौंदर्याची अनुभूती झाली असता अगदी अजाणतेपणाने अचेतन मनात दडलेले सौंदर्य-संस्कार आणि अनेक भाव उद्‌बुद्ध होत असतात. सौंदर्यामुळे माणसाच्या विविध चित्तवृत्ती चाळवल्या जातात असाच ह्याचा अर्थ आहे. ह्या चित्तवृत्तीच किंवा वासनारूपाने संस्थित भावच विभावादिमुळे पुष्ट होऊन विशिष्ट रस होत असतात, फक्त सौंदर्य रसातच त्यांची परिणती होत नाही हे लक्षात घ्यायला हवे.

डॉ. सहस्रबुद्धे यांच्या मते सौंदर्यरसाच्या मुळाशी रचना-प्रवृत्ती किंवा नव-निर्मितीची इच्छाच असते, पण याच बरोबर ते असेसुद्धा म्हणतात की प्रत्येक रसाच्या मुळाशी सौंदर्य भावनाच असल्याने दर वेळी वेगळे भाष्य करण्याची गरज नाही, कारण प्रत्येक कलाकृतीत एखादा रस असलाच पाहिजे असा काही दंडक नाही. या म्हणण्याचा रोख असा की मुख्य सौंदर्यवृत्ती स्वतःच अन्यान्य भावांना जागृत करेल, ते भाव मग परिपुष्ट होत-होत रस होतील. परंतु ज्या वेळी ते फक्त सौंदर्यरसाची निरपेक्ष कल्पना करून त्याला स्वतंत्र अस्तित्व देऊ पाहतात तेव्हाच अडचणीत येतात. मीनाक्षी मंदिर, कोणार्क, ताजमहाल, पिरॅमिड, फूल, इंद्रधनुष्य, नक्षत्र निसर्गदत्त वस्तू– इतकेच नाही, तर विषय– निरपेक्ष रागदारी आणि नृत्यातील पदन्यास किंवा हालचाली यामध्येही फक्त सौंदर्यरस मानतात, इतर कुठल्याही रसाची ते या ठिकाणी कल्पनासुद्धा करीत नाहीत.

डॉ. सहस्रबुद्धे वास्तुकला, नृत्यकला, संगीतकला आणि निसर्गातील विशेष दृश्य यांत सौंदर्यरस मानण्याबाबत अधिक आग्रही आहेत. वास्तुकलेबाबतच विचार केला तर या कलेपासून फक्त सौंदर्याचाच अनुभव मिळतो असे म्हणणे रास्त नाही. वास्तुकलेच्या बाह्य रूपाबद्दलच सांगत असताना आपण दृष्टीची संकीर्णता पत्करीत असतो. वास्तूची

रचना ही मुळात प्रतीकात्मक असते आणि प्रतीकात्मक दृश्य रूपाच्या पलीकडच्या अर्थाचा बोध आपल्याला होत नाही. काव्याच्या बाबतीत ज्याप्रमाणे मूर्त शब्द रूपाच्या-वाच्यार्थाच्या पलीकडील व्यंजित अर्थाचा, निहित अर्थाचा आपल्याला बोध होत असतो, तसेच वास्तुकलेच्या बाबतीतही व्हायला हवे. वास्तू घडविण्यामागचे उद्दिष्ट लक्षात घेतल्याशिवाय वास्तूचे खरे सौंदर्य आणि रहस्य आपल्याला समजू शकत नाही. डॉ. सहस्रबुद्धे हे प्रयोजनाला मानतात. ते कलाकाराच्या उद्दिष्टाला आणि अनुभूतीला महत्त्व देतात. मंदिर, मशीद, चर्च, गुरुद्वार असो किंवा ताजमहाल आणि पिरॅमिड असो; या सगळ्यांचा संबंध धर्मभावनेशी आणि मानवीय संबंधाशी आहे. वास्तुकलेच्या नियमानुसार आकार-प्रकारात उभ्या असलेल्या प्रत्येक मूर्त वस्तूतून, कोनातून प्रत्येक धर्माच्या 'अभिप्रायांची'च अभिव्यक्ती प्रतीकात्मक पद्धतीने झालेली असते. या सर्व वास्तू बघणे म्हणजे चित्रे, मूर्ती, दगड आणि दगडांचे रंगरूप बघणे नव्हे, तर या सर्वांपलीकडला संकेतार्थ बघणे होय. किंबहुना हा अर्थ पाहणे हेच अधिक महत्त्वाचे असते. हे संकेतार्थ जगाची मोहकता, परिवर्तनशीलता, नश्वरता, क्षणभंगुरपणा आणि ईश्वरीय माहात्म्य यांची अनेक रूपांमध्ये ओळख पटवत असतात. या अनुभवामुळे माणसातील राग-विरागांचे रूपांतर भक्ती, निर्वेद इत्यादी भावनांमध्ये होते, या भावनात्मक वातावरणात मन रमते आणि एकूण वेगळ्याच प्रकारची अनुभूती येते. ताजमहाल, पिरॅमिड किंवा एखादी समाधी घेतली तर त्यांच्या बाह्य आकार-प्रकाराचे सौंदर्य वा आकर्षण दिसतेच. सामान्यतः प्रेक्षक बाह्यरूपाकारातच अडकून राहातात. त्या कलाकृतीच्या गूढ आशयापर्यंत ते पोहोचत नाहीत. वास्तविक त्या कलाकृतीची सार्थकता या गूढ आशयातच असते.

"स्मारक, मंदिर, स्तूप, समाधी इत्यादींचा तसे पाहता उपयोग असा काहीच नसतो, परंतु वास्तुनिर्माता या कलाकृतींच्या माध्यमातून राष्ट्रीय परिणामकारकता आणि भावनात्मक प्रतिमानांची निर्मिती करीत असतो. या सगळ्याचा एकत्रित परिणाम राष्ट्राचा जिवंतपणा, राष्ट्राचे पावित्र्य आणि राष्ट्राचे ओझरते रूप दाखविण्यात अपरिहार्यपणाने होत असतो. या कलाकृतींमध्ये फक्त सौंदर्यात्मक आकर्षण नसते, तर राष्ट्रीय सभ्यता आणि संस्कृतीचे जिवंत प्रतिमान म्हणूनही यांचे आकर्षण तितकेच जबरदस्त असते." डॉ. रामलखन शुक्ल नेमका हाच आशय व्यक्त करतात.

वास्तुकला आणि सौंदर्य व रस यांतील संबंधाबद्दल डॉ. शुक्ल यांचे पुढील मत लक्षणीय आहेः "बाह्य साधनसामग्रीला मुख्य मानल्यामुळे वास्तुकृती आत्मतत्त्वहीन होते. म्हणूनच वास्तुकार आणि प्रमाता यांच्या तादात्म्याचा प्रश्न अनाठायी ठरतो. परंतु वास्तुकृतीच्या भव्यतेमुळे तन्मयीभवनाची क्रिया सुरू होते. परिणामतः वास्तुकृतीमुळे 'विस्मय' भावाचा उद्रेक होतो आणि त्याची परिणती अद्भुत रसाच्या अनुभूतीमध्ये होते. याचबरोबर वास्तुकृतीचा आकारही जर विशाल, पृथुल आणि भीमकाय असेल तर विस्मयाबरोबर भय आणि कंप यांचा अनुभवसुद्धा प्रेक्षक घेतो. वास्तुकृतीचा

आकार-प्रकार आणि सभोवतालचे वातावरण यामुळे शांत, शृंगार, वीर, करुण इत्यादी रसांचा अनुभव रसिकाला घेता येतो. स्वतः भरतमुनींनी या मताचे समर्थन केले आहे. वास्तुकृतिजन्य अनुभव म्हणजेच आश्चर्य हा अनुभव वास्तुकृतीशी संबद्ध तर असतोच, पण रसिकाच्या संपूर्ण चित्तवृत्तीवर आपले प्रभुत्व स्थापन करतो. (नाट्यशास्त्र, १/३३०) अशा प्रकारे वास्तुकलेचा रसाभिव्यक्तीशी प्रत्यक्ष आणि सरळ-सरळ संबंध आहे. वास्तुकृतिनिर्मितीचे प्रयोजन सौंदर्यनिर्मितीबरोबरच उपयुक्त रसानुभूती हेही असते. म्हणूनच इतर कलांप्रमाणेच वास्तुकलासुद्धा सौंदर्यनिर्मिती आणि रसनिष्पत्तीशी संबद्ध आहे." (भारतीय सौंदर्यशास्त्र का तात्त्विक विवेचन एवं ललित कलाएँ, पृ. २०१-२०२)

वास्तुकलाकृतीमुळे अनेक रसांची आणि आध्यात्मिक सिद्धांतांची निष्पत्ती होते व यामुळे प्रेमादी भावनांची अभिव्यक्ती होते असे मत श्री. हरद्वारीलाल शर्मा मांडतात. (सौंदर्यशास्त्र, पृष्ठ २१३-२१४) "परंतु मनुष्य वास्तुकृतींची निर्मिती केवळ सौंदर्य किंवा शुद्ध रूपनिर्मिती म्हणून करीत नाही, तर या कलाकृतींच्या माध्यमातून आध्यात्मिक भावनांची अभिव्यंजनाच तो मुख्यतः करीत असतो. ह्या कलाकृतींच्या बाह्य रूपात तो नवीन अर्थ भरत असतो. जणूकाही एखादा कवी शब्दांत अर्थ भरत असतो. अशा परिस्थितीत ते 'भवन' जणू 'काव्य'च वाटू लागते, त्याच्या अंग-प्रत्यंगातून अलंकार, प्रतिमान निर्मिती, रंग, आकार-प्रकारातून एक काव्यच ध्वनित होत असते. विशिष्ट सजावटीतून कुठे वीर रस निष्पन्न होतो, तर कधी शृंगार, तर कधी हास्य रसाची निष्पत्ती होत असते तर कधी गंभीर तत्वज्ञान धार्मिक सिद्धांत, प्रेम, प्रणय, भक्ती इत्यादी भावनांची अभिव्यक्ती त्या भवनातून होऊ लागते."

नर्तनकला शारीरिक हालचालींशी संबंधित असल्याने स्वाभाविकपणेच या कलेतून रती आदी भावांचे दर्शन घडविणे शक्य होत असते, याचीच निष्पत्ती पुढे रसामध्ये होते. परंतु गायन-वादन आणि नर्तनविरहित पदन्यासातून नुसत्या घुंगुरांच्या आवाजाने रसनिष्पत्ती होऊ शकते किंवा नाही हा वादाचा मुद्दा ठरेल. संगीतकाराने आणि नर्तकाने नावीन्य आणण्यासाठी नवनवीन क्लृप्त्यांचा उपयोग केला, तरीही रसनिष्पत्ती होतेच असे नाही. हा मुद्दा एवढ्याच कारणामुळे विवाद्य मानला जातो. या ठिकाणी फक्त नाद आणि स्वर यांचाच आधार असतो आणि फक्त नाद-स्वरांनी रसनिष्पत्ती शक्य आहे काय अशी शंका स्वतः सहस्रबुद्धे यांनीही उपस्थित केली आहे.

प्राचीन भारतीय साहित्यविषयक दृष्टिकोन फक्त स्वरातून रसनिष्पत्ती मानतो, फक्त भरतानेच नाही, तर संगीतासंबंधाने विवेचन करणाऱ्या सगळ्या कलाविदांनी भिन्न-भिन्न स्वरांमुळे भिन्न-भिन्न रसनिष्पत्तीची शक्यता वर्तवलेली आहे. भरत आणि 'संगीत रत्नाकर'चे लेखक एक मताने असे सांगतात की, हास्य व शृंगार रसांसाठी मध्यम आणि पंचम स्वरांचा उपयोग होतो, तर वीर, अद्भुत आणि रौद्र रसांसाठी षड्ज आणि ऋषभ स्वरांचा उपयोग होतो. बीभत्स आणि भयानक रसांसाठी धैवताचा तर करुण रसासाठी

निषाद स्वराचा उपयोग होतो. विविध राग-रागिण्यांची रचना रसकेंद्री आहे हे तर सगळयांना माहीत आहेच. ध्वनिकार आनंदवर्धनसुद्धा गीत गायिल्याने रसाभिव्यक्ती होते असे मानतात. ध्वन्यालोकाच्या तिसऱ्या उद्योतात विवेचन करीत असता ते म्हणतात, 'ननुशब्द एवं प्रकरणाघवच्छिंत्रो वाच्यव्यंग्ययोः सममेव प्रतीतिमुपजनयतीति, किं तत्रक्रमकल्पनया? न हि शब्दस्य वाच्यप्रतीतिपरामर्श एव व्यंजकत्वे निबंधनम् । तथा हि गीतादिशब्देभ्योऽपि रसाभिव्यक्तिरस्ति । न च तेषामंतरा वाच्यपरामर्थः ।' चौखंमासंस्करण, पृ. ४०५ । वाच्यार्थापासून व्यंजित अर्थापर्यंत जसा अर्थाचा क्रमिक विकास दाखवता येत नाही, तसाच अंतरविहीन आणि त्वरितक्रम गीतातील शब्दात आणि रसाभिव्यक्तीत असतो.

'लोचन'कारांच्या मताप्रमाणे वरील गीतादिशब्देभ्यः यातील 'शब्दा'चा अर्थ 'पदविरहित-स्वरलापगीतादि' असा आहे आणि 'गीतादि' मधील 'आदि'चा अर्थ 'वाद्यविलपित शब्द' असा आहे. थोडक्यात, आनंदवर्धन स्वरालापाबरोबरच वाद्य-वादन स्वरापासूनसुद्धा रसनिष्पत्ती शक्य आहे असेच मानतात. भरताने गायनामध्ये पाच प्रकारच्या श्रुती सांगितल्या आहेत. दीप्ता, करुणा, मृदु, मध्या आणि आयता. (नाट्यशास्त्र, २९/३८-४०) याच पद्धतीने तीन प्रकारचे काव्यगुण सांगितले आहेत. माधुर्य, प्रसाद आणि ओज. या तीन गुणांपासून तीन प्रकारच्या चित्तविकारांची कल्पना केली आहे. द्रुती, दीप्ती आणि विकास. शृंगार, करुण आणि शांत रसांचा संबंध माधुर्य गुणाशी आहे. वीर, बीभत्स आणि रौद्र रसांचा संबंध ओजोगुणाशी आहे आणि बाकी सगळयांचा संबंध प्रसाद गुणाशी आहे. अशाच प्रकाराने वरील श्रुतींचा संबंधसुद्धा रसांशी आहे. 'संगीत पारिजात'चे लेखक पंडित अहोबल यांच्या म्हणण्याप्रमाणे वीर, अद्‌भुत आणि रौद्र रसांची श्रुती दीप्ता आहे, संयोग शृंगाराची श्रुती मृदु, हास्यरसाची आयता, दैन्य म्हणजेच करुण रसाची करुणा आणि बीभत्स, भयानक व वियोग शृंगार रसांची श्रुती मध्या आहे. श्रुती-भेदानुसार प्रत्येक रस श्रुती-विशेषद्वारा निश्चित अशा स्वरांमधूनच अभिव्यक्त होत असतो. या स्वरांमुळे निर्माण होणाऱ्या रागांशांच्या राग-समूहांच्या आणि रागविन्यासांच्या अनुसारच प्रत्येक रागाचा आपापला रस ठरत असतो. प्राचीन मुनींच्या दृष्टीने काव्य आणि संगीतामध्ये फक्त माध्यमाचाच फरक आहे. पण दोन्हीमुळे होणाऱ्या रसानुभवामध्ये काहीच फरक नाही असेच दिसते आहे.

स्वर, गीत इत्यादी माध्यमे ही अतिशय परिणामकारक, कोमल आणि मधुर माध्यमे आहेत व यामुळे मनुष्यजीवनातील सूक्ष्मातिसूक्ष्म भाव, उदात्त कल्पना आणि जाणिवेच्या सर्व रूपांची अभिव्यक्ती स्वाभाविकपणे करता येते. अर्वाचीन विद्वानांनीसुद्धा हे मत मान्य केलेले आहे. संगीताचा विकास व विस्तारसुद्धा या संकल्पनेच्या आधारे झाल्याचे तज्ज्ञांनी मान्य केले आहे. (सौंदर्यशास्त्र. पृ. १८०) परंतु या विद्वानांना ही शंका आहे की, 'असा विकास कितीही प्रशंसनीय असला तरी, स्वरांच्या विन्यासाद्वारे निर्मित रागांचा

स्वतःचा असा स्वतंत्रपणे परिणाम होत नाही असे सिद्ध करता येत नाही. थोडक्यात म्हणजे स्वर-विन्यासामुळे शृंगार, करुण इत्यादी रसांचा अपेक्षित परिणाम होतच असतो. मनुष्य विभावादींच्या साहाय्याने आपल्या स्थायीभावांना जागृत करून रसभोग करीत असतो हे मत या शंकेच्या मुळाशी आहे असे वाटते. या रसभोगाशिवाय सौंदर्याचा स्वतंत्र असा आनंद किंवा रस नाही. म्हणूनच डॉ. हरद्वारीलाल शर्मांच्या मते हा विचार भ्रांत आणि संकुचित असाच आहे.' (सौंदर्यशास्त्र, पृ. १८२)

डॉ. शर्मांनी स्वतः हा प्रश्न चर्चिला आहे, 'अशा परिस्थितीत संगीताच्या श्रवणामुळे उत्पन्न भावोद्रेक व भावोद्रेकामुळे उत्पन्न रसाशिवाय अन्य कोणत्या रसामुळे संगीताच्या सौंदर्याला विशिष्ट अर्थ प्राप्त होत असतो?' (सौंदर्यशास्त्र) संभाव्य उत्तर देताना डॉ. शर्मा म्हणतात, 'संगीत ऐकत असताना रसिक श्रोता दृश्यात्मक, स्थूल आणि स्थिर जगताचा त्याग करून श्रव्य, सूक्ष्म व तरल अशा जगात वावरू लागतो. चित्र, मूर्ती इत्यादींच्यां तुलनेत संगीतात तो अधिक सहजपणाने व स्वाभाविकपणे तन्मय होतो. जणू काही आवाजाच्या तरल अशा ताल-लयीच्या संगतीयुक्त आणि संतुलित आविष्काराने प्रभावित होऊन तो आत्म्याची मूळ स्थितीच प्राप्त करतो.' ते लिहितात, "ज्या ठिकाणी अव्यक्त आणि अनंत जाणिवेचा दिव्य आलोक असतो, ज्या वेळी स्थायीभाव जवळजवळ विलयावस्थेतच असतात, ज्या ठिकाणी जीवन-मृत्यू, लाभ-हानी, पाप-पुण्य, सत्य-असत्य यांच्यातील द्वैत शांत झालेले असते आणि जिथे फक्त चिदानंदमय आणि तरलपणाचा अनुभव असतो त्या ठिकाणीच जीवनाची मूळ स्थिती असते."

... "संगीताच्या याच सुखामध्ये मग्न-निमग्न होत-होतच रसिक निमग्नावस्था प्राप्त करीत असतो. या अवस्थेत ध्यान आणि मोक्ष यांच्या अलौकिक सुखाचा अनुभव त्याला येत असतो, आणि निमग्नतेच्या याच अवस्थेत तो पुन्हा स्वरांचे स्पंदन ऐकतो आणि केवळ भावोद्रेकामुळे होणाऱ्या रसापेक्षा खूप दूरवरच्या आणि अधिक उंचीच्या रसाच्या आनंदाचा उपभोग करू लागतो.' काही जाणकार संगीतज्ञ या 'रसालाच' 'शम' किंवा 'शांती' असे संबोधितात." (पुस्ती– १८२-३)

वरील उद्धरणावरूनसुद्धा संगीताच्या सौंदर्यामुळेही रसिकाला येणारा तन्मयतेचा अनुभव रसाचाच असतो, असे सिद्ध होते. कारण 'तन्मयत्वं रसः' या म्हणण्याप्रमाणे तन्मय होणे याचाच अर्थ रसानुभव येणे असा होतो. या ठिकाणी संगीत-रसाचा अनुभव हा अलौकिक आहे असेच लक्षात येईल. परंतु हा अनुभव आणि भावोद्रेकामुळे होणारा काव्य-रसाचा अनुभव या दोहोंत फरक आहे. संगीत-रस रसिकाला 'जीवनमुक्ती'चा अनुभव देत असतो. याच मुद्द्यावर डॉ. शर्मा आणि डॉ. सहस्रबुद्धे यांच्या धारणांमध्ये फरक असल्याचे लक्षात येते. सौंदर्यामुळे रसनिष्पत्ती दोघांनाही मान्य आहे. परंतु डॉ. सहस्रबुद्धे यांचा प्रयत्न संगीतरसाला काव्यरसाच्या पारिभाषिक शब्दावलीत जखडण्याचा आहे, तर डॉ. शर्मांचा प्रयत्न संगीतरसाला काव्य-रसापेक्षा अधिक उच्च कोटीचा सिद्ध करण्याचा

आहे. संगीत-रसाला आनंदात पूर्णपणे निमग्न होण्याची परवानगी डॉ. शर्मा संगीत-रसिकाला देतात. काव्यरसाच्या पारिभाषिक शब्दावली त्याला अडकवीत नाहीत. पण डॉ. सहस्रबुद्धे मात्र संगीत रसाला भावोद्रेकाच्या शृंखलेत जखडू पाहतात. तर संगीत रसाचा आनंद उपभोगण्यासाठी भावोद्रेकाची शृंखला डॉ. शर्मा अनावश्यक मानतात.

काव्य-सौंदर्याच्या संदर्भात सौंदर्यरसाला शास्त्रीय स्वरूपात प्रस्थापित करणे किती अवघड आहे याचा विचार पूर्वी केलाच आहे. या ठिकाणी ज्यांना काव्यात सौंदर्य म्हणून संबोधिले जाते त्या अलंकारांबद्दल एक मुद्दा आवर्जून सांगितला पाहिजे. काव्यसौंदर्यामध्ये वाढ करणारी अलंकारादी उपकरणे ही नेहमी रसनिष्पत्तीमध्ये साहाय्यक तरी असतात किंवा रसापेक्षा कनिष्ठ तरी मानली जातात. इथे असा प्रश्न उभा राहतो की, जर सौंदर्य रसाची संकल्पना मान्य केली तर मग अलंकारादींच्या सौंदर्याला पण रसात्मक म्हणायचे का? आणि जर रसात्मक नाही म्हटले तर मग अलंकारादींचे सौंदर्य उपेक्षित करून सौंदर्यसीमा संकुचित करायच्या का? अलंकारसंप्रदाय आणि रीतिसंप्रदाय दोन्हींची शक्ती शब्दार्थांचा कौशल्यपूर्ण प्रयोग करण्यात, चमत्कारनिर्मितीत, उक्ती-वैचित्र्य, वर्ण-मैत्री, शब्दक्रम, लयकारी आणि कवी किंवा लेखकाची समासशैली व व्यासशैली यांच्यात असते आणि या सर्वांचा उपयोग करूनच कवी काव्यामध्ये सौंदर्याची प्रतिष्ठापना करीत असतो हे आपण सर्वजण जाणतोच. या सौंदर्य प्रतिष्ठापनेमुळे रसिकाला एक हवाहवासा अनुभवही येत असतो. या अनुभवाला जर रस मानले तर इच्छा आणि सौंदर्य भावनेच्या आधाराने मानता येईल पण यामुळे शास्त्रीय रसांमध्ये गुणात्मक फरक असतो असेसुद्धा आपल्याला मान्य करावे लागेल. हे शक्य आहे का? अलंकारवादी आचार्यांनी रसवत् अलंकारांची संकल्पना मांडून नेमका हाच प्रश्न प्राचीन काळी निर्माण केला होता; पण आपण हा मुद्दा कधीच स्वीकारलेला नाही. कारण असे केल्याने अलंकृत काव्यालासुद्धा रसकाव्य मानावे लागेल आणि मग सौंदर्य वेगळे आणि सौंदर्यरस वेगळा असेसुद्धा मानावे लागेल. म्हणजेच सौंदर्यरसाचे दोन प्रकार मानावे लागतील. हे सगळे मुद्दे बाजूला ठेवले आणि सौंदर्यरस असतोच असे मानायचे ठरवले तर या परिस्थितीत सौंदर्यरस फक्त वस्तुनिष्ठच मानावा लागेल. आणि शृंगारादी भावोद्रिक्त रस व्यक्तिनिष्ठ मानावे लागतील. परिणामतः वस्तुनिष्ठ रस आणि व्यक्तिनिष्ठ रस अशा दोन कोट्या निर्माण कराव्या लागतील. अशा तऱ्हेने दोन कोट्या मानल्याने भरतद्वारा प्रतिपादित रसांना जे समीक्षक वस्तुनिष्ठ मानू इच्छितात त्यांना समाधान होईल. रचनाप्रवृत्तीच सर्वश्रेष्ठ मानायचे ठरवून जर सौंदर्याच्या सर्वातिशयतेलाच महत्त्व दिले गेले तर जसे सर्व कलांमध्ये भक्तिरस मानला गेला आहे तसा आणखी एक रस– सौंदर्यरस मानावा लागेल. भक्तिरसाच्या चर्चेत ज्याप्रमाणे शृंगारादी रसांना रस-भेद म्हणून समाविष्ट केले गेले आहे तसेच आणखी एका सौंदर्यरसाचा प्रकारही समाविष्ट करावा लागेल. अशा प्रकारे सौंदर्यरसाला औपाधिक प्रकार मानून जर भक्तिरसात समाविष्ट केले तरच सौंदर्यरसाची



अनुक्रमणिका

संकल्पना टिकवता येईल. अन्य परिस्थितीत नाही. अर्थात या टिकवा-टिकवीत अलंकार आणि भाषासौंदर्याचा विचार बाजूला पडतो हे सांगायला हवे. खरे तर या सगळ्या खंडन-मंडनापासून मुक्त होण्याचा एकच उपाय दिसतो आहे. आतापर्यंतच्या विवेचनात उपस्थित केल्या गेलेल्या मुद्द्यांचा विचार करता काव्य आणि कला यांच्या मूल्यमापनाची एक कसोटी किंवा निर्णायक तत्त्व म्हणून सौंदर्यतत्त्वाचा विचार केला जावा. कृतीचा समग्रपणाने विचार करून ध्वनिकारांचा आधार घेऊन भाव, भाषा आणि वस्तुगत सौंदर्याने संगठित आणि सुगठित कृतीच्या निर्मितीमुळे होणाऱ्या स्थायीभावाच्या आल्हादकारक परिणतीचा विचार करून तिलाच सौंदर्यरस म्हणावे. अर्थात यावरून हे स्पष्ट व्हावे की या ठिकाणी 'रस' शब्दाचा उपयोग पारिभाषिक आणि भावोद्रेकाच्या अवस्थेच्या अर्थाने केलेला नाही, तर आल्हादकता आणि कार्यपूर्तीमुळे येणाऱ्या कृतकृत्य भावाच्या सुखद आणि विश्रांतीयुक्त स्थितीच्या अर्थानेच केलेला आहे. हा रस कलाकार आणि रसिक दोघांचा आहे. रचनेतील सुंदरपणा, असुंदरपणा, सुगठितपणा व सुसंगती आणि कलाकाराची रचनाक्षमता किंवा नवीन निर्मितीची क्षमता, प्रतिभा याबद्दलची निश्चिती तर होत असतेच, पण समग्र कृतीच्या मूल्यमापनाचे निर्णायक तत्त्व म्हणूनही या तत्त्वाचा विचार होत असतो. या सर्व प्रक्रियेत भाषा, भावांच्या विविध पद्धती आणि भावस्थिती यांचा विचार होतो तसाच निसर्ग, स्थान, इत्यादींच्या आलंबनरूपांचाही विचार होत असतो. हा सर्व विचार महाकाव्य, खंडकाव्य आणि चित्रकला, मूर्तिकला किंवा अन्य कलांच्या बाबतीतही लागू होऊ शकतो. थोडक्यात म्हणजे सौंदर्यरस हा कृतीच्या संघटितपणे सादर होण्याशी संबंधित असून शास्त्रीय पारिभाषिक बंधनापासून मुक्त आहे. कलाकार आणि रसिक दोघांनाही समान आल्हाद देण्याचे काम सौंदर्य रस करीत असतो. माझ्या मते चार पुरुषार्थांपैकी 'काम' आणि परिणतीच्या दृष्टीने 'मोक्ष' नामक पुरुषार्थाशी हा रस संबंधित आहे असे मानता येईल. यातना वेदनामय संघर्ष आणि या संघर्षापासून मुक्त होण्याचा कलावंताचा अनुभव म्हणजेच सौंदर्यरसाची अनुभूती होय.

('कलापी' १६२/५ ब, । स, बाणेर रोड, औंध. पुणे ४११००७)

**जुलै ८८ ते मार्च ८९ अखेर म. सा. प.कडे साहित्यिक साहाय्य निधीसाठी मिळालेल्या देणग्यांचा तपशील.**

(१) श्री. अरविंद एन. पाटील, जळगाव, ११/-. (२) श्री. रमाकांत दयाराम पाटील, जळगाव, ११/-. (३) श्री. अंकुश काकडे, महापौर, पुणे महानगरपालिका, १००/-. (४) श्रीमती ललिता भावे, पुणे, १०१/-. (५) घ. रा. देशमाने, ६०/-. (६) श्री. भा. रा. भागवत, पुणे, १०००/-. (७) श्री. रंगनाथ होनप, पुणे, १०/-. (८) प्रा. सीताराम गोसावी, कोपरगाव, ११/-. (९) श्री. देवीदास गिरी, कोपरगाव, ११/-.



अनुक्रमणिका

ज्ञानेश्वरी : सप्तशताब्दीनिमित्त लेख :

# ज्ञानदेवांचे गणेशनमन

## एक नवी मांडणी-अधिक अर्थसुलभ व तर्कशुद्ध

रामदास कृष्ण धोंगडे

*(ज्ञानेश्वरीच्या सप्तशताब्दीनिमित्त म. सा. पत्रिकेत या वेळी दोन लेख देत आहोत. विद्यापीठीय अभ्यासकांपेक्षा या दोघांचीही भूमिका वेगळी आहे. श्री. धोंगडे आणि श्री. सराफ या दोघांचेही लेखन रूढ पठडीपेक्षा वेगळे आहे.*

*श्री. धोंगडे हे सातारचे गृहस्थ गेली चाळीस वर्षे ज्ञानेश्वरीची संशोधित परिवर्धित आवृत्ती सिद्ध करण्यात दंग आहेत. प्रचलित ज्ञानेश्वरी ही मुद्दाम विकृत केलेली असून मूळ लेखनातील अनेक ओव्या गाळून वा त्यांचे क्रम बदलून, अर्थसंभ्रम निर्माण केला गेला आहे असा त्यांचा आक्षेप आहे. त्यांनी सिद्ध केलेली संशोधित प्रत प्रकाशकाची वाट पाहात पडून आहे. त्यांच्या प्रतिपादनाचा रोख लक्षात यावा म्हणून प्रारंभीच्या गणेशनमनाची त्यांनी केलेली मांडणी पत्रिकेत देत आहोत. जाणकारांनी त्याची युक्तायुक्तता तपासून पाहायची आहे.)*

'साहित्य सोनियाची खाण' मराठी भाषेच्या क्षोणीमध्ये उघडावी व आम जनतेतला देखो आवडे तो अभ्यासक ब्रह्मविद्येची खाणी व्हावा या सर्वोच्च ध्येयाने ज्ञानराजांनी ज्ञानदेवी हा ग्रंथ लिहिला. ब्रह्मविद्येचे भांडवल करून चरितार्थ चालविणाऱ्या लोकांना संतांचे हे आव्हान रुचले नाही, यात नवल नाही. त्यांनी संतवाङ्मयाशी प्रतिस्पर्धा करण्याकरता सर्वांगसुंदर ज्ञानेश्वरीची काटछाट शब्दबदल कल्पनाबदल करून आणि काही जागी गीता श्लोक एकत्र करून अथवा त्यांच्या खालच्या ओव्या पुढे-मागे करून ग्रंथ दुर्बोध केला. आज प्रसिद्ध असलेल्या ९०३३ ओव्यांच्या संहितेत सुमारे एक हजाराहून जास्त ठिकाणी कात्र्या लावून सुमारे २५०० ओव्या गाळल्या आहेत. एवढ्याने त्यांचे भागत नव्हते म्हणून शके १२९० मध्ये मुकुंदमुनीच्या शिष्यशाखेतील केशवस्वामीच्या अनामिक शिष्याने मराठी विवेकसिंधू ग्रंथ ज्ञानेश्वरीशी (आणि परमामृत ग्रंथ हा अमृतानुभवाशी) प्रतिस्पर्धा करण्याकरता लिहिला. (या ग्रंथात तो आडपडद्याने संतांची निंदानालस्तीही करतो, म्हणून आमचा हा निष्कर्ष होय.) मराठी आद्य सारस्वताचा मान जो शिंपी नामदेवांकडे जातो तो ओढूनताणून आपल्या मुनी पंथीय गुरू-परमगुरू यांना द्यावा व या ग्रंथांना प्राच्य स्वरूप द्यावे या उद्देशाने हा सारा प्रकार केलेला असावा. असो.

(प्रस्तुत लेखाचा उद्देश मूळ ग्रंथ कसा सर्वांगसुंदर होता व त्याचे सध्याचे स्वरूप कसे



अनुक्रमणिका






वेडेवाकडे केले आहे, एवढे दाखवून देण्यापुरता मर्यादित असल्याने एवढे प्रास्ताविक पुरेसे मानून आता गणेशनमनाकडे वळतो.)

येथे आरंभीच हे निक्षून सांगितले पाहिजे की, प्रचलित पाठ चिकित्सा शास्त्र हे माझ्या मते एक निव्वळ थोतांड आहे. सर्वच उपलब्ध हस्तलिखितांत 'जे शब्द वा कविकल्पना नकलाकारांनी बदलल्या आहेत वा गाळल्या आहेत त्या ग्रंथाचे दुरुस्तीकरण करण्याकरता या पाठचिकित्सा शास्त्रात वाव नाही. मग ग्रंथ पूर्ववत शुद्ध आणि सुंदर जर करता येत नसेल तर ते संशोधन काय कामाचे?'

उदाहरणादाखल गणेशनमनच घ्या. वाचकाच्या सोयीकरता प्रसिद्ध पाठाची व शुद्ध पाठाची तुलना करता यावी म्हणून प्रसिद्ध क्रमानुसार असलेल्या तीन तीन ओव्या नोंदून त्याच क्रमाने मी सिद्ध केलेल्या प्रतीतील मूळ ओव्या तशाच तीन तीन घेऊ. म्हणजे क्रमाक्रमाने ग्रंथात व त्याच्या अर्थरहस्यातही कसकसा फेरफार केला आहे ते ध्यानी येईल. प्रथम प्रसिद्ध क्रमाच्या तीन ओव्या, त्यानंतर मूळ क्रमाच्या तीन ओव्या घेऊन शुद्ध पाठाची चर्चा करू. ज्ञानेश्वर महाराज ग्रंथ सांगत आहेत व मी सच्चिदानंद तो उतरून घेतो आहे, अशी भावना करून ही शुद्ध संहिता तयार केली आहे.

प्रसिद्ध पाठाच्या पहिल्या तीन ओव्या अशा आहेत–

ओम् नमो जी आद्या । वेदप्रतिपाद्या । जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ।।१।।
देवा तूंचि गणेशु । सकलमतिप्रकाशु । म्हणे निवृत्तिदासु । अवधारिजो जी ।।२।।
हें शब्दब्रम्ह अशेष । तेंचि मूर्ति सुवेष । तेथ वर्णवपु निर्दोष । मिरवत असे ।।३।।

टीप– या ठिकाणी एकूण पाच पाठभेद आढळले पण ते सर्व प्रक्षिप्त म्हणून टाकले.

माझ्या मते मूळपाठ ज्ञानेश्वरीतील पहिल्या तीन ओव्या अशा होत्या–

ओम् नमो श्री विश्वाद्या । वेदी-वेद-प्रतिपाद्या । जय जय सोहं स्वयंवेद्या । आत्मरूपा ।।१।।
देवा तूंचि गणेशु । मतितार्थु प्रकाश्यु । म्हणे निवृत्तीदासु । ऐके कैसे? ।।२।।
शब्दब्रम्हअशेष । ते तव मूर्ति सुवेष । वर्ण्ये वपुनिर्देश विवरिला ।।३।।

: येथे दोन अनुप्रास वापरून ज्ञानेश्वर म्हणतात, ओंकार स्वरूपी विश्वाच्या आद्य असणाऱ्या आणि वेदांनी वेद्य म्हणून ज्याचे प्रतिपादन केले आहे अशा परब्रम्हा, तुला नमन असो. हे तत्पदलक्ष्य ब्रह्म ते मी (जीवच) आहे, असे जीवब्रह्माचे अद्वैत पुरस्कारणाऱ्या तुज सोहं हंसाचा जयजयकार असो. तो तू कसा आहेस? तर तूच कृपा केलीस तर ते कळून येईल असा आणि आत्मरूप अविनाशी. अशा तुझा जयजयकार असो. (१) देवा, तूच विद्यादाता गणपती असून तूच या गीताग्रंथाचा मला प्रकाशात आणावयाचा असा गीतेचा अभिप्रेत अर्थ आहेस. तेव्हा गीतावक्त्या भगवंतास जे काही नेमके म्हणावयाचे आहे, ते तू मला दाखव. आता तूच त्या ग्रंथाचा मथितार्थ आहेस असे मी निवृत्तीदास कसे काय म्हणतो, ते तू ऐक. (२) असे म्हणून ज्ञानदेव पुढे म्हणतात– या भारतात जो वैदिक वाङ्मयाचा विपुल विस्तार

झाला ते सारे शब्दब्रम्ह हीच तुझी सुंदर वेषधारी मूर्ती आहे. कारण त्यातील वर्णन केलेल्या विषयविस्तारामधून तुझ्या शरीराचे दर्शन आम्हाला घडते. किंबहुना तुझ्या शरीराचेच विवरण त्यात केलेले आहे. (३)

दुसऱ्या तीन ओव्या (प्रसिद्ध पाठ)

स्मृति तेचि अवयव । देखा अंगीकभाव । तेथ लावण्याची ठेव । अर्थशोभा ।।४।।
अष्टादश पुराणे । तीचि मणिभूषणे । पदपद्धती खेवणे । प्रमेयरत्नांची ।।५।।
पदबंध नागर । तेचि रंगायिलें अंबर । जेथ साहित्य वाणें सपूर । उजाळाचे ।।६।।

माझ्या मूळपाठातल्या ४ ते ६ ओव्या

अकार चरणयुगुल । उकार उदरविशाल । मकार महामंडल । मस्तकाकार ।।४।।
त्रैविद्यारत्नमंडित । मुगुट माथा मिरवत । तो वेदु वेद्ये प्रदीप्त । झळाळत ।।५।।
स्मृति रेषा अवयव । ब्राह्मणे आंगीक भाव । अरण्यके तनुतेव । अर्थशोभा ।।६।।

(यातील क्र. ४ ही ओवी १९ व्या क्रमावर नेली असून ५ क्रमांकाची ओवी गाळली गेली आहे. क्र. ६ ही ओवी क्र. ४ वर घेतली आहे. या फेरफाराचा आणि ब्राह्मणे अरण्यके व मुख्य वेद यांचा उल्लेख गाळण्याचा उद्देश या ग्रंथाला तशी पूर्वपरंपरा नाही असा गैरसमज व्हावा, हा असावा.) यातील ५ व्या क्रमांकाची ओवी मला स्फुरलेली आहे.

रसग्रहण :– गणपतीच्या वपूचे विवरण करताना ज्ञानदेवांनी ते देवाचे चित्र आहे हे जाणून चरणयुगुलापासून आरंभ केला आहे. विशेष म्हणजे एकाच ओवीत गणेशाचा सारा स्थूल आकार सामावून वाचकाची दृष्टी चरणापासून एकदम मस्तकापर्यंत नेली आहे. आता ते तेथून हळूहळू क्रमाने खाली उतरत जातात. ते या ठिकाणी म्हणतात,

"ओंकारातील अकार हेच तुझे दोन्ही चरण असून त्यातील उकार हा तुझे विशाल उदर होय. त्यातील मकाररूपी महामंडल हाच तुझ्या मस्तकाचा आकार होय. असा हा तुझा आकार होय." (४) प्रकृति, आत्मा व ब्रम्ह यांच्या संबंधीच्या तीन विद्यांच्या रत्नांनी सुशोभित केलेला वेदरूपी मुगुट तुझ्या माथ्यावर झळकतो आहे. (तो त्यातील वेदपरब्रम्हाच्या तेजाने चकाकतो आहे.) (५) (वेदानंतरच्या) मनू इत्यादींच्या स्मृती म्हणजे तुझ्या घाटदार शरीराच्या डौलदार अवयवसौष्ठवाच्या रेषा होत. नंतरची ब्राम्हणे त्या सौष्ठवाचे पीनावयव भाव वर्णितात. तर त्यानंतरची अरण्यके ही त्यातील अर्थशोभेने तुझ्या शरीराला दिव्य कांती देतात. (६)

सारांश, या विभागात गणपतीच्या स्थूल शरीराचे वर्णन करताना ओंकारापासून वेद व नंतर स्मृति ब्राम्हणे अरण्यके यांची कालक्रमानुसार व अर्थगांभीर्यानुसार ज्ञानदेव योजना करतात.

तिसऱ्या तीन ओव्या (प्रसिद्धपाठ)

देखा काव्यनाटका । जे निर्धारिता सकौतुका । त्याचि रुणझुणती क्षुद्रघंटिका । अर्थध्वनि ।।७।।

नाना प्रमेयाची परी । निपुणपणें पाहतां कुसरी । दिसती उचित पदे माझारी । रत्नें भली ।।८।।

तेथ व्यासादिकांचिया मती । तेचि मेखळा मिरवती । चोखाळपणें झळकती । पल्लवसडका ।।९।।

'स्मृति' खालोखाल पुराणांना महत्त्व देऊन ओव्यांच्या मूलस्थानांचे स्थानांतर करणाऱ्या पुराणिकांनी आपल्या कल्पनेने गणपतीचे मूळ चित्र पार बिघडवून टाकले आहे. मूळ ७,८ व ९ क्रमांकास पुढील ओव्या होत्या. त्या अशा :–

तिसरा विभाग तीन ओव्या (मूळपाठ)

प्रमेयप्रवालप्रभ । द्वौ द्वैताद्वैत निकुंभ । ब्रम्हरसपूर्ण इभ– । मस्तकाचे ।।७।।

उपरी उपनिषदें । उदारें ज्ञानमकरंदें । जिहीं कुसुमसुगंधे । शोभा भाळां ।।८।।

अवगमलिया दोनी । मीमांसा श्रवणस्थानीं । बोधमध्वामृत मुनी ।

अलिसेव्य ते ।।९।।

या ओव्या प्रसिद्ध पाठात पुढे १७,१८ व १६ क्रमास आहेत. त्यामुळे गणेशाच्या चित्राचा चोळामोळा झाला आहे. ज्ञानदेवांचा मूळ अभिप्राय असा की, वर उल्लेख केलेल्या वेद स्मृति ब्राम्हणे अरण्यके या वाङ्मयविस्तारामध्ये निर्गुणवादी हंसांचा अद्वैतवाद आणि द्रविड-भागवतांचा सगुण-द्वैतवाद असे दोन मतप्रवाह भारतात अस्तित्वात आले. दोन्हींचे तत्त्वज्ञान वा मूळतत्त्व एकच, पण त्याकडे पाहण्याचा दृष्टिकोन मात्र वेगळा असा प्रकार झाला. मुळात जीव-ब्रम्हाचे ऐक्य मानणारा अद्वैत भाग हा द्वैती लोकांनाही मान्य आहे. त्यांचे म्हणणे एवढेच की, आज जर आमच्या जीवाने भक्तांची भूमिका पत्करून जन्म घेतला आहे, आणि देव हा जर कल्पांतापर्यंत जगद् रूपानें नटलेला असणारच आहे तर भक्ताने अद्वैत अनुसरून आजच ब्रम्ह होण्याची घाई करू नये. त्याने आपले वर्तमान द्वैत पाळून आपली भक्ताची भूमिका पार पाडत राहावे. तेच खरेः असो– अशा दोन विचारसरणीच्या आविष्कारामुळे ज्ञानदेव म्हणतात, "प्रमेयरूपी पोवळयांनी प्रभा पाडलेले द्वैत व अद्वैत हे गणेशाचे निकुंभ अथवा गंडस्थळ ब्रम्हरसाने ओथंबलेले आहे. (त्या गंडस्थळातून ब्रम्हरस वाहतो आहे.) (७)"

गजमस्तकाच्या भाळप्रदेशावर ज्ञानाच्या मकरंदाने भरलेली आणि सुगंधाने दरवळलेली ११८० उपनिषदांची मुंडावळ रुळते आहे आणि त्यामुळे भाळाला शोभा आलेली दिसत आहे. (८) आता आपण जर पूर्व आणि उत्तर या दोन मीमांसा गणेशाच्या कानाच्या जागी मानल्या तर त्यातून पाझरणारा बोधाचा मध हा मुनीरूपी भ्रमरांच्या आस्वादासाठी आहे असे मानावे लागेल. (९) म्हणजे येथवर ज्ञानदेवांनी गणेशाचे ध्यान चरणापासून सुरू करून साऱ्या स्थूलाकाराद्वारे एकाच ओवीत मस्तकापर्यंत नेऊन पोहोचवले व पुढे अनुक्रमे वेदांचा मुगुट स्मृतींच्या अवयवरेषा, ब्राम्हणांचे आंगिक भाव, अरण्यकांचे शारीरतेज वानून पुढे त्यास द्वैताद्वैताचे दोन निकुंभ आणि उपनिषदांची मुंडावळ

अशा प्रकारे विशद केले आहे. अशा तऱ्हेने वाचकाच्या ध्यानदृष्टीची वाटचाल चरणापासून मस्तकापर्यंत (मुगुटापर्यंत) चढत्या क्रमाने करविली व मग ती उतरत उतरत निकुंभ भाळ श्रवण येथपर्यंत आणली. येथवरचे सर्व वाङ्मय कालक्रमाने विस्तार पावलेले असे आहे. येथे ज्ञानेशांनी षड्दर्शनापैकी दोन मीमांसा कानाच्या जागी कल्पिल्या. त्यानंतर पुढच्या तीन ओव्यांत बाकी राहिलेली चार दर्शने गणपतीच्या हातांत आयुधे म्हणून येतात. ती अशीः–

चौथी त्रयी (प्रसिद्ध)

देखा षड्दर्शनें म्हणिपती । तेचि भुजांची आकृती । म्हणऊनि विसंवादे धरिती । आयुधे हाती ।।१०।।

तरी तर्कु तोचि फरशु । नीतिभेदु अंकुशु । वेदान्तु तो महारसु । मोदकु मिरवे ।।११।।

एके हाती दंतु । जो स्वभावता खंडितु । तो बौद्धमतसंकेतु । वार्तिकांचा ।।१२।।

चौथी त्रयी (मूळ)

षड्दर्शने येर ती । म्हणों षड्भुजाकृती । विसंवादे धरिती । आयुधे जरी ।।१०।।

तरी तर्कु तो परशु । नीतिभेदु अंकुशु । वेदान्तु महारसु । मोदकु हन ।।११।।

सांवरिता सांख्यवादु । तो पद्मकरवरदु । धर्मप्रतिष्ठा प्रसिद्धु । अभयहस्तु ।।१२।।

(टीपः– खंडित दाताची ओवी पुढे आहे.)

येथे गणपतीच्या चार हातांत बाकीची चार दर्शने द्यावीत तर प्रसादाचा हात मोकळा राहत नाही. म्हणून ज्ञानदेवांनी गणपतीला षड्भुज मानले आहे. त्या ओव्यांत सहावा हात अगदीच मोकळा नको म्हणून ज्ञानदेवांनी खंडित मताला दर्शनांच्या पंक्तीत आणून बसविण्याचा विसंवाद केला. येथे नकलाकारांनी कपिलांचे सांख्यशास्त्र गाळले आणि त्या जागी 'सहजे सत्कारवाद' हे पदरचे भ्रामक शब्द घातले. (असाच प्रकार पुढे शांकरवादासंबंधाने केला आहे, तो पुढे यथावकाश दाखवू.)

सारांश, येथवरच्या वाङ्मयविस्ताराने धर्मास प्रतिष्ठा प्राप्त झाली आणि मानवी जीवनास एका प्रकारे अभय मिळाले.

पाचवी त्रयी (प्रसिद्ध)

मग सहजें सत्कारवादु । तो पद्मकरुवरदु । धर्मप्रतिष्ठा तो सिद्धु ।

अभयहस्तु ।।१३।।

देखा विवेकवंतु सुविमळु । तोचि शुंडादंडु सरळु । जेथ परमानंदु केवळु । महासुखाचा ।।१४।।

तरी संवादु तोचि दशनु । जो समताशुभ्रवर्णु । देवो उन्मेपसूक्ष्मेक्षणु । विघ्नराजु ।।१५।।

पाचवी त्रयी (मूळ)

स्वभावता खंडितु । जो रिक्तहातीं दंतु । तो बुद्धमतसंकेतु । वार्तिकांचा ।।१३।।

सहजे आनु दशनु । तो शांकरवादु वानूं । उन्मेधुद्वौसूक्ष्मेक्षणु । विद्याप्रद ।।१४।।

विवेकु वेद्यविमळु । तो शुंडादंडु सरळु । परमानंदु केवळु । सुखप्रद ।।१५।।

येथे ज्ञानदेव गणेशाचे दात, डोळे आणि सोंड यांचे वर्णन करतात. त्यातला शांकरवाद हा ओघानेच येणार. खंडित दाताला आयुध गणून तो गणेशाच्या हातात दिल्यानंतर ज्यांनी हे खंडण केले त्या आचार्यांचे वाङ्मय या वाङ्मय गणेशाच्या वपूत समाविष्ट करणे ज्ञानदेवांना योग्य का न वाटावे? पण संत वाङ्मयाचा आणि मराठी अध्यात्माचा वेद वाङ्मयाशी आणि संस्कृत अध्यात्माशी सूत्रसंबंधही नाही अशी भूमिका मांडावी म्हणून हे वेद आदिचें उल्लेख गाळले आहेत. संन्याशाची मुले म्हणून वाळीत टाकल्यानंतर आणि त्यांना शिक्षणापासून वंचित ठेवल्यानंतर त्यांना या ग्रंथभांडाराची नावापुरतीही कल्पना नसणार व मग त्यांचेकडे ज्ञान वा ब्रम्हज्ञान म्हणण्यासारखे ते काय असणार? असा अपसमज करून ही काटछाट व अदलाबदल केली असावी. असो.

येथवरच्या अनुक्रमामध्ये ज्ञानेश्वर गणेशाच्या सोंडेपर्यंत आले आहेत. ही सोंड विवेकवंत आहे अथवा ती विवेकवंताची आहे, असला काही भोंगळ कल्पनाविलास त्यांनी केलेला नसावा. ज्ञानेश्वरांची मूळ कल्पना संभवते ती अशी की, वेदापासून शांकरवादापर्यंतचे हे वाङ्मय अभ्यासल्यानंतर अभ्यासकाच्या दृष्टीने ब्रम्हच जर ब्रम्हांड बनते व तेच जर सर्व जीवांच्या रूपानें नटते तर आपला जीव वा आत्मा हा मुळात ब्रम्हच आहे, मग आपण ब्रम्ह होऊन आपले जीवन कृतार्थ का न करावे? असा विवेकविचार त्यास सुचतो. तो आपले आचारविचार शुद्ध करून वेद्य ब्रम्हच आपण व्हावे या उद्देशाने योगसाधना आरंभतो. त्याची तपश्चर्या गुरुदत्त प्रत्यग्ज्ञानानें सफल होते. तेव्हा श्रीगुरूंचा पद्मकर माथ्यावर पडताच शिष्याच्या डोळ्यापुढचे हे प्राकृत जग मावळते व त्यास सर्वत्र सर्वव्यापी ब्रम्ह असल्याचा आत्मप्रत्यय येतो. येथे त्याच्या जीवबुद्धीचा मळ नाहीसा होतो व त्याचा विवेक वेद्यविमळ होतो. तो वेत्ता ब्रम्हभूत होतो. ज्ञानेशांनी हा विशिष्ट विवेक गणेशाच्या सोंडेच्या ठिकाणी कल्पिला आहे.' (अर्थात सामान्य व्यवहारामधला हा विवेक नव्हे.)

सहावी त्रयी (प्रसिद्ध)

मज अवगमलिया दोनी । मीमांसा श्रवणस्थानी । बोधमदामृत मुनी ।
अली सेविती ।।१६।।

प्रमेयप्रवाल सुप्रभ । द्वैताद्वैत तेचि निकुंभ । सरिसे एकवटत इभ ।
मस्तकावरी ।।१७।।

उपरी दशोपनिषदें । जिये उदारें ज्ञानमकरंदे । तिये कुसुमे मुगुटी सुगंधे । शोभती भली ।।१८।।

येथल्या मूळ त्रयीकडे वळण्याआधी काही भोंगळ पाठांची चर्चा केली पाहिज. या तीनही ओव्या व पुढची ओवी मूळ पाठांत अनुक्रमे ९,७ व ८ आणि पुढची ४ या क्रमास होत्या, हे आपण पाहिलेच आहे. या पाठांत गणपतीचे निकुंभ सरिसेपणे इभ मस्तकावर एकवटतात वा एकत्र येतात म्हणजे जणू काही डोक्यास दोन टेंगळे उठावीत व ती सरकत सरकत एकत्र येऊन एक होतात असा संभ्रम होतो. हाच प्रकार उपनिषदांचा. शंकराचार्यांनी दहा उपनिषदांवर भाष्ये लिहिली तेव्हा ती तेवढीच आहेत असा विचार करून मग त्या दहा फुलांचा गुच्छ मुगुटाच्या कळसास बांधला, ती फुले सुरंगाने नव्हे, तर सुगंधाने शोभू लागली, अशी विचित्र समजूत येथे होते. (या ओव्यांचे शुद्ध रूप व त्यांची मूळ कल्पना वर आलीच आहे.)

आता या ठिकाणचे मूळचे ओवीत्रय पाहा–

सहावी त्रयी (मूळ)

पदबंध नागर । रंगाथिलें अंबर । साहित्यवाणसपूर । उज्वलत्वें ।।१६।।

मा व्यासादिकविमती । मेखळे मिरवती । चोखाळ झळकती । पल्लवसड ।।१७।।

अष्टादश पुराणें । तुयां तीं मणिभूषणें । प्रमेयरत्नखेवणें । पदपद्धती ।।१८।।

येथपासून ज्ञानेश्वर गणेशाचे वस्त्रालंकार वर्णन आरंभतात. पुराणांचे स्तोम माजविण्याकरता पुराणिकांनी १८ वी ओवी ५ व्या क्रमांकास व १६ वी ओवी ६ व्या क्रमांकास आणि १७ वी ओवी ९ व्या क्रमांकास नेऊन सारी सरमिसळ केली. त्याचप्रमाणे–तेचि–जेथे–वगैरे प्रक्षिप्त शब्द घालून अर्थाचा गोंधळही उडवून दिला. तो असा–

या काव्यवाङ्मयात जे विविध काव्यछंद वापरले ते भाषासौन्दर्य हे या गणेशाच्या अंगावरचे 'नागररंगाथिले' म्हणजे उपमाउत्प्रेक्षा आदि अलंकारांनी व नेत्रदीपक साहित्य प्रकारांनी खचाखच भरलेले असे ते रंगसुरंग वस्त्र आहे. सहजच व्यासवाल्मिकी यांच्यासारख्या महाकवींच्या प्रतिभा म्हणजे या वस्त्राच्या पदराच्या जरतारी झिळमिळया होत. असे ते वस्त्र– साहित्यवाणसपूरउज्वलत्वें–नागर–रंगाथिले आहे. म्हणजे मुळात हे दोन व येथवरचे आणखी काही शब्द हे सामासिक शब्द वापरले होते व त्यांचा उद्देश मात्रांचे माप साधावे हा होता.

येथे जाता जाता हेही स्पष्ट केले पाहिजे की मराठीमध्ये अध्यात्म सांगताच येणार नाही, ती क्षमता फक्त संस्कृत भाषेतच आहे असा आग्रही युक्तिवाद त्या वेळच्या शास्त्रीपंडित वर्चस्ववाद्यांनी जनमनात प्रसारित केला होता. त्यामुळे एखाद्या हरिदासाने आपल्या कथेकरता कटाव साकी वा पद वगैरे रचावयाचे झाले तर ते संस्कृतमध्येच रचले पाहिजे असा कठोर दंडक होता. आपली ब्रम्हविद्या इतरांना कळू नये म्हणून हा सनातन्यांचा अट्टाहास होता. आजही–तुम्ही वेद ऐकावयाचे नाहीत– असे म्हणणारे महाभाग मला भेटले आहेत. मग त्या काळचा विचारच नको. किंबहुना इतरांच्या मनात भय उत्पन्न करण्याकरता

अधिकार नसताना वेद ऐकले तर त्याच्या कानात शिशाचा रस ओतावा असे म्हणत. नामदेव, ज्ञानदेव यांनी ग्रंथरूपाने मराठीत अध्यात्म सांगण्याचा उपक्रम करून आमची मराठीही तितकीच सक्षम आणि अर्थप्रवाही आहे, हे सिद्ध केले. म्हणूनच आपली मराठी प्रतिसंस्कृत वाटावी अशी निश्चयी मनोभूमिका पक्की करून ज्ञानेश्वर जर बोलत आहेत तर ते आपल्या ग्रंथाकरता मौखिक मराठी न वापरता सर्वांगसुंदर अशी ग्रंथभाषाच तेवढी वापरणार हे ओघानेच आले व म्हणूनच जागजागी सामासिक शब्दांची आणि अनुप्रास, श्लेष, उपमा, उत्प्रेक्षा वगैरे अलंकारांची मुक्तहस्ते योजना ते करतात असा माझा समज आहे. म्हणूनच मी त्या अनुरोधाने हे पाठ शुद्धीकरण चालविले आहे. आता शेवटच्या त्रयीकडे वळू.

सातवी त्रयी (प्रसिद्ध)

अकार चरणयुगुल । उकार उदर विशाल । मकार महामंडल मस्तकाकारें ।।१९।।
हे तिन्ही एकवटले । तेथे शब्दब्रम्ह कवळलें । ते मियां गुरूकृपा नमिलें ।
आदिबीज ।।२०।।
(वेदांची ओवी गाळलेली आहे.)

येथे वाचक पुरा गोंधळून जातो. ओंकाराचे अकार उकार मकार हे तिन्ही एकवटतात म्हणजे नेमके काय होते, हेच वाचकाला कळत नाही. वस्तुतः गणपतीच्या शरीराचे वर्णन या ओवीने सुरू झाले आहे, हे मागे आलेच आहे. तेथे म्हटल्याप्रमाणे ज्ञानेश्वर क्रमाक्रमाने मुगुटापासून उतरत येत आहेत. सहजच वस्त्रप्रावरणानंतर मणिभूषणे व त्यातील प्रमेयरत्ने यांचे वर्णन ते करतात आणि विशेष म्हणजे गणेशाच्या चरणयुगुलापासून सुरू केलेले हे शब्दचित्र पुन्हा काव्यनाटकांच्या पायातील चाळावर आणून ज्ञानदेव ते परत चरणाच्या ठिकाणीच पूर्ण करतात.

सातवी त्रयी (मूळ)

पुराण प्रमेयपरी । पाहे निपुणकुसरी । उचितपणें माझारीं । रत्नें खचित ।।१९।।
पायीं मा काव्यनाटका । निर्धारितां कवतुका । रुणझुणतघंटिका ।
अर्थध्वनी ।।२०।।
तुये त्रयैक्य वाटलें । तैं म्यां ब्रम्ह कवळलें । जें गुरूकृपां नमिलें । आदिबीज ।।२१।।

येथे गणेशाच्या कृपेने वेद-वेद्य-वेदक अथवा ज्ञेय-ज्ञाता-ज्ञान वगैरे सर्वच त्रिपुट्या ब्रम्हानुभूतीचा प्रत्यय देऊन कृतार्थ होतात. तेव्हाच वेत्ता ब्रह्मभूत होतो व तेव्हाच तो त्या पिंडब्रम्हांडाच्या आदिबीज आद्यास गुरुकृपेने नमन करू शकतो. ते तसे मी गुरुकृपेने नमिले आहे असे सांगून श्री सरस्वती व सद्गुरू यांना नमन करून ज्ञानदेव ग्रंथारंभ करतात.

नमुन्याकरता वर्णन केलेल्या गणेशनमनात आम्हास श्री संतांच्या कृपेने मूळचे ग्रंथसौंदर्य कसकसे स्फुरत गेले ते वाचकांच्या ध्यानी येईलच. त्याचप्रमाणे असले मूळ सौन्दर्य साधावयाचे झाले तर ते प्रचलित पाठचिकित्सा शास्त्राने सर्वथा अशक्य आहे,



अनुक्रमणिका

हेही त्यांना पटेल, व मगच मी अवलंबिलेल्या 'प्रासादिक' पद्धतीचे रहस्य उमगेल. "तुमची शुद्ध वाणी मला दाखवा आणि तुमचा शुद्ध परमार्थ मज मुखे वदवा"– अशी श्रीगुरू तुकाराम महाराजांना विनंती करून मी ३५ वर्षांपूर्वी या प्रांतात पदार्पण केले. आणि संतांच्याच कृपेने ज्ञानेश्वरीवरून गीता आणि गीतेवरून ज्ञानेश्वरी दोन्हीही शुद्ध केल्या.

माझ्या शुद्ध केलेल्या गीतेत व्यासोक्त ७४५ श्लोक असून मला वाटते, सांप्रदायिक वा प्रासादिक पद्धतीने केलेले गीतेचे हे ५००० वर्षानंतरचे पहिलेच संशोधन असावे. ७४५ श्लोकांची मूळ शुद्ध गीता सिद्ध केल्यानंतर ज्ञानेश्वरीही विषयपूर्ततेच्या दृष्टीने तशीच ७४५ श्लोकी असावी म्हणून गीतेतून गळलेले श्लोक व श्लोकार्ध हे जागच्याजागी घालून ज्ञानेश्वरीची ११६३४ ओव्यांची शुद्ध संहिता मी नुकतीच पूर्ण केली आहे. याचे सारे श्रेय "तुका म्हणे कोणी वदविली वाणी । प्रसादावांचोनि तुमचिया? ।"– असे म्हणून विराम घेतो.

शुद्ध केलेली ज्ञानेश्वरी व गीता प्रसिद्ध होतील तो सुदिन । भगवतकृपेने तो दिवस लौकरात लौकर उगवावा आणि ज्ञानेश्वरांच्या इच्छेप्रमाणे– "विश्व स्वधर्मसूर्ये पहातें" व्हावे हीच विश्वनियंत्यास प्रार्थना.

सध्या ज्ञानेश्वरीत ९०३३ ओव्या असल्याचे गृहीत धरून ज्ञानेश्वरी छापण्यात येते. परंतु नागपूर हस्तलिखितात १००७७ ओव्या आढळतात. सातारा प्रतही नागपूरचीच नक्कल आहे. त्या सर्व ओव्या मी माझ्या मूळ प्रतीत घेतल्या आहेतच. शिवाय औंध प्रतीत ९५३४ ओव्या असून समासात सुमारे ४०० ओव्या जादा आहेत. त्याही मी विचारात घेतल्या आहेत. आणि तरीही जेथे अपुरेपणा वा उणिवा जाणवल्या तेथे अर्थपूर्तता व विषयसूत्र साधणे यासाठी मी स्वतः सुमारे चारशे ओव्यांची रचना करून माझ्या दृष्टीने परिपूर्ण अशी ११६३४ ओव्यांची ज्ञानेश्वरीची मूळ प्रत सिद्ध केली आहे. मी ज्या ४०० ओव्यांची भर घातलेली आहे, त्या मी केल्या आहेत असे म्हणणे उचित होणार नाही. त्या मला स्फुरत गेल्या असेच म्हणायला हवे. माझ्या ११६३४ ओव्यांच्या ज्ञानेश्वरीच्या मूळ प्रतीचा अभ्यास केल्यास कुठेही संदिग्धपणा किंवा प्रतिपादनातील अपुरेपणा वा कच्चेपणा जाणवणार नाही अशी माझी धारणा आहे.

(रा. कृ. धोंगडे, ज्ञानेश्वरी संशोधन केंद्र, १८८ प्रतापगंज पेठ, सातारा.)

---

**जुलै ८८ ते मार्च ८९ अखेर म. सा. प.कडे साहित्यिक साहाय्य निधीसाठी आलेल्या देणग्यांचा तपशील.**

(१०) श्री. कमलाकर भूमकर, नौपाडा-ठाणे, ५०१/-. (११) डॉ. प्रकाश गिरी, अमरावती, ११/-. (१२) प्रा. ग. प्र. प्रधान, पुणे, २०१/-. (१३) सौ. शीतल प्रकाश गिरी, अमरावती, ११/-. (१४) श्री. जगन्नाथ वि. दुर्गुळे, पुणे, ५१/-. (१५) प्रा. के. ज पुरोहित, वांद्रे, ५०१/-. (१६) श्रीमती सुलभा मणेरीकर, नाशिक, १०१/-. (१७) श्री. डी. एच. विरट, मुंबई, १०१/-. (१८) महाराष्ट्र साहित्य परिषद, ठाणे जिल्हा शाखेकडून, १०,०००/-.



अनुक्रमणिका

ज्ञानेश्वरी सप्तशताब्दीनिमित्त लेख :

# शिवशक्तिसमावेशन : निष्कर्ष

## अमृतानुभवाच्या पहिल्या प्रकरणावरील भाष्य.

रा. ना. सराफ

*(वैकुंठवासी रा. ना. सराफ यांनी बेळगावला राहून सराफीचा व्यवसाय करीत आपल्या हयातीत ज्ञानेश्वरी, अमृतानुभव यावर मराठी-इंग्रजी ग्रंथ प्रसिद्ध केले. परंतु ते प्रायः उपेक्षित राहिले. त्यांच्या निर्वाणानंतर 'अमृतानुभवा'वरील त्यांचे हस्तलिखित संगम प्रेसचे माजी व्यवस्थापक व चिकित्सक अभ्यासक मधू पटवर्धन यांनी मिळवले आणि ते प्रसिद्ध करण्यासाठी मॅजेस्टिक प्रकाशनच्या अशोक कोठावळे यांना उद्युक्त केले. 'सार्थ अनुभवामृत' या नावाने ४२२ पृष्ठांचे हे पुस्तक दि. ९ मे रोजी प्रकाशित झाले. पृष्ठसंख्या फार वाढत असल्यामुळे प्रत्येक प्रकरणाच्या आरंभी श्री. रा. ना. सराफ यांनी लिहिलेले प्रास्ताविक व शेवटी जोडलेले त्या त्या प्रकरणाचे मूल्यमापन हे या पुस्तकात टाकण्याचे टाळण्यात आले आहे. आम्ही 'शिवशक्ति समावेशन' या पहिल्या प्रकरणाचे 'परीक्षण व निष्कर्ष' येथे लेखरूपाने देत आहो. त्यावरून सराफ यांच्या साक्षात्कारी व अंतःस्फूर्त आकलनाची कल्पना येऊ शकेल. हा सर्वच 'प्रास्ताविक' व 'परीक्षणांचा' भागही पुस्तकरूपाने बाहेर येणे आवश्यक आहे. 'सार्थ अनुभवामृत' यामध्ये प्रत्येक ओवी, तिचा अर्थ व तिचे विवरण एवढाच भाग आला आहे. ॲरिस्टॉटल, डेकार्ट, कांट, शंकराचार्य, सुरेश्वराचार्य, विद्यारण्य, नागार्जुन, चंद्रकीर्ती वगैरे पाश्चात्य, वेदान्ती व बौद्ध तत्त्वज्ञांचा व्यासंग असणारे आणि कुठल्याही विशिष्ट संप्रदायाचा गंडा न घातलेले श्री. सराफ पूर्वग्रहविरहित दृष्टीने ज्ञानदेवांच्या विचारविश्वात निर्भीडपणे संचार करतात आणि पूर्वी कोणालाही न सुचलेले नवनवे अर्थ उलगडून दाखवतात. ॲकॅडमिक पातळीवरच्या अभ्यासापेक्षा हे लेखन फार वेगळ्या प्रकारचे व वेगळ्या उंचीवरचे आहे.)*

परिचयामध्ये दाखविल्याप्रमाणे प्रकरणाचे स्वरूप आहे की नाही याचे आता परीक्षण कर्तव्य आहे. अनुभवामृताच्या बहुतेक टीकाकारांनी ज्ञानेश्वरांनी वापरलेले शब्द सोडून त्यांनी टाळलेले शब्दच स्पष्टीकरणात वापरले आहेत. शब्दांचे अर्थ देण्याऐवजी शब्दच बदलून टाकून मूळाचा अर्थ सांगण्याचा प्रयत्न सर्वांनी केला आहे. ज्ञानेश्वरांच्या ग्रंथावर

टीका लिहिणे म्हणजे शंकराचार्यांचे तत्त्वज्ञान कसे तरी कोणत्यातरी ओवीखाली देणे असाच या टीकाकारांचा समज दिसतो. अर्थ मूळ ओवीतून निघतो की नाही हे पाहण्याची काळजीसुद्धा त्यांनी घेतली नाही. या टीकेत मात्र ज्ञानेश्वरांचे मनोगत शक्यतोवर त्यांच्याच शब्दांत देण्याचा प्रयत्न केला आहे. त्यापासून निघणारे तत्त्वज्ञान शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाशी जुळते असू दे वा नसू दे– जे निघेल ते तत्त्वज्ञान ग्रंथाला धरून सुसंगत सोपपत्तिक रीतीने मांडण्याचा माझा प्रामाणिक प्रयत्न आहे. ते तत्त्वज्ञान ज्यांना मूळ ग्रंथाला धरून आहे पण मान्य करण्याजोगे नाही असे वाटेल त्यांनी बेलाशक त्याचा त्याग करावा. ज्यांना माझी टीका मूळाला धरून नाही असे वाटत असेल त्यांनी मूळाला धरून त्याचा होणारा अर्थ करून दाखवावा. माझा अर्थ निणार्यक म्हणून मी देत नसून माझ्या दृष्टिकोणाप्रमाणे मात्र दिसणारा अर्थ तेवढा देत आहे. तीन बाजू असलेल्या पदार्थाचे कोणतेही चित्र सर्वांशाने पूर्ण अथवा बरोबर असत नाही– तसे पूर्णपणे चूकही असत नाही. अशा सगळीकडच्या दृष्टिकोणानेच शेवटी सर्वांना समत्वरूप चित्र मूळाप्रमाणे तीन बाजूंचे असे करता येते. माझ्याप्रमाणेच आणखी अनेकांनी असे प्रयत्न केल्यास ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान परिस्फूट होण्यास मदत होईल. याबाबतीत शंकराचार्यांचे उदाहरण आपणासमोर आहेच. शंकराचार्यांच्या मूळ ग्रंथावरून निष्पन्न होणारे तत्त्वज्ञान आणि त्यांच्या संप्रदायात झालेला त्याचा विस्तार पाहावा. ज्ञानेश्वरांच्या ग्रंथामध्ये व तत्त्वज्ञानामध्ये याहीपेक्षा जास्त सूचकता व गांभीर्य आहे. त्याचे सर्व सामर्थ्य व वैभव एकट्या-दुकट्याच्या प्रयत्नाने संपूर्णतया प्रकट होणे अशक्य. हजार डोळ्यांनी आणि हजार हातांनीच हे घडून येणे शक्य आहे. त्याची ही अल्पशी सुरवात मी या टीकेने करीत आहे. त्याची अपूर्णता पाहून, त्याचे वैगुण्य काढून टाकून ती जास्त सोपपत्तिक करण्याची इच्छा एखाद्या विद्वानास झाली, तर माझ्या श्रमाचे चीज होईल, माझी एक मनीषा सफळ होईल.

मंगलाचरणरूप असलेल्या या प्रकरणात ज्ञानेश्वरांनी मंगलाचरण करण्याकरिता ज्यांना नमन केले आहे ते शिव- शक्ती कोण? त्याचा अर्थ काय? कोणी ब्रह्म आणि माया, कोणी प्रकृती आणि पुरुष, कोणी ईश्वर व त्याची माया, कोणी अहमंश व इदमंश असे त्याचे पर्यायी अर्थ केले आहेत. शिव आणि शक्तीला ज्ञानेश्वरांनी अनेक विशेषणे जोडून संदेह आणि विपर्यास टाळण्याचा कसोशीने प्रयत्न केला आहे. ती विशेषणे वरीलपैकी ज्यांना संपूर्णपणे लागू पडतील तेच शिव-शक्तीचे अर्थ मानले पाहिजेत. तसे जर साधत नसेल तर अर्थ अर्थातच चुकीचे ठरतील. आता ब्रह्म आणि माया घेऊ.

ज्ञानेश्वरांनी शिवशक्तीला लावलेली विशेषणे ब्रह्म आणि माया यांना अजिबात लावता येत नाहीत असे दिसते. ज्ञानेश्वर म्हणतात– शिव-शक्ती समरूपी आहेत. शंकराचार्य म्हणतात; तमः प्रकाशाबद्विरुद्ध स्वभावयो : काळोख आणि प्रकाशाप्रमाणे ब्रह्म आणि माया केवळ परस्पराहून भिन्नच नव्हेत, तर एकमेकांचे विरोधी आहेत. ज्ञानेश्वर म्हणतात– शिव आणि शक्ती आपले तत्त्व एकच आहे असे दाखवितात; तर ब्रह्म आणि

माया यांचे तत्त्व एकच आहे, दोघेही एकाच तत्त्वाचा आविष्कार आहे असे कोणीच म्हणत नाही. शिवशक्ती दोघेही निरुपाधिक असून जगज्जनक आहेत. निरुपाधिक ब्रह्म जगज्जनक असूच शकत नाही. प्रेमाच्या योगाने ब्रह्म-माया अगर माया-ब्रह्म होत नाहीत. पण शिव-शक्ती आपली रूपे आलटून-पालटून घेतात. शक्ती शिव होते तर शिव शक्ती होतो. शिव-शक्तीचे अस्तित्त्व एक, ज्ञान एक त्याप्रमाणे ब्रह्म आणि माया या दोघांचे एक अस्तित्व, एक ज्ञान अशक्य आहे, इतकेच नव्हे, तर मायेच्या योगाने ब्रह्माचे अस्तित्व लोपते, ब्रह्माचे ज्ञान होत नाही, तर उलटपक्षी ब्रह्माच्या ज्ञानाने मायेचा संपूर्ण नाश होतो. शक्तीच्या योगानें शिव शक्तिमान् सर्वसमर्थ होतो, तर शिवाच्या योगानेंच शक्ती संपूर्ण होते. मायेच्या योगाने ब्रह्म 'गोसावी' होत नाही किंवा ब्रह्माच्या योगानेच माया संपूर्णपणे अस्तित्वात येत नाही. शिवशक्तीचे जीवन एक तर ब्रह्म-मायेचे जीवन विरुद्ध. शिव आणि शक्ती दोघेही एकमेकांचा विषय आहेत, तसे विषयीही आहेत. ब्रह्म आणि माया एकमेकांचे विषयही नाहीत, विषयीही नाहीत. शिवाची सत्ता तीच शक्तीची सत्ता. त्याप्रमाणे ब्रह्माची जी सत्ता तीच मायेची सत्ता असे म्हणता येत नाही. शक्तीच्या योगाने शिव सर्वकर्ता होतो, मायेच्या योगाने ब्रह्म सर्वकर्ता होत नाही. शिव हेच शक्तीचे जीवन, ब्रह्म हेच मायेचे जीवन असे म्हणता येत नाही. शक्ती ही शिवाचा प्रकाश आहे; माया ही ब्रह्माचा प्रकाश नव्हें, तर उलट प्रकाशाचे आवरण. साऱ्या प्रकाशाप्रमाणे सारी शक्ती घेऊ गेल्यास, एकत्रित केल्यास शिवच हाती लागतो. सारी माया एकत्रित करून घेऊ गेल्यास ब्रह्म हाती लागत नाही. माया जेवढी धरू जाल तेवढे ब्रह्म दूर. शिवात शक्तिशिवाय शिवपण नाही, ब्रह्मात मायेशिवाय ब्रह्मपण नाही असे म्हणता येते काय? इतकेच नव्हे, तर शक्ती ही शिवरूप द्रव्यानेच घडलेली आहे. माया ब्रह्माने घडलेली आहे काय? शक्तीचे सौन्दर्य, ऐश्वर्य, वैभव पाहण्याच्या लोभाने शिव द्रष्टाव्यक्तिरूप ज्ञाता होतो. मायेच्या सौन्दर्याचा अस्त लोभ ब्रह्माला पडतो काय? तसेच शिव हा शक्तीचा, आणि शक्ती शिवाचा आरसा आहेत. म्हणजे शिवाचे स्वरूप शक्तीत दिसते तर शक्तीचे स्वरूप शिवात दिसते. ब्रह्म आणि माया ही एकमेकांचे आरसे नाहीत. ब्रह्माचे स्वरूप मायेत अगर मायेचे स्वरूप ब्रह्मात दिसत नाही. सूर्यावर गेल्यावर रात्रही नाही व दिवसही नाही तसे आपल्या अकृत्रिम स्वयंभू तत्त्वरूपामध्ये शिवही नाही आणि शक्तीही नाही, तर "दोन्ही न होती उरे । दोहींचे साच ।।" दोघामध्ये असणारे सत्तत्व तेवढे राहते. आपल्या पारमार्थिक रूपात ब्रह्म आणि माया दोन्ही नाहीशी होऊन त्या दोघाचे सत्तत्त्व शिल्लक राहते असे म्हणता येत नाही. शेवटी ज्ञानेश्वर म्हणतात की– मिठाने मीठपणाचा लोभ सोडून समुद्रत्व प्राप्त करून घेतले त्याप्रमाणे मी माझ्या मीपणाचा त्याग करून शंभू व शांभवी झालो. शिव-शक्तीशी एकरूप होऊन केळीच्या गाभ्याने आकाशात एकजीव व्हावे त्याप्रमाणे मी शिवशक्तीच्या समावेशाने शिवशक्तीशी एकरूप झालो. हेच अभेदनमन. मीपणा सोडून कोणी ब्रह्मरूप व मायारूप होईल काय? ब्रह्म आणि माया यांच्याशी एकरूप होण्याची भाषा

असमंजस आणि हास्यास्पद आहे.

एथवर शिवशक्तीला लावलेली विशेषणे ब्रह्म आणि माया यांना लावून पाहिली. ती समर्पक तर नाहीतच, उलट हास्यास्पद असा उपसिद्धान्त मांडल्यासारखे होते. यानंतर शिव-शक्ती म्हणजे प्रकृती– पुरुष ठरतात की काय हे पाहू.

शिव-शक्तीला लावलेली विशषणे ब्रह्म आणि मायेप्रमाणे प्रकृती व पुरुष यांनाही लागू पडत नाहीत. कसे ते पहा–

पुरुष चेतन तर प्रकृती जड. अर्थात् ते समरूपी नाहीत हे उघड आहे. प्रकृती व पुरुष हे एकाच तत्त्वाचे आविष्कार नव्हेत. शिव-शक्ती दोन्ही मिळून एक होतात तसे प्रकृती पुरुष दोन्ही मिळून एक होत नाहीत. कारण जड-चेतनाचा संबंध अशक्य आहे. शिवशक्तीची सत्ता एक तर पुरुष आणि प्रकृती यांची भिन्न भिन्न सत्ता असते. प्रकृतीपासून आपले जाणणारा पुरुष कैवल्याला गेला तरी प्रकृतीचे आपले काम चालूच. इकडे शिवाशिवाय शक्तीला सत्ता नाही. शिव एक तर पुरुष अनंत. शिव-शक्ती दोघेही एकमेकावर अवलंबून असतात. पण प्रकृतीचे अस्तित्व पुरुषावर व पुरुषाचे अस्तित्व प्रकृतीवर अवलंबून नाही. त्या दोघांनाही स्वतंत्र अस्तित्व असते. आणि म्हणूनच ती दोघे एकमेकांचे जीव की प्राण असे म्हणता येत नाही. एकाशिवाय दुसऱ्याचे अस्तित्वच अशक्य असते त्याच वेळी त्यांना जीव की प्राण म्हणतात. शिवशक्तीपैकी एखादे जागे झाल्यास सर्वांचाच संहार होतो. पण पुरुष-प्रकृतीपैकी पुरुष जागा झाल्यास असंग मुक्त होतो. साऱ्या विश्वाचा उपसंहार करू शकत नाही. प्रकृती तर मुळी जागी होऊच शकत नाही. चेतन वस्तू झोपू अगर जागी होऊ शकते. प्रकृती तर जड. तिला झोपही नाही, जागही नाही. शिवशक्तीप्रमाणे पुरुष-प्रकृती एकमेकांचे विषयही नाहीत–विषयीही नाहीत. जड हा विषय आहे. विषयी कधीच होत नाही. ज्या ठिकाणी प्रकृती-पुरुष ह्यांचा उल्लेख साहजिकपणे यावा, त्या ठिकाणीही ज्ञानेश्वर प्रकृती शब्द हेतुपूर्वक कटाक्षाने टाळून लिहितात–

'स्त्री-पुरुष नाम भेदें । शिवपण एकलें नांदे ।।'

शिव-शक्ती म्हणजे प्रकृती पुरुष– असा अर्थ ज्ञानेश्वरांना अभिप्रेत असता तर त्या ठिकाणी– प्रकृति पुरुष नामभेदें । शिवपण एकलें नांदे ।। असे म्हटले असते. पुरुषाच्या जोडीने येणारा प्रकृती हा शब्द त्यांनी का गाळावा? याचा अर्थच हा की शिव-शक्ती ही प्रकृती-पुरुषापासून भिन्न आहेत. हेच त्यांना दाखवावयाचे होते. या ठिकाणी स्त्री शब्दाचा अर्थ प्रकृती आहे असेही अर्थसंदर्भाकडे पाहता म्हणता येत नाही. प्रकृती-पुरुषाच्या रूपाने एकटा शिवच नांदतो आहे असे सांख्यांचे मत नाही. उलटपक्षी ज्ञानेश्वर तर सांगतात की स्त्री-पुरुष हा नावाचा भेद आहे. आहे तो एक शिवच. शिवाशिवाय प्रकृतीला सत्ता नाही. पण प्रकृतीची सत्ता अशी पुरुषावर अवलंबून नाही. संपूर्ण शक्ती घेऊ गेल्यास शिवच हाती लागतो तसे संपूर्ण प्रकृती घेऊ गेल्यास पुरुष कधीच हाती लागत नाही. पुरुष हाती लागल्यास प्रकृतीचा संपूर्ण त्याग केला पाहिजे. प्रकृतीपासून पुरुषाचे अत्यंत भिन्नत्व, असंगत्व

जाणले पाहिजे. प्रकृतीच्या पाहण्याच्या लोभाने पुरुप द्रष्टा होत नाही, तर तो द्रष्टा मूळचाच असल्यामुळे त्याच्या भोगापवर्गाकरिता नैसर्गिकरीत्याच प्रकृती त्याच्या समोर दृश्याचा पसारा मांडते. त्यात पुरुषाच्या इच्छेचा काही संबंध नाही. पुरुषाची इच्छा असो वा नसो प्रकृती आपल्या दृश्याचा पसारा मांडून बसणार. प्रकृतीने वाढलेल्या ज्ञेयाच्या अन्नाबरोबरच पुरुष प्रकृतीलाही खाऊन टाकून नाहीसे करीत नाही. यावरून शिवाहून पुरुष अगदीच भिन्न हे सिद्ध होते. शिव-शक्ती एकमेकांचे आरसे आहेत. पुरुषामध्ये प्रकृतीचे प्रतिबिंब पडत नाही, आणि पुरुपाचे जे स्वरूप प्रकृतीच्या आरशात दिसते ते विपर्यस्त व विकृत असल्यामुळे फसवणूक करणारे असते. प्रकृतीशी संयोग झाला की आनंद आपणालाच उपभोगू लागण्याऐवजी त्रिविध तपांची अखंड परंपराच सुरू होते. शक्तीप्रमाणे प्रकृती निर्भेळ आनंद देत नाही, तर– सुखाद्बाहुतरं दुखम्– सुख पाहता जवापाडें । दुःख पर्वताएवढें ।। याकरितांच प्रकृतीचा संग टाळला पाहिजे. वाऱ्याची गती– सोन्याची कांती– कस्तुरीचा परिमळ, अग्नीची उष्णता याप्रमाणे शिवाशी शक्ती अभिन्न आहे तर प्रकृती-पुरुप कसे तर–

प्रकृति सरितेच्या तटी । मेरू होय हा किरिटी ।।
माझी बिंबे परी लोटीं । लोटूं नेणें ।
इया प्रकृति पृथ्वी नभा । तेतुला पाडू ।।

जमीनअस्मानाइतका फरक. शिव आणि शक्तीचे मूळ स्वरूप एक आहे; तसे प्रकृती पुरुपाचे मूळ स्वरूप एक नाही. म्हणून त्याच्या अपेक्षेने ती सापेक्ष सत्ये होत नाहीत. शिव भेद आणि अभेद दोन्ही गिळतो. पुरुष भेदही गिळत नाही की अभेदही गिळत नाही.

शिवशक्ती हे सर्वसमावेशक असल्यामुळें त्यांना नमस्कार करण्यापुरते सुद्धा ते कुणाला वेगळे राहू देत नाहीत. प्रकृती पुरुष समावेशक नाहीत शिवाय ते नमनाचा विषयही नाहीत. त्यांना नमन करून लाभही नाही. अलंकार सोन्याला किंवा कल्लोळ पाण्याला अभेदभावाने नमन करतो तसे नमन ज्ञानेश्वरांनी शिव-शक्तीला केले आहे. प्रकृती पुरुषाला असे अभेद भावाने नमन करणे अशक्य आहे. जेथे खरीखुरी भिन्नता आहे तेथे अभेदभावाने नमन कसे शक्य आहे? अभेद नमनाला स्वाभाविक अभिन्नत्व लागते. शिव-शक्तीशी अभिन्न असल्यामुळे ज्ञानेश्वर त्यांना अभेदभावाने नमन करू शकले तसें ते प्रकृती-पुरुषाला करू शकतील काय? ज्ञानेश्वर म्हणतात– मी शिव-शक्तीशी अभिन्न असल्यामुळे नमनाकरिता त्यांना उपास्य म्हणून भिन्न न करिताच त्यांना नमन केले. याला उदाहरण म्हणून सांगतात की मिठाने मीठपणाचा लोभ सोडला की तो समुद्र होतो, तसा माझा मीपणा टाकून देऊन मी 'शिव व शक्ती' दोन्ही झालो. पुरुप प्रकृतीच्या नमनाने पुरुष प्रकृती होईल काय? शिवाय एकाच वेळी पुरुष म्हणून चेतन व प्रकृती म्हणून जड असे होणे जात्याच अशक्य आहे.

अनुभवामृतातच नव्हे, तर ज्या ठिकाणी प्रकृती-पुरुष विवेक सांगितला आहे त्या



अनुक्रमणिका

भगवद्‌गीतेच्या तेराव्या अध्यायात प्रकृती-पुरुषाचे वर्णन त्यांनी असे केले आहे की, शब्द जरी तेच तरी त्याचा अर्थ आपल्या तत्त्वज्ञानाशी जुळता व्हावा. सांख्याच्या प्रकृती-पुरुषाहून तर राहोच, पण गीतेतील प्रकृती-पुरुषाहून जास्त सखोल, जास्त व्यापक, जास्त सुसंगत समर्पक असे प्रकृती-पुरुषाचे अर्थ करून मुळाशी व्याकोप न करिताच आपल्या स्वतंत्र तत्त्वज्ञानाचे सूतोवाच त्यांनी केले आहे. प्रस्तुत प्रकरणाच्या ज्ञानाकरिता आवश्यक तेवढा भाग मी येथे घेत आहे. त्यावरून ज्ञानेश्वरी व अनुभवामृत यांत एकवाक्यता कशी आहे हे दिसून येईल व त्याबरोबरच त्यांचे तत्त्वज्ञान परिस्फुट होईल.

ज्ञानेश्वर सांगतात, प्रकृति-पुरुष दोघेही अनादि आहेत. दिवस आणि रात्र जशी एकमेकाला जोडून असतात तशी ही जोडी आहे. या ठिकाणी अनुभवामृतातील, राती आणि दिवो । पालली सूर्याचा ठावो ।। या ओवीची आठवण झाल्याशिवाय राहत नाही. अखंड प्रकाश म्हणजे मूळ वस्तू, खंडित प्रकाश म्हणजे क्रमवर्ती ज्ञान हे शिव-शक्तीचे रूप सद्वस्तू ज्ञानरूप असून तिच्यात असणारे ज्ञानाकार म्हणजेच विषय हे क्रमाने जाणिवेच्या कक्षात येणे यालाच जगत्, प्रपंच, संसार म्हणतात. या क्रमवर्ती ज्ञानामध्येच अर्थ असतो. एकत्वातीत अशा सार्वज्ञ ज्ञानामध्ये नुसती सत्ता असते. नुसते ज्ञान असते. ते ज्ञान सार्थ होण्याकरिता क्रिया लागते. ती प्रकृती. मुळात यासंबंधी काहीही गमक नसताना ज्ञानेश्वरांनी प्रकृती पुरुषाचे अर्थ क्रिया व सत्ता असे स्वतंत्रपणे केलेले असल्यामुळे ते त्यांच्या तत्त्वज्ञानाचे दर्शक ठरतात.

तरी केवळ जे सत्ता । तो पुरुष पांडुसुता । प्रकृति ते समस्ता । क्रिये नाव ।।

प्रकृतीच्या योगाने ज्ञानस्वरूपात स्वात्मरूपाने असलेले ज्ञानाकार क्रमाने प्रकट होऊ लागले की त्यात अर्थ उत्पन्न होतो. एऱ्हवी सर्वत्र सदैव ज्ञानस्वरूपात विद्यमान असलेल्या ज्ञानाकारांत स्थलसापेक्ष, कालसापेक्ष असे पौर्वापर्य असत नाही . पौर्वापर्याशिवाय अर्थ नाही. कल्पना करा की रामायण अगर महाभारत एखाद्याला पहिल्या श्लोकापासून शेवटच्या श्लोकापर्यन्त एकाच काली वाचता आले तर त्याला त्याचा काय अर्थ कळेल? रामाचा जन्म, बाल्य, शिक्षण, लग्न, वनवास, सीतावियोग, लंकेवरील स्वारी, रावणाचा नाश, पुनः अयोध्येला आगमन ही सारी एकाच वेळी एकत्रित होतील. अर्थबोध होणार नाही. सौन्दर्य प्रगट होणार नाही की रसनिष्पत्तीही होणार नाही. सर्वच 'आहे' या स्वरूपात 'होतें' 'होईल' हे तिथे नाहीच. 'आहे तें आहे' हा सत्याचा विषय नव्हे की सौन्दर्याचा विषय नव्हे की भावनेचा विषय नव्हे. "जे नव्हतें पण होईल" "जे होतें पण जाईल" अशा ठिकाणीच सत्व, सौन्दर्य आणि रस यांची प्रतीती येते.

आता प्रकृती आणि पुरुषाचे ज्ञानेश्वरांनी केलेले वर्णन पाहू.

मुळात 'पुरुष' असा शब्द असल्यामुळे ज्ञानेश्वरांना तो नाइलाजाने वापरावा लागला तरी त्यावर कोटीक्रम करून ज्ञानेश्वर म्हणतात की 'पुरुष' हे त्याचे आडनाव वस्तुवाचक नाव नव्हे. याचेच स्पष्टीकरण करताना ते म्हणतात की खरोखर पाहता हा ना पुरुष, ना स्त्री,



अनुक्रमणिका

ना नपुंसक. इतकेच काय, त्याच्याबद्दल निर्णायक असे काहीच सांगता येत नाही. पुरुष या शब्दावर कोटी करून तो सांख्याच्या पुरुषाहून भिन्न आहे असे ज्ञानेश्वर सूचित करतात. कारण हा पुरुष दुसरा-तिसरा कोणी नसून पूर्वी ज्ञेय म्हणून ज्याचे वर्णन केले तोच होय असे स्पष्टपणे सांगतात.

येऱ्हवीं आघवेंचि आत्मा । हें सांधौनि विरोत्तमा ।।
तें तूंझीया मनोधर्मा । मिळेल ना ।।

हे सर्व आत्मा आहे असे सांगितले तर तुला त्याचे आकलनच होणार नाही म्हणून–

एक क्षेत्र एक ज्ञान । एक ज्ञेय एक अज्ञान ।।
हे भाग केले अवधान । जाणौनि तुझे ।।

आणि शेवटी चार ठिकाणी विभागलेले हे तत्त्वज्ञान आता प्रकृतिपुरुष विवेकाच्या रूपाने पुनः सांगतो असे श्रीकृष्णाच्या मुखाने ज्ञानेश्वर सांगत आहेत. ज्यांनी हा प्रकृति-पुरुष-विवेक शास्त्रबद्ध केला, त्या कपिल महर्षींना ज्ञानेश्वरांनी कृष्णाचा अवतार असे गीतेला धरून सांगितले असले तरी कपिलाच्या तत्त्वज्ञानाहून ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान सर्वथैव भिन्न आहे हे याच अध्यायात ते ठिकठिकाणी दाखवीत आहेत. ज्ञेय म्हणून सांगितलेला क्षेत्रज्ञच पुरुष असे ज्ञानेश्वरांनी सांगितल्यामुळे ज्ञेय म्हणून म्हटलेल्या वस्तूचे वर्णन ज्ञानेश्वर कसे करतात पाहू म्हणजे त्यावरूनच पुरुषाविषयी त्यांची कल्पना काय होती ते स्पष्ट होईल.

वस्तूला वस्तू म्हणण्याऐवजी तिला ज्ञेय असे का म्हटले? तर वस्तू ही ज्ञानाशिवाय प्राप्तच होत नाही. इतर वस्तू श्रमाने, विनिमयाने मिळतील. पण सद्वस्तू ज्ञानाशिवाय कशानेही प्राप्त होत नाही. ज्ञानाशिवाय ही वस्तू सापडत नाही, आणि ज्ञान तर होत नाही मग ती आहे असे कसे व का म्हणावे? या वस्तूला नाही म्हणावे तर विश्वाकाराच्या रूपाने तीच प्रकटत आहे. म्हणून विश्वालाच सद्वस्तू म्हणावे तर ती माया. अर्थात् ही माया अत्यंताभाव प्रतियोगी स्वरूप नसून औचित्य शक्तिरूप आहे. कारण पुढे ज्ञानेश्वर म्हणतात की– विश्वाकाराशिवाय वस्तू दिसत नाही. पण दिसते ती माया असे म्हटल्यावर सत्य कुठेच नाही म्हणावे तर त्या सद्रूपाशिवाय महदादी प्रकृती कुठे स्फुरते? रमण महर्षीही म्हणतात–

शक्तिः संचलादेव लोकानां तात संभवः ।.
चलनस्थाश्रयो वस्तु न संचलति कर्हितीत् ।।

वस्तू प्रगट होते ती आपल्या शक्तीमुळे. पण शक्तीचा प्रादेशिक व सापेक्ष आविष्कार म्हणजे सद्वस्तू नव्हे. कारण सद्वस्तूचे संपूर्ण सामर्थ्य मर्यादित देशकालात संपूर्णपणे प्रकट होणे अशक्य. शक्तीचे संपूर्ण प्रकटीकरणच वस्तुस्वरूप होय. पण ते देशकालातीत असल्यामुळे बुद्धिगम्य नाही. वस्तुस्वरूपात वस्तूची शक्ती नेहमीच प्रकटीकृत असते. पण ती ज्ञानातीत असल्यामुळे जाणिवेच्या कक्षेत येण्याकरिता तिला

स्थलकालाचे आलंबन लागते. तासाभराचे गाणे एकाच क्षणात ऐकू आल्यास त्याला ना राग ना ठेका! ते संगीतच राहणार नाही. ते नादाचे व संगीताचे मूळ स्वरूप होईल. त्या ठिकाणी सारा राग, ठेका आविष्कृत स्वरूपात आहे, पण तो स्थल-कालसापेक्ष होऊन जाणिवेच्या कक्षेत आल्याशिवाय बुद्धिगम्य आणि उपयुक्त होत नाही.

शिवाच्या स्वात्मभूत शक्तीचा आविष्कार असे हे विश्व शिवाचे पारमार्थिक पूर्ण रूप नसले तरी शिवस्वरूपच विश्वाकार होऊन राहते. घडा, परळ, रांजण या आकाराने मातीच असते पण ते आकारच तेवढे माती नव्हेत. त्याप्रमाणे शिवही सर्वच आपण होऊन राहतो, तरी सर्व होऊनही शिवाची शक्ती संपूर्णपणे प्रकट होत नाही. म्हणजे आहे ते सर्व होऊनही पुनः शिवस्वरूप अनंतपणाने उरतेच .

क्रियारूप शक्तीचा आश्रय सदैव स्थिर अचल असतो. शिवाच्या अचलपणामुळेच शक्तीचे संचलन शक्य आहे. याचा अर्थ झालेले बदल, फरक, शक्तीच्या आविष्कारात, शिवाच्या स्वरूपात नव्हे. उणे, वैगुण्य असेल तर ते अविष्कारात, जिचा तो आविष्कार त्या मूळ सद्वस्तूत नव्हे. घडा चांगला अगर वाईट, कच्चा अथवा पक्का, सुंदर अथवा बेडौल असतो पण मातीला ही कोणतीही विशेषणे लागू होत नाहीत.

नामरूप संबंधु । जाति क्रिया भेद
हा आकारासि चि प्रवादु । वस्तुसि नाहीं ।।

ज्ञेयरूप असणाऱ्या सद्वस्तूची क्रियारूप असणारी शक्ती हीच ज्ञानेश्वरांनी प्रकृती मानली आहे. या प्रकृतीलाच पुढे त्यांनी दैवी माया असे म्हटले आहे. ती कशी आहे हे सांगताना ज्ञानेश्वरीतील काही ओव्यांची आठवण करून देतात.

हे प्रकृति क्षणीं नवी । रूपा गुणाची आघवी ।।
जडाते हि माजवी । इदयेचा माजू ।

अनुभवामृतांत याचाच अनुवाद करीत ज्ञानेश्वर सांगतात कीं ही चिच्छक्ती कशी आहे.

दर्शनऋद्धी बहुवसा । चिच्छेषु मानती ऐसा ।।
जे शिवी न पाहे आरिसा । वेद्यरत्नाचा ।।
क्षणीं क्षणीं नीच नवी । दृश्याची चोख मदवी ।
दिठी करवी वेढवी । उदार जे ।।
मागीलिये क्षणींचे अगे । पारुसे म्हणोनिया वेगें
सांडूनि दृष्टि निगे । नवया रूपा ।।

अशा या शक्तिरूप प्रकृतीचे वर्णन करताना ज्ञानेश्वर सांगतात की–

किंबहुना सकळ । खेळ इयेचा

अविकारी अशा शिवस्वरूपात आविष्काराच्या योगाने विकार उत्पन्न झाल्याचे दाखवीत असणाऱ्या अचिंत्य शक्तीला ज्ञानेश्वर भ्रमाचे महाद्वीप, विकाराची जननी, कामाचा मंडप (इच्छाशक्तीच्या) मोहाच्या वनातील वसंतश्री अशी ही दैवी माया आहे असे

म्हणतात. ही अद्वयाची दुसरी, त्रिसंगाची सोयरी आहे. हिच्या योगानें अद्वयाच्या अद्वयत्वाचा भंग होत नाही; हिच्या संगाने निसंगाच्या निसंगत्वाचा भंग होत नाही.

ऐसें इया प्रकृती । आपुलिया सर्वव्याप्ती ।।
तेया अविकृताते विकृती । माजी की जे ।

अशी ही प्रकृती आपल्या सर्व व्याप्तीने त्या अविकाराला विकारात आणते. शक्तीचा आधार म्हणून स्थिर असलेल्या शिवस्वरूपात आविष्काराच्या गतीने विकाराचा आभास निर्माण करते. कारण शक्तीने प्रकट केलेले मुळातच स्वयंभू असल्यामुळे शक्तीला प्रकटीकरणाशिवाय दुसरे काहीच करावयाचे नाही. गाण्याच्या तबकडीवर असलेले संपूर्ण गाणे क्रमाक्रमाने फोनोग्राफच्या सहाय्याने प्रकट करावे त्याप्रमाणे शिवस्वरूपात पूर्वीच विद्यमान व एककालीन असलेल्या वस्तू व घटना नव्याने व क्रमाने उत्पन्न झाल्याचे आविष्काराच्या योगाने दिसते. एऱ्हवी शिवस्वरूप सर्वसंग्राहक असूनही ज्ञानगम्य होत नाही हे पूर्वीच सांगितले आहे.

सातव्या अध्यायातही अष्टधा प्रकृतीच्या वर्णनात ज्ञानेश्वर या प्रकृतीला अंगाच्या छायेप्रमाणे असणारी माया व तिलाच पुढे प्रकृती म्हणतात असे सांगून माया व प्रकृती या दोन्हीचे अर्थ अंगाची छाया तशी सद्वस्तूची छायारूप आहे असे दाखवितात. शरीराला जशी छाया टाळता येत नाही, तशी सद्वस्तूला प्रकृतिरूप शक्ती टाळता येत नाही. छाया हा एकदेशी दृष्टान्त आहे. अंगाचे सादृश्य एवढाच त्याचा अर्थ म्हणजे अंग व छाया समरूप आहेत.

याच अष्टधा प्रकृतीच्या साम्यावस्थेला परम प्रकृती जीव असे ज्ञानेश्वर म्हणतात. अर्थात सांख्याच्या जड प्रकृतीहून ही जीवरूप प्रकृती सर्वथैव भिन्न आहे हे सांगावयास नकोच. पंधराव्या अध्यायात याचाच अनुवाद करीत, निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळ्या प्रकारांनी सांगितले. त्या या प्रकृतीचे संकलन करीत ज्ञानेश्वर सांगतात की–

पैं अष्टधा भिन्न ऐसें । जें दाविलें प्रकृतिमिसें ।।
जें क्षेत्रद्वारें खात्रीसें । भागीं केले ।।
हें मागिलें सांघौ केती । अगा आतां चिजें प्रस्तुति ।।
रूखाकारू रूपकरीति । निरूपिलें ।।
तें आघवेंचि साकारें । कल्पौनि आपणपेयां पूढे ।।
जालें असे तदनुसारें । चैतन्य चि ।।
अर्जुना गा ययापरी । साकारू कल्पौनि पुरी ।।
आत्मा विस्मृतिची करी । नीद तेथ ।।
एवं जीव चैतन्य आघवे । हें क्षरू पुरुष जाणावें ।.

अष्ठधा प्रकृतीची साम्यावस्था, क्षेत्र, क्षर पुरुष, हे सारे शब्द एकार्थक आहेत. म्हणजे

जीव चैतन्यालाच ही सारी नामाभिधाने आहेत. यावरून प्रकृती व पुरुष दोघेही एकाच नाण्याच्या दोन बाजूंप्रमाणे आहेत असे दिसते.

पुरुषाहून सर्वथैव विलक्षण अशी प्रकृती पुरुषाच्या भोगमोक्षाकरिता स्वाभाविकपणे दृश्याचा पसारा मांडते असा सांख्यांचा सिद्धान्त आहे, तर ज्ञानेश्वर,

तैसी स्वरूपी जाली माया । आणि स्वरूप नेणाणे धनंजया ।
ते चि तरू यया । मूळ पाहिले ।।
वस्तुसि आपुला जो अबोधु । जो उर्ध्वि आळुठैजे कंदु ।।
वेदांति ही हा प्रसिद्धु । बीज भावो ।।

वस्तूला स्वतःला जाणता न येणे हेच जगद्रूपाचे मूळ मानतात. 'डोळयां आपुले पाहणे । दुवाड जैसे ।।' सगळ्या वस्तू पाहणाऱ्या डोळयांना स्वतःला मात्र पाहता येत नाही. तसे सर्व जाणणाऱ्या ज्ञानरूप आत्म्याला स्वतःला जाणता येत नाही. यातूनच विश्वाची उत्पत्ती होते. अग्नीला जसे सतत इंधन पाहिजे तसे ज्ञानास सतत ज्ञेयाचा पुरवठा पाहिजे. नाहीतर इंधनाशिवाय अग्नीप्रमाणे ज्ञेयाशिवाय ज्ञान शांत होईल. ज्ञेयाची आवश्यकता ज्ञानाला स्वतःच पुरी करावी लागते. कारण ज्ञानाशिवाय अन्य पदार्थच अस्तित्वात नाही. ज्ञान म्हटल्यावर ते कशाचे तरी पाहिजे. ज्याचे ज्ञान ते ज्ञेय. अर्थात ज्ञानातच स्वात्मभूत असे ज्ञानाकार म्हणून स्वाभाविक असले पाहिजे. असताची उत्पत्ती व सताचा नाश अशक्य आहे, असे गीता सांगते. एकच एक तत्त्व ज्ञानरूप मानल्यावर त्याला आवश्यक असणारे विषय आता कुठे असणार? अर्थात ज्ञानातच. ज्ञान व ज्ञानाशिवाय काहीच असू शकत नसल्यामुळे विषयही ज्ञानाकारच असले पाहिजेत, असे अनिवार्यपणे मानावे लागते.

सांख्याच्या प्रकृती-पुरुष विवेकाच्या तत्त्वज्ञानाहून ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान सर्वथैव भिन्न आहे, हे वरील विवेचनावरून दिसून येईल. गीतेच्या टीकेमध्ये मूळ श्लोकाला धरून ज्ञानेश्वरांना 'पुरुष' 'प्रकृती' शब्द वापरावे लागले तरी त्यांनी त्यामध्ये स्वतःच्या तत्त्वज्ञानाला अनुकूल असा नवीन अर्थ त्यात भरला आहे. अनुभवामृतात तर हे शब्द त्यांनी लक्षपूर्वक गाळले आहेत. असे असून त्यांच्या 'शिव' 'शक्ती' शब्दांचे अर्थ 'पुरुष' 'प्रकृती' करणे अयोग्य आहे.

कोणी द्विदल धान्याच्या (दोन) डाळीप्रमाणे शिवशक्तीची कल्पना करतात पण ते मूळाच्या अगदीच विरुद्ध आहे. दोन मिळून एक होतात म्हणून दोघे अर्धे अर्धे नव्हे असे ज्ञानेश्वर स्पष्टपणे सांगतात. शिवाय डाळीचे दोन्ही भाग वेगवेगळे राहू शकतात तसे शिवशक्ती वेगवेगळी राहू शकत नाही. शक्ती नाहीशी झाली की शिव महाशून्य होतो. शिवाशिवाय तर शक्तीला अस्तित्वच नाही.

कोणी शिव म्हणजे अहमंश व शक्ती म्हणजे इदमंश असे विवरण करतात. याला मुळात काहीच आधार नाही. इतकेच नव्हे, तर सारे प्रकरण याच्या विरुद्धच आहे. शिव-शक्तीला लावलेली विशेषणे यांना लावून पाहावीत. उदाहरणार्थ शिवशक्ती समरूपी

आहेत. अहमंश इदमंश समरूपी आहेत, असे स्वतः टीकाकारही म्हणू शकणार नाहीत. परमाणूमध्ये सुद्धा ही दोघे ऐसपैस रीतीने राहतात असे ज्ञानेश्वरांनी सांगितले आहे. जिही येक येकाविण । न की जे तृणाचे हि निर्माण ।। गवतामध्ये इदमंशाप्रमाणे अहमंश असले तर मी गवत असे ज्ञान होईल, हे गवत असे ज्ञान होणार नाही.'

शेवटी ज्ञानेश्वर नमनविषयभूत अशा शिवशक्तीशी समावेशपूर्वक तादात्म्य सांगतात. ते वरीलपैकी कोणत्याही पक्षास जुळणारे नाही. ब्रह्म आणि माया, प्रकृती आणि पुरुष, अहमंश आणि इदमंश या जोडीशी एकात्मता सांगता येत नाही हे उघड. माया, प्रकृती, इदमंश हे जड असल्यामुळे चेतनाचे त्यांचेशी तादात्म्य आशक्यच नव्हे, तर अकल्पनीय आहे.

आतापर्यंत केलेल्या ऊहापोहावरून परिचयामध्ये दाखविलेल्याप्रमाणेच शिव-शक्तीचे अर्थ व स्वरूप मानले पाहिजे हे सिद्ध होते. तरी सुद्धा ज्ञानेश्वरांच्या शब्दानेच तो अर्थ अपरिहार्य कसा ठरतो तो पाहू.

शिवशक्तीचे एकात्मक द्वंद्व आहे. एकेकाला अर्थ नाही. अस्तित्व नाही. वेगळे वेगळे केल्यास अर्धे अर्धे होत नाहीत, तर संपूर्ण नाहीसे होतात. अशी जोडी कोणती? वस्तू आणि वस्तुत्व. वस्तू आणि वस्तुत्व हे एकात्मक द्वंद्व आहे हे सांगावयास नकोच. वस्तुत्वाविरहित वस्तू अगर वस्तुविरहित वस्तुत्व यांना अर्थ नाही, अस्तित्व नाही. तसेच वस्तू अर्धी आणि वस्तुत्व अर्धे मिळून एक वस्तू होत नाही. वस्तुत्वाशिवाय वस्तू शून्य आणि वस्तूशिवाय वस्तुत्व शून्य. वस्तूची शक्ती म्हणजेच वस्तुत्व व वस्तुत्वाचा आधार म्हणजे वस्तू. वस्तूही ज्ञानस्वरूप असल्यामुळे तिची शक्ती ज्ञानशक्तीच होय. ज्ञानशक्ती म्हणजे ज्ञेय जाणण्याची तसेच ज्ञेयाकार होण्याची शक्ती. कारण वस्तू एक असल्यामुळे व ती ज्ञानरूप असल्यामुळे ज्ञेय हे ज्ञानांतच असले पाहिजे, म्हणजेच ज्ञानाकार असले पाहिजे. ज्ञान इच्छेनुसार नाना विषयाकार धारण करते आणि त्याच्या संवेदनाने पुनः त्याच्याशी आपले अभिन्नत्व साधते. मला मी पाहावे या पहिल्या संकल्पातूनच विश्वोत्पत्ती होते. ज्या ज्या व्यक्तिगत ज्ञानाने आपले स्वरूप ओळखून इच्छा-तृप्ती करून घेतली ते ते व्यक्तिगत ज्ञान पुनः मूळ स्वरूपाशी एकरूप होऊन

ज्ञातृज्ञेय विहीन । नुसधेंची जे ज्ञान
सुखा भरले गगन । गाळीव जे ।।

व्यक्तिगत अहंलेपाने समावेशपूर्वक आपले अभिन्नत्त्व पुनः साधतात याचा अर्थ व्यक्तिगत चैतन्य मूळ ज्ञानस्वरूपाहून भिन्न झालेले असते असे नव्हे. पाण्यावर तरंग उठला आणि वाटेल तितका पुढे गेला तरी 'नाही भू विभाग । आक्रमिला तेणे ।।' आणि ज्या वेळी तो शांत होतो त्या वेळी तो मूळ स्वरूपाशी एक होतो, त्याचा अर्थ ऊर्मीरहित, क्रियारहित, नितळ आधारभूत असा होतो.

शक्त्युल्लासाव्हया तेचं सृष्टीः स्यादीशकल्पना ।

कल्पत्रयेमतीता चेत्स्वरूपम वशिष्यते ।।

तरंगातील ऊर्मी संपली की तरंग जसा आपले मूळ स्वरूप जे पाणी त्याच्याशी एकात्म होते, तसेच इच्छेने धारण केलेले व्यक्तिरूप आत्मज्ञानाने इच्छातृप्त झाल्यावर पुन्हा आपल्या मूळ स्वरूपाशी एकात्म होतात. भिन्नपणाने भासणारी इच्छा तेवढी तृप्त झाल्यामुळे स्वरूपातच शांत होते.

ज्ञानेश्वर सांगतात, माझा 'मी पणा' टाकून साऱ्या 'मीं'च्या रूपाने नानाकार धारण करणाऱ्या शिवशक्तीशी मी एकरूप झालो म्हणजे आता 'मीं' ज्ञानेश्वर न राहता साऱ्या 'मीं' च्या रूपाने वावरणाऱ्या त्यांचा व्यक्तिगत अहंकार पांघरून चिद्विलासाचा खेळ करणारा शिव झालो. शक्ती झालो.

या निष्कर्षाशी ज्ञानेश्वरांच्या कोणत्याही वचनाचा विरोध येत नाही याबद्दल वाचकांनी स्वतःची खात्री करून घ्यावी. विस्ताराच्या भीतीने येथेच हे परीक्षण थांबविणे भाग आहे.

---


## महाराष्ट्र साहित्य पत्रिका

(तक्ता क्र. ४ नियम ८ प्रमाणे माहितीपत्रक)

| | |
|---|---|
| प्रकार | त्रैमासिक |
| स्वामित्व | महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३० |
| संपादक | श्री. शंकर सारडा<br>पत्ता : महाराष्ट्र साहित्य परिषद<br>टिळक रोड, पुणे-३०. |
| राष्ट्रीयत्व | भारतीय |
| प्रकाशक | श्री. राजा फडणीस<br>पत्ता : महाराष्ट्र साहित्य परिषद<br>टिळक रोड, पुणे-३०. |
| राष्ट्रीयत्व | भारतीय |
| मुद्रक | श्री. राजा फडणीस<br>पत्ता : महाराष्ट्र साहित्य परिषद<br>टिळक रोड, पुणे-३०. |

मी राजा फडणीस असे जाहीर करतो की वर दिलेली माहिती बरोबर आहे.

राजा फडणीस

कार्यवाह महाराष्ट्र साहित्य परिपद


---



अनुक्रमणिका

# शाश्वत साहित्य माला

इंग्रजी साहित्यातील उत्कृष्ट साहित्य निवडून ते 'क्लासिक्स' म्हणून ऑक्सफर्ड, मॅकमिलन सारख्या मान्यवर प्रकाशन संस्थांनी एकसारख्या आकारात व बांधणीत उपलब्ध करून दिलेले आहे. त्याचप्रमाणे 'वर्ल्ड क्लासिक्स' ही प्रकाशित केली गेलेली आहेत. अशा प्रकारचा प्रयत्न मराठीत मात्र आजवर झालेला नाही.

मराठी साहित्याला सुमारे आठशे वर्षांची परंपरा आहे. या काळात मराठीतही उत्कृष्ट साहित्य लिहिले गेले आहे. उत्कृष्ट पुस्तके प्रकाशित झाली आहेत. परंतु त्यांतील आज अनेक उपलब्ध नाहीत. चिं. वि. वैद्य यांची पानिपतच्या पार्श्वभूमीवरील 'दुर्दैवी रंगू' किंवा शि. म. परांजप्यांची 'गोविंदाची गोष्ट' या कादंबऱ्यांची नावे व उल्लेखच फक्त आज वाचनात येतात. परशुरामतात्या गोडबोल्यांनी गेल्या शतकाच्या मध्यावर संकलित केलेले जुन्या काव्यांचे 'नवनीत' आजही साहित्य रसिकांना संग्रही ठेवण्याजोगे वाटेल. धनंजयराव गाडगीळांचे 'हिंदुस्थानचा आर्थिक इतिहास : १८५० ते १९३०' हे पुस्तक आजही उद्बोधक ठरेल. त्याचप्रमाणे गोडसे भटजींचे 'माझा प्रवास', दिवाकरांच्या 'नाट्यछटा' इत्यादी अनेक पुस्तके एका आकारात संचासारखी 'शाश्वत साहित्यमाले'द्वारा उपलब्ध करून द्यावीत असा आमचा विचार आहे. ही निवड करताना कथा, कादंबरी, काव्य, नाटक इत्यादी सर्व साहित्य प्रकार त्याचप्रमाणे महाराष्ट्रातील सर्व क्षेत्रांतील धुरिणांचे वैचारिक लेखन या मालेद्वारा उपलब्ध व्हावे असाही प्रयत्न राहील. थोडक्यात हा संच म्हणजे मराठी संस्कृती व साहित्य यांचा एक प्रातिनिधिक संग्रह ठरावा असा आमचा प्रयत्न राहील.

## प्रकाशन संकल्प

सुरुवातीला तज्ज्ञांकडून निवडून घेतलेली सुमारे २०० पृष्ठांची १०० पुस्तके किंवा एकूण सुमारे २०,००० पृष्ठांचे साहित्य निवडून प्रकाशित करावे अशी योजना आहे. आम्ही प्रकाशित केलेल्या पुस्तकांची किंमत साधारणपणे इतर प्रकाशित पुस्तकांइतकीच राहील. मालेच्या वर्गणीदारांना मात्र ४०% सवलतीने ती मिळतील. शिवाय मालेतील पुस्तके पुठ्ठा बांधणीची (Hard bound) असतील. पोस्टाने पाठविण्याचा वा पुस्तके पोचविण्याचा खर्च अलाहिदा राहील. या योजनेला मिळणाऱ्या प्रतिसादावर २०,००० पृष्ठानंतरही चालू ठेवण्याचा विचार केला जाईल.

## मालेचे वर्गणीदार

फक्त रु. १००/– भरून आपणास या 'शाश्वत साहित्यमाले'चे वर्गणीदार होता येईल. वर्गणीदार होताच आपणास आमच्या प्रकाशनांच्या यादीतील आपल्या निवडीची सुमारे रु. २००/– दर्शनी किमतीची पुस्तके भेट दिली जातील. प्रत्येक वर्गणीदाराला मालेतील प्रत्येक प्रकाशनाची एक प्रत ४०% सवलतीने दिली जाईल. पोस्टाने पाठविण्याचा खर्च वर्गणीदारास सोसावा लागेल.

फक्त रु. २५/– एकदा भरूनही आपण मालेचे वर्गणीदार होऊन मालेतील पुस्तके ४०% सवलतीने मिळवू शकाल. अशा वर्गणीदारांना भेट पुस्तके मिळू शकणार नाहीत.

मालेतील प्रत्येक पुस्तक खरेदी केले पाहिजे असे वर्गणीदारावर बंधन नाही.

सोबत वर्गणीदार अर्जाचा नमुना जोडला आहे.

आपल्या सहकार्याची व प्रतिसादाची आम्ही वाट पाहत आहोत.

*(शुभदा सारस्वत प्रकाशन, ६५ पाटील इस्टेट, पुणे ४११००५)*

## शाश्वत साहित्य मालेतील काही संकल्पित पुस्तके

१. **नवनीत अथवा मराठी कवितांचे वेचे** (प्रकाशित)
संकलक परशुरामपंत गोडबोले,
पृष्ठसंख्या ६१६ डेमी रु. २००-००

२. **डोंगरीच्या तुरुंगातील आमचे १०१ दिवस** (प्रकाशित)
गोपाळ गणेश आगरकर
पृष्ठसंख्या ६४ डेमी रु. २०-००

३. **वाईकर भटजी**
विकार ऑफ वेकफील्डच्या धर्तीवर रचलेली नवी कादंबरी
धनुर्धारी (१८९८)

४. **प. वा. सौ. डॉ. आनंदीबाई जोशी यांचे चरित्र व पत्रे**
सौ. काशिताई कानिटकर (१९१२)

५. **आमच्या आयुष्यातील काही आठवणी**
रमाबाई रानडे (१९१०)

६. **दुर्दैवी रंगू अथवा पानिपतचा शेवटचा संग्राम** (कादंबरी)
चि. वि. वैद्य (१८१४)

७. गोविंदाची गोष्ट (ऐतिहासिक आरमारी कादंबरी)
शि. म. परांजपे (१९१८)

८. थोरले माधवराव पेशवे यांजवर नाटक
उपयुक्त ज्ञानप्रसारक सभेपुढे वाचलेले
विनायक जनार्दन कीर्तने (१८६१)

९. सन १८५७
क्रांतियुद्धावरील ओजस्वी ग्रंथ
ना. के. बेहेरे (१९२७)

१०. हिंदुस्थानचा आर्थिक इतिहास १८५० ते १९३०
घ. रा. गाडगीळ (१९३२)

११. माझ्या आठवणी व अनुभव
भाग १ व २ (१८७३ ते १९१०)
विठ्ठल रामजी शिंदे (भाग १ : १९४० व भाग २ : १९४४)

१२. समाजस्वास्थ्यातील निवडक लेख
र. धों. कर्वे

१३. सह्याद्री
स. आ. जोगळेकर (१९५२)

१४. दिवाकरांच्या नाट्यछटा
शंकर काशिनाथ गर्गे

१५. संगीत म्युनिसिपालिटी
माधवराव जोशी

मालेत समाविष्ट करण्यायोग्य पुस्तकांच्या सूचनांचा आदरपूर्वक विचार केला जाईल. माला यशस्वी करण्यासाठी आपण लवकर सूचना पाठवा.

**शुभदा-सारस्वत प्रकाशन,**

६७ पाटील इस्टेट, मुंबई-पुणे रस्ता,

पुणे ४११००५.

# कथाकथन आणि बालकांचा व्यक्तिमत्त्व-विकास

## पीएच. डी.च्या निमित्ताने केलेल्या प्रयोगांचा आढावा

डॉ. अनिल गोडबोले

आपला मुलगा पूर्णपणे वास्तववादी व्हावा असा एका रशियन महिलेचा हट्ट होता. या वेड्या हट्टापायी तिने मुलाला सर्व प्रकारे गोष्टींपासून दूर ठेवण्याचा प्रयत्न केला. पण परिणाम काय झाला? तिने आपल्या डायरीत लिहून ठेवलेय : "कितीही प्रयत्न केला तरी माझ्या मुलाला या ना त्या स्वरूपात गोष्ट भेटतच राहिली. कधी खेळण्यांशी खेळताना, कधी मित्रांबरोबर गप्पा मारताना आणि बऱ्याच वेळा तर तो स्वतःच्या कल्पनेतून गोष्टी निर्माण करू लागला. अखेरीस मला माघार घ्यावी लागली."

गोष्ट ऐकणे हा बालपणातील फार मोठा सुखद अनुभव. त्याचे मोल लौकिक अशा कोणत्याच परिमाणात होऊ शकणार नाही. मार्टिन ल्युथरचे हे निरीक्षण पहा–

"I Would not, for any quantity of gold, part with the wonderful tales I have retained since childhood."

मुलांना गोष्टी सांगण्याची आवड मला लहानपणापासून आहे. या आवडीला खतपाणी घालून विकसित करण्याचे श्रेय साने गुरुजी कथामालेला आहे. संस्कारासाठी कथा हे ध्येय डोळ्यांसमोर ठेवून गेली अनेक वर्षे मुलांना गोष्टी सांगत आलो. कथाकथन ही नुसती कला नाही. एक शास्त्र आहे. कथाकथनाचा मुलांच्या मनावर काय परिणाम होतो हे संशोधन पद्धतीने शोधून काढता येईल का, असा प्रश्न पडला. संशोधनाची प्रेरणा निर्माण झाली. पीएच. डी. करायचे मी ठरवले. 'कथाकथन : बालकांच्या व्यक्तित्व-विकासाचे एक साधन' हा विषय मी त्यासाठी घेतला.

सांगितलेल्या गोष्टींचा मुलांच्या मनावर काय परिणाम होतो हे शोधून काढण्यासाठी खरे तर मनात डोकावणाऱ्या एखाद्या सूक्ष्मदर्शकाचीच गरज आहे. पण असा सूक्ष्मदर्शक ही आज केवळ कविकल्पनाच म्हणावी लागेल. परंतु मानसशास्त्रज्ञांना माणसाच्या वर्तनाचा अभ्यास करून त्याच्या जाणिवेबरोबरच नेणिवेतील तरल भावविश्वाचा, विचार, भावना, इच्छा, आकांक्षा यांचा शोध घेणे काही प्रमाणात शक्य झाले आहे.

कथाकथनाचा मुलांच्या मनावर काय परिणाम होतो? यापूर्वीच्या सॉयर, ब्रॅन्ट, क्लार्क आणि इतर काही कथानिवेदकांनी या परिणामाचे वर्णन आनंद, निखळ आनंद, निर्भेळ



अनुक्रमणिका






आनंद अशा शब्दांत केले आहे. हा विचारांचा धागा पुढे इतका ताणला गेला की कथाकथनं म्हणजे आनंद आणि फक्त आनंदच, त्याचा उपयुक्ततावादाशी संबंध जोडू नका, असे सांगण्यापर्यंत त्यांची मजल गेली. सॉयर या कथानिवेदिकेने तर सरळ सरळ इशाराच देऊन ठेवला, "To link utiliterian purpose to any art is not only absurd but also sterile."

निरनिराळ्या देशांच्या कथाकथन परंपरेचा इतिहास पाहिला असता वेळोवेळी कथाकथनाचा उपयोग विशिष्ट हेतूसाठी पद्धतशीरपणे केल्याचे आढळते. उदा. धर्मोपदेशकांनी धर्मप्रसारासाठी, वाचनालयांनी गोष्टीच्या पुस्तकाचे बालवाचक निर्माण करण्यासाठी, कामाचे ठिकाणी कामातील कंटाळवाणेपणा घालविण्यासाठी, रणांगणावर सैनिकांमधील पुरुषार्थ जागविण्यासाठी इ.

कथा ऐकत असताना मुलाच्या मनात काय प्रतिसाद उमटतात याबद्दल एमिलीन व जॉर्ज पॅर्ट्रिज या दांपत्याने १९१३ साली मानसशास्त्रीय व सौंदर्यशास्त्रीय विश्लेषण केले. ते आजही मोलाचें ठरेल.

"The tendency in the theory of arts which regards aesthetic pleasure as something quite distinct and different from other mental states seems entirely wrong. The effect of a story or anything else artistic, is very much more complex than to arouse a state of disinterested pleasure.......... The storyteller, when he tells a story to a child is educating deep desires. The child in responding is doing more than expressing pleasure. He is evaluating, choosing, selecting. In every mood, feeling, sentiment, he is carrying on a busy world-building. Out of such play of his feelings will come the connected ideals and valuations of his whole life and those permanent moods and sentiments which are the foundation of character, and give to life its deepest meaning......... Pleasure or entertainment is the test of the effect and not the effect itself. The true effect is something done to deep desires through certain moods established in teller and hearer in which there is a sympathetic exchange of feelings of warmth and beauty."

मुलांच्या विकासाच्या दृष्टीने कथाकथनाची उपयुक्तता व शिक्षणशास्त्रातील कथाकथनाचे महत्त्व यापूर्वीही अनेकांना जाणवले होते. परंतु अभ्यासपूर्ण संशोधनाच्या दृष्टीने हे क्षेत्र दुर्लक्षित राहिले. त्यामुळे या क्षेत्रातील पूर्वीच्या संशोधन कामाचा फायदा मिळण्याची शक्यता नव्हती. कथाकथनाचा परिणाम मोजणाऱ्या सुयोग्य अशा

मानसशास्त्रीय कसोट्याही तयार झालेल्या नाहीत. उपलब्ध कसोट्या या संशोधनात जशाच्या तशा वापरता येण्यासारख्या नव्हत्या. त्यासाठी स्वतःच नवीन कसोट्या तयार करणे आवश्यक होते.

ही सारी पार्श्वभूमी लक्षात घेऊन, मोठे संशोधनप्रकल्प हाती घेण्यापूर्वी छोट्या प्रमाणावर काही संशोधन करणे आवश्यक होते. कुमारांसाठी कथाकथन प्रकल्प व गोष्टी सांगणाऱ्या शिक्षकांचे सर्वेक्षण यांची गरज होती.

कथाकथन प्रकल्पासाठी पुण्यातील शनिवार पेठेतील नऊ ते बारा वयोगटातील (चवथी ते सातवी) सात मुले व आठ मुली निवडण्यात आल्या. मुलाखतींद्वारे या मुलांचे प्रश्न, स्वभाव-विशेष, आवडी-निवडी, अभ्यासातील प्रगती, अभ्यासेतर छंद इत्यादी गोष्टींचा अभ्यास करण्यात आला. ही सर्वच मुले सामान्यतः निकोप असल्यामुळे त्यांच्याबाबत वर्तनविषयक कोणतेही गंभीर प्रश्न आढळले नाहीत. (पण पाल्यांच्याबाबत पालकांच्या काही किरकोळ तक्रारी होत्या.) हे लक्षात घेऊन मुलांसाठी गोष्टीचा कार्यक्रम आखण्यात आला. रोज सायंकाळी एक तास याप्रमाणे आठ दिवस कथाकथनाची आठ सत्रे घेण्यात आली. प्रकल्पासाठी निवडलेल्या कथा :

आग्ऱ्याहून सुटका, काबुलीवाला, तीन प्रश्न, श्यामची आई, स्वामी विवेकानंद, थॉमस एडीसन, दामू धोत्रे, झाशीवाली, लोकमान्य टिळक व महात्मा गांधी यांच्या जीवनातील काही प्रसंग,

कथाकथनातून प्राधान्यक्रमाने आलेली मूल्ये : जिद्द, चिकाटी, स्वाभिमान, जिज्ञासा, प्रसंगावधान, देशप्रेम, पराक्रम, त्याग, चातुर्य, दूरदृष्टी इ.

ऐकलेल्या गोष्टींचा मुलांच्या मनावर परिणाम होण्यासाठी त्या मुलांना आवडणे व समजणे अशा दोन्ही बाबी महत्त्वाच्या आहेत.

मुलांना गोष्ट आवडते की नाही हे त्यांच्या प्रतिसादावरून व चेहऱ्यावरून समजू शकते. पण एक त्रयस्थ म्हणून मुलांच्या प्रतिसादाची नोंद ठेवणे अधिक वस्तुनिष्ठ ठरेल असे वाटल्यावरून मुलांच्या पालकांना निरीक्षणासाठी काही मुद्दे दिले होते. या संदर्भातले पालकांचे अभिप्राय पुढीलप्रमाणे :

१) पंधरापैकी चवदा मुले पालकांनी आठवण न करता आपणहून वेळेवर कार्यक्रमाला येत होती. २) बागेत जाऊ, सिनेमाला जाऊ अशी आमिषे पालकांनी दाखवली तरीही मुलांनी कथाकथनाचे कार्यक्रम चुकवले नाहीत. ३) घरी आल्यावर मुलांचे चेहरे आनंदी दिसत होते व कार्यक्रम आवडल्याचा उत्स्फूर्त अभिप्राय मुलांकडून मिळाला अशी नोंद सर्वच पालकांच्या निरीक्षणात आढळली. ४) पंधरापैकी चवदा मुलांनी प्रकल्पात ऐकलेली गोष्ट आपणहून घरी पालकांना व भोवतालच्या मित्रांना सांगितली. एकूण गोष्टीच्या कार्यक्रमात मुले उत्स्फूर्तपणे समरस झाली असे म्हणता येईल.

कथाकथनात आलेली मूल्ये मुलांना कितपत समजली हे तपासून पाहण्यासाठी मुलांना

गोष्टींवरील दहा प्रश्न देण्यात आले होते. त्या प्रश्नांना मुलांनी दिलेली उत्तरे मोठी मार्मिक होती. काही नमुना प्रश्न व उत्तरे :

प्रश्न १ : पत्रावळीच्या प्रसंगातून श्यामच्या आईने त्याला कोणता धडा शिकवला?

उत्तर : १. नेहमी एखादी गोष्ट करण्याचा प्रयत्न करावा. प्रयत्न न करता एखादी गोष्ट जमत नाही, असे म्हणू नये.

२. आपण जी गोष्ट मनात आणू ती करता येईल. इच्छा मात्र असायला हवी.

३. हट्ट करून काही साधत नाही.

प्रश्न २ : इंग्रजांनी देऊ केलेले पेन्शन झाशीच्या राणीने का नाकारले?

उत्तरे : १. राणी स्वाभिमानी होती. शत्रूने दिलेल्या पैशावर जगणारी स्त्री नव्हती.

२. राणीला स्वतःचे राज्य हवे होते, इंग्रजांनी देऊ केलेले पेन्शन नको होते.

३. इंग्रजांनी राणीचे सर्व हक्क काढून घेतले. तो तिला अपमान वाटला.

वरील नमुना उदाहरणांवरून गोष्ट सांगण्यामागचा जो हेतू होता तो मुलांपर्यंत पोचला हे स्पष्ट होते.

याशिवाय प्रकल्पाबाबत पालकांनी व्यक्त केलेले आणखी काही अभिप्राय :

माझा मुलगा प्रकल्पात ऐकलेली गोष्ट सांगत असताना त्यातील नुसते घटना व प्रसंग न सांगता काही विचारच व्यक्त करतो असे वाटले.

गोष्टी ऐकून आपण काही तरी करून दाखवले पाहिजे अशी महत्त्वाकांक्षा मुलांच्या मनात निर्माण होईल असे वाटते.

प्रयत्नाशिवाय कोणतीही गोष्ट साध्य होत नाही याचे महत्त्व माझ्या मुलीने गोष्टींमधून चांगल्या प्रकारे समजून घेतले आहे असे वाटते.

## शिक्षकांचे सर्वेक्षण

दिवसेंदिवस घराघरातून चालणारे कथाकथन लोप पावत चालले आहे. अशा परिस्थितीत शाळा-शाळांमधून कथाकथनाबाबत काय अवस्था आहे हे जाणून घेण्यासाठी शाळांमधील गोष्ट सांगणाऱ्या शिक्षकांचे 'शिक्षक आणि कथाकथन' या प्रश्नमालिकेद्वारे सर्वेक्षण करण्यात आले. या सर्वेक्षणात पुणे शहरातील खाजगी व पालिकेच्या तसेच पुणे जिल्ह्याच्या ग्रामीण भागातील पूर्व-प्राथमिक, प्राथमिक व माध्यमिक अशा एकशेतीस स्त्री-पुरुष शिक्षकांचा सहभाग होता. प्रश्नमालिकेत एकूण पंचवीस प्रश्न होते. या सर्वेक्षणातील अनेक निष्कर्ष आवर्जून उल्लेख करावा असे आहेत. त्यांपैकी काही : १) ८५ टक्के शिक्षक शाळेतील कथाकथनात उत्साहाने सहभागी होतात व गोष्ट सांगण्याची पूर्वतयारी करतात. २) कथाकथनात पूर्वप्राथमिक व प्राथमिक शिक्षकांचा सहभाग विशेष उत्साहवर्धक वाटला. ३) कथांच्या निवडीमध्ये नीती, प्राणी, सृष्टी, पौराणिक, ऐतिहासिक, चरित्र, साहस, युद्ध, सामाजिक, लोक व विज्ञान कथा अशी खूपच

विविधता आढळली. कथेच्या निवडीमध्ये निव्वळ मनोरंजनापेक्षा संस्कारक्षमतेकडे अधिक कल असल्याचे जाणवले. अगदी पूर्वप्राथमिक व प्राथमिक शिक्षकांनी सुद्धा परिकथांचा फारसा उल्लेख केला नाही. ४) कथाकथनाबाबतच्या मुलांच्या प्रतिक्रियांवरून परिणामकारक कथाकथन कसे असते याचा शिक्षकांना प्रत्यय आल्याचे जाणवते. ५) कथाकथनातून मुलांच्या मनावर संस्कार होऊ शकतील का? या प्रश्नावर ९४ टक्के शिक्षकांनी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे 'हे शक्य आहे' असेच सूचित केले आहे. त्याबद्दलचे अनुभवही या प्रश्नाच्या उत्तरांतून आढळले. ६) कथाकथन मुलांना किती विविध प्रकारे उपयोगी पडू शकेल याची एक यादीच शिक्षकांनी दिली आहे. त्यांपैकी काही : १) जीवनमूल्ये व संस्कार मनावर ठसविणे, २) चांगल्या सवयी लावणे, ३) कल्पनाशक्तीचा विकास, ४) स्मरणशक्तीचा विकास, ५) भाषाविकास, ६) जिज्ञासा प्रवृत्ती वाढीस लावणे, ७) अनुभवाच्या कक्षा रुंदावणे, ८) वर्तनविषयक समस्यांचे निराकरण करण्यासाठी, ९) दर्जेदार मनोरंजन, १०) वाचनाची आवड लावणे ११) मुलांशी जवळीक साधणे, इत्यादी.

छोट्या प्रमाणावर केलेल्या संशोधन कामातून कोणत्या प्रकारचे मोठे प्रकल्प हाती घेता येतील, तसेच कथाकथनाचा मुलांच्या मनावर काय परिणाम होतो हे पाहण्यासाठी मानसशास्त्रीय कसोट्या कोणत्या वापरता येतील याची दिशा सूचित झाली. त्याआधारे समस्याप्रधान मुलांसाठी एक व सर्वसामान्य मुलांसाठी एक अशा दोन मोठ्या संशोधन प्रकल्पांची आखणी करण्यात आली.

### बालगुन्हेगारी आणि कथाकथन

मुले म्हणजे देवाघरची फुले, मुले ही जन्मतः निष्पाप असतात असे आपण अनेक वेळा ऐकतो. पण दिवसेंदिवस वाढत चाललेल्या बालगुन्हेगारीचे नमुने बघितले म्हणजे या निष्पाप कळ्यांना कीड लागलेली दिसते. खरे तर या मुलांच्या माथी गुन्हेगार म्हणून शिक्का मारण्यात आपण फार मोठी चूक करतो. या मुलांच्या वर्तनात जर गुन्हेगारीची बीजे आढळत असतील तर त्याला स्वतः त्या मुलांपेक्षाही त्यांच्या घरचे दूषित वातावरण, कुसंगती, परिसर, शिकण्याबाबत नावड अशी अनेक कारणे सांगता येतील. या मुलांना सुयोग्य असे वातावरण मिळाल्यास ती सुधारू शकतात. या मुलांच्या वर्तनसमस्यांबाबत कथाकथन उपयुक्त ठरू शकेल असे वाटल्यावरून पहिला प्रकल्प हा बालगुन्हेगारांसाठी आखला.

पुण्याजवळील एका बालसुधार-गृहातील पन्नास मुले कथाकथन प्रकल्पासाठी निवडण्यात आली. या मुलांच्या वर्तनसमस्यांचा अभ्यास त्यांच्या केस फाइल्स, तसेच केसवर्कर्स, शिक्षक, पालक व प्रत्यक्ष प्रकल्पातील विद्यार्थी यांच्या मुलाखतीद्वारे करण्यात आला. या मुलांच्या वर्तनात सर्वसामान्यपणे पुढील समस्या आढळल्या : चोरी व

उचलेगिरी, पाकिटमार, मारामारी, बेशिस्त वर्तन, उर्मटपण, कामचुकारपणा, सिनेमांच्या तिकिटांचा काळाबाजार, आळशीपणा, आत्मविश्वासाचा अभाव, शिकण्याबाबत निरुत्साह इत्यादी. पण या सर्व समस्यांमागे एकच एक मूलभूत कारण होते. या मुलांचे जीवन दिशाहीन आणि भरकटलेले आहे, त्यांच्या जीवनात एक पोकळी निर्माण झाली आहे व एक प्रकारचे अस्वस्थ, असुरक्षित जीवन ही मुले जगत आहेत.

या मुलांना सांगता येण्याजोग्या गोष्टी आयत्या उपलब्ध नव्हत्या. जुन्यापैकी कांही गोष्टीत फेरफार करून; त्यात नवीन भर घालून त्या पुन्हा लिहून काढल्या. काही गोष्टी तर नव्याने रचाव्या लागल्या.

या मुलांना नऊ महिन्यांच्या कालावधीसाठी कथाकथन कार्यक्रमात गुंतवून ठेवणे हे अतिशय कठीण काम. टी. व्ही.वरील हिंदी चित्रपट आणि छायागीत असलेल्या सवंग कार्यक्रमांना चटावलेली ही मुले. त्यांना यापूर्वी गोष्ट ऐकण्याची सवयही नव्हती.

२६ जानेवारी हा प्रकल्पाच्या उद्‌घाटनाचा दिवस. प्रत्यक्ष संस्थेचे सुपरिंटेंडेंट उद्‌घाटनासाठी आले. केस-वर्कर्सनी प्रत्येक खोलीवर जाऊन प्रयोगातील मुलांना कथाकथन कार्यक्रमाचा निरोप दिला. इतका आटापिटा करूनही पन्नासपैकी फक्त दहा मुले पहिल्या कार्यक्रमाला आली. समयोचित अशी भगतसिंग या क्रांतिकारकाची गोष्ट सांगायला सुरुवात केली. पण मुलांच्या चेहऱ्यावर असे भाव की आता लवकर आटपा, आमचा खेळाचा वेळ वाया चाललाय. मी अक्षरशः कशीबशी गोष्ट पूर्ण केली कारण अशा निरुत्साही वातावरणात भगतसिंग कसा रंगावा? या पहिल्याच कार्यक्रमाने मनामध्ये अनेक प्रश्न निर्माण केले. सर्वात प्राथमिक गरज होती ती या मुलांना कथाकथन कार्यक्रमात गुंतवून ठेवण्याची. मग माझ्या मूळच्या कार्यक्रमात बदल करून बिरबल-बादशहा, तेनालीराम अशा करमणूकप्रधान गोष्टी सुरू केल्या. फरक लगेच जाणवला. उपस्थिती हळू हळू सुधारू लागली. तिसऱ्या ते चवथ्या कार्यक्रमापासून पन्नासपैकी ४० ते ४५ मुले नियमितपणे येऊ लागली. मी हळूहळू कथा बदलल्या. शिवाजी, कृष्ण-सुदामा अशा गोष्टींमधून संस्कारक्षमतेचे प्रमाण वाढवत नेले. ते इतके की 'वाहतो ही दुर्वांची जुडी' या नाटकाची कथासुद्धा मुलांना मनापासून आवडली.

गोष्ट ऐकण्याची गोडी निर्माण झाल्यानंतर मात्र ही मुले अक्षरशः गोष्टींच्या आणि गोष्ट सांगणाऱ्याच्या प्रेमात पडली. सुरुवातीला आठवड्यातून एकच कथाकथन कार्यक्रम होता. पण उन्हाळयाच्या सुट्टीनंतर मी अपेक्षा केल्याप्रमाणे कथाकथन कार्यक्रमांची संखया वाढवावी अशी उत्स्फूर्तपणे मागणी आली. त्यानुसार पुढील चार महिने आठवड्यातून दोन कार्यक्रम घेण्यात आले. अशा प्रकारे मुलांच्यात गोष्ट ऐकण्याची आवड निर्माण करण्याची पहिली आघाडी तर सर झाली.

बहुतेक मुलांच्या केस-फाइलसमध्ये मुलांच्या वाईट वर्तणुकीचे कारण वाईट संगत असा निर्देश होता. तोच धागा पकडून चांगली आणि आदर्श मैत्री कशी असू शकते हे

सांगणारी मित्रप्रेम नावाची कथा रचून सांगितली. या गोष्टीतील दोन मित्रांपैकी महेश हा वाईट मित्रांच्या संगतीने वाममार्गाला लागतो. पण सुधीरच्या मैत्रीचा बळकट धागा त्याला जीवनातील अधःपतनापासून वाचवतो. एवढे छोटे कथाबीज, पण गोष्ट दोन भागांत आणि सव्वा ते दीड तासपर्यंत रंगली. गोष्ट ऐकल्यावर एक मुलगा सहजपणे माझ्याकडे येऊन म्हणाला, "सर, ही तर तुम्ही आमचीच गोष्ट सांगितली." दुसरा एक मुलगा म्हणाला, "सर, तुम्ही माझ्या आईला पत्र लिहाल? तिला कळवा की यापुढे मी माझ्या जुन्या मित्रांचे तोंडही पाहणार नाही." मुलांनी विचारलेले प्रश्न बोलके आहेत. त्यातूनच ऐकलेल्या गोष्टींवर ही मुले कसा विचार करत होती आणि त्यांच्या पहिल्या विचारात कसा बदल होत होता हे दिसून आले.

· प्रयोगातला शेवटचा कार्यक्रम. कार्यक्रम संपल्यावर संस्थेचा गार्ड भेटायला आला आणि म्हणाला, "सर, तुमच्या गोष्टी ऐकत असताना मुले कशी रंगून जात हे मी पाहत आलोय. मलाही एखादे गोष्टीचे पुस्तक द्याल का? मला तुमच्यासारखी गोष्ट सांगता येणार नाही. पण मी त्यांना थोडे फार वाचून दाखवीन. या मुलांना चांगले वळण लागायला हवे."

वर दिलेल्या निरीक्षणांच्या आधारे कथाकथन कार्यक्रमातून काय साधले याचा थोडा-फार अंदाज येऊ शकतो. पण संशोधन काळात झालेला बदल हा मानसशास्त्रीय कसोट्यांच्या आधारे सिद्ध होणे हे महत्त्वाचे होते.

प्रयोगातील मुलांना मी स्वतः तयार केलेली ७५ वाक्यांची 'ॲडजेस्टमेंट अँड पर्सनॅलिटी इन्व्हेन्ट्री' ही मानसशास्त्रीय चाचणी प्रयोगापूर्वी आणि प्रयोगानंतर देण्यात आली.

सुरुवातीला प्रयोगासाठी ५० मुले निवडण्यात आली. पण बालसुधारगृहातील मुले सतत बदलत राहतात. काही मुलांची बदली झाली, काहींची मुदतपूर्व सुटका झाली, काही पळून गेली तर काही मुले जी रजेवर गेली ती प्रयोगाच्या कालावधीत परत आलीच नाहीत. प्रयोगाच्या अखेरीस जास्तीत जास्त कथाकथन कार्यक्रमांना व पूर्वचाचणी आणि उत्तरचाचणी यांना उपस्थित असणारी फक्त तेवीस मुलेच हाताशी लागली. त्यामुळे प्रयोगाचे मूल्यमापन करताना या तेवीस मुलांचाच विचार करण्यात आला आहे.

आकडेवारीच जर द्यायची झाली तर मानसशास्त्रीय कसोटीवर प्रयोगातील मुलांची प्रयोगपूर्व चाचणीच्या वेळची सरासरी ६१.८७ टक्के होती. ती प्रयोगोत्तर चाचणीच्या वेळी ७२.३९ टक्के झाली. संख्याशास्त्रीय परिमाणांच्या आधारे ही वाढ लक्षणीय आहे.

तेवीसपैकी फक्त एका मुलाच्या बाबतीत पूर्व-चाचणी व उत्तर-चाचणी यांच्या सरासरीत कोणताच फरक आढळला नाही. उरलेल्या २२ मुलांच्या सरासरीत १ ते २६ टक्क्यांपर्यंत वाढ आढळली.

या प्रयोगातील सर्वांत महत्त्वाचा निष्कर्ष म्हणजे गोष्टी ऐकून मुलांचे घराशी असणारे समायोजन, शाळेशी असणारे समायोजन, मानसिक आरोग्य व सर्वसामान्य वर्तणूक यात



अनुक्रमणिका

संख्याशास्त्रीयदृष्ट्या लक्षणीय सुधारणा आढळली.

समस्याप्रधान मुलांचा प्रश्न, गुन्हेगार मुलांचा प्रश्न याचे गांभीर्य सर्वांनाच समजते. पण एकूण समाजात अशा मुलांचे प्रमाण नगण्य आहे. समाजातील बहुसंख्य मुले ही सर्वसामान्य असणार. या मुलांच्या जीवनातही कथाकथन काही विधायक भूमिका बजावू शकेल असे वाटल्यावरून दुसरा मोठा प्रकल्प इयत्ता सातवीमधील सर्वसामान्य मुलांच्यावर करण्यात आला.

प्रयोगासाठी पुणे शहरातील खाजगी शाळेतील सातवीचा एक गट व म्युनिसिपल शाळेतील सातवीचा एक गट असे दोन प्रयोग गट व त्याच पद्धतीचे दोन प्रयोगबाह्य गट निवडण्यात आले. (एकूण चार गट.) प्रयोग सुरू करण्यापूर्वी या सर्व मुलांना 'रेव्हन्स स्टॅन्डर्ड प्रोग्रेसिव्ह मॅट्रीसेस' या नावाची प्रमाणित बुद्धिमत्ता चाचणी देण्यात आली. या चाचणीवरील मुलांच्या कामगिरीचा अभ्यास करण्यात आला. त्यावरून या चारही गटांत बुद्धिमत्तेच्या बाबत फार मोठा फरक आढळला नाही. तुलना करण्यापूर्वी सर्वच गट बुद्धिमत्तेच्या बाबतीत जवळजवळ एकाच पातळीवर असणे याला फार मोठे महत्त्व आहे. त्याशिवाय म्युनिसिपल शाळेतील मुले ही खाजगी शाळेतील मुलांच्या तुलनेने बुद्धिमत्तेत कुठे तरी कमी पडतात असा जो सार्वत्रिक अपसमज आहे, त्याला या चाचणीवरील निष्कर्षांनी धक्का दिला आहे. बुद्धिमत्तेच्या बाबत फार मोठा फरक नसला तरीही सांस्कृतिक, आर्थिक, शैक्षणिक आणि सामाजिक अशी पार्श्वभूमी लक्षात घेतली तर म्युनिसिपल शाळेतील मुले ही खाजगी शाळेतील मुलांच्या तुलनेने निश्चितपणे वंचित व मागे आहेत, असे जाणवले. हा मूलभूत फरक असला तरीही खाजगी व म्युनिसिपल शाळेतील अशा दोन्ही मुलांना एकच कथाकथन कार्यक्रम देण्यात आला.

प्रयोगापूर्वी व प्रयोगानंतर सर्व गटांतील मुलांना पुढील मानसशास्त्रीय कसोट्या देण्यात आल्या :

१) भाषा-विकास चाचणी
२) श्रवण आकलन चाचणी
३) वाचन आकलन चाचणी
४) पलसाने यांची अभ्यासविषयक सवयींबाबतची चाचणी
५) बर्नरुटर यांची व्यक्तिमत्त्व-शोधिका
६) वाक्यपूर्ती चाचणी

नऊ महिने चाललेल्या या प्रयोगात पस्तीस मिनिटांचे एक याप्रमाणे आणि आठवड्यातून एकदा याप्रमाणे एकूण २९ कथाकथन सत्रे घेण्यात आली. प्रयोगातील मुले ही सर्वसामान्य असल्यामुळे कथेच्या निवडीला खूपच वाव होता. आधीच्या प्रकल्पांमधील काही कथा या प्रकल्पात वापरल्या. त्याचबरोबर युद्धकथा व विज्ञानकथा यांचाही समावेश करण्यात आला.

कथाकथनाला मुलांकडून मिळालेल्या प्रतिसादाचा विचार करता म्युनिसिपल शाळेतील मुले ही गोष्ट ऐकण्यासाठी अक्षरशः भुकेजलेली होती. गोष्टीतला शब्दन् शब्द ती जिवाचा कान करून ऐकत होती, गोष्टींवरील प्रश्नांची उत्तरे देण्यात त्यांचा उत्साह विशेष होता, आणि विशेष म्हणजे या सर्वच मुलांनी गोष्टी ऐकल्यानंतर वहीमध्ये त्यातील महत्त्वाचे मुद्दे लिहून काढले. वरील सर्वच बाबतीत खाजगी शाळेतील मुलांचा कथाकथनातील सहभाग हा कमी उत्साहवर्धक वाटला.

निरनिराळ्या चाचण्यांवरील प्रयोगपूर्व आणि प्रयोगोत्तर कामगिरीचे विश्लेषण करण्यात आले. हे करताना संख्याशास्त्रीय परिमाणांचाही उपयोग करण्यात आला. प्रयोगातील प्रमुख निष्कर्ष पुढीलप्रमाणे :

१) भाषा-विकास व वाचन आकलन अशा दोन्ही बाबतींत दोन्ही प्रयोग गटातील मुलांच्यात लक्षणीय सुधारणा आढळली. अशी सुधारणा प्रयोगबाह्य गटातील मुलांच्यात आढळली नाही.

२) श्रवण-आकलन व अभ्यासविषयक सवयींबाबत फक्त म्युनिसिपल शाळेतील प्रयोग गटाबाबत लक्षणीय सुधारणा आढळली. इतर कोणत्याही गटांच्याबाबत तशी ती आढळली नाही.

३) वाक्यपूर्ती चाचणीच्या आधारे दोन्ही प्रयोग गटातील मुलांच्या होकारात्मक विचारसरणीत लक्षणीय सुधारणा आढळली. तशी ती प्रयोगबाह्य गटांबाबत आढळली नाही.

४) निरनिराळ्या चाचण्यांवरील कामगिरीबाबत खाजगी शाळेतील मुले ही म्युनिसिपल शाळेतील मुलांच्या तुलनेने निश्चितच सरस होती. पण सुधारणेचे प्रमाण मात्र म्युनिसिपल शाळेतील मुलांच्या बाबतीत अधिक आढळले.

म्युनिसिपल शाळेतील मुलांच्या अधिक उत्साहवर्धक सहभागाचा तो परिणाम असावा.

"आधुनिक काळात दूरदर्शन, चित्रपट यांसारखी अधिक लोकप्रिय व प्रभावी माध्यमे असताना मुलांना जमवून त्यांना गोष्ट सांगणे या परंपरेने चालत आलेल्या कला प्रकाराची आवश्यकता आहे का?" असा प्रश्न अनेक जण विचारतात. आजवरच्या अनुभवावरून व नुकत्याच केलेल्या प्रायोगिक कामाच्या आधारे मी असे म्हणू शकेन की कितीही अत्याधुनिक साधने निर्माण झाली तरीही कथाकथन या परंपरागत कलासाधनाचे महत्त्व किंचितही कमी झालेले नाही, होणारही नाही.

अल्पमोली आणि बहुगुणी अशा कथाकथनाचे मोल मुलांना वाढवताना पालकांच्या दृष्टीने किती आहे हे सांगायला कोणा विद्वानाची गरज नाही. शिक्षक, मग तो कोणत्या का विषयाचा असेना, कधी ना कधी तरी मुले गुरुजी गोष्ट सांगा म्हणून मागे लागणारच. ही जबाबदारी त्यांना टाळता येण्यासारखी नाही. मुलांची मने संस्कारित होण्यासाठी

अनौपचारिक शिक्षण, सहज शिक्षण, अभ्यासेतर उपक्रम या साऱ्याचीच उपयुक्तता वादातीत आहे. या साऱ्याचा विचार करता कथाकथनाला शिक्षणप्रक्रियेत अग्रक्रम द्यावा लागेल.

काही थोड्या प्रयोगांच्या आधारे फार मोठे सर्वसामान्य निष्कर्ष कोणाही संशोधकाला काढता येत नाहीत. अशाच प्रकारचे प्रयोग मोठ्या प्रमाणावर करून आलेले निष्कर्ष पुन्हा पुन्हा तपासून पाहायला, तसेच कथाकथनाच्या आणखी काही नव्या पैलूंचा शोध घ्यायला संशोधकांना पुष्कळच वाव आहे.

(डॉ. अनिल यशवंत गोडबोले, ३७९, शनिवार पेठ, लिमये बिल्डिंग, चौथा मजला, पुणे ४११०३०.)

---

## साभार स्वीकार

### चरित्र

* **नरहर शंभुराव भावे**– वि. प्र. दिवाण, सहित प्राका. १८/७१ यशवंत नगर, गोरेगाव (प.), मुंबई-६२, १-१९८९, पृ. १३९, किंमत-३०/-.

* **कॉम्रेड डांगे**–. रणदिवे बाबूराव, अभिनव प्रका. ५३ गुरू नानक मार्केट, डॉ. आंबेडकर रोड, दादर, मुंबई १४, १-१९८९, किंमत ६०/- पाने-१७०.

* **भक्त पुरंदरदास यांचे चरित्र व दास शतपदी**– ले. दा. गो. संगोराम, प्रका. विजय शर्मा ५८८ शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे-२, २-१९८९, किंमत-४५/-, पाने-१८४.

* **वडीलधारी माणसे**– शांता शेळके, सुरेश एजन्सी, २०५ शुक्रवार पेठ, पुणे-२, १-१९८९, किंमत-६०, पाने-१८४.

* **संपूर्ण स्मृतिचित्रे**– देवदत्त टिळक, पॉप्युलर प्रका. ३५ सी पं. मालवीय मार्ग, ताडदेव, मुंबई ३४, १-१९८९, पाने-८७५.

* **पेशवेकालीन स्त्रिया**– नीलिमा भावे, पॉप्युलर प्रका. ३५ सी पं. मालवीय मार्ग, ताडदेव, मुंबई ३४, १-१९८९, किंमत-५०/-, पाने-८७.

* **संत कवयित्री**– शेवडे इंदूमती, पॉप्युलर प्रका. ३५ सी पं. मालवीय मार्ग, ताडदेव, मुंबई ३४, १-१९८९, किंमत-७५/-, पाने-२४०.

* **शहीद भगतसिंग एक झंझावात**– प्रकाश रेड्डी, लोकवाङ्मय गृह, ८५ सयानी रोड, भुपेश गुप्ता भुवन प्रभादेवी, मुंबई-२५, २-१९९०, किंमत-१०/-, पाने-४६.

* **एलफिन्स्टन**– प्रमोद ओक, राजहंस प्रका. १०२५ सदाशिव पेठ, पुणे-३०, १-१९९०, किंमत-१००/-, पाने-२६४.

अनुक्रमणिका

पुस्तक परिचय

# अस्वस्थ दशकाची डायरी : धर्माधिकारी

## दुखऱ्या भागांना भेट देऊन घेतलेला भारतीयत्वाचा शोध

दुर्गा भागवत

अविनाश धर्माधिकारी यांची ही डायरी ज्या प्रकारच्या अनुभवाने भरली आहे तो अस्वस्थपणाचा नवा उन्मेष असून हा गेल्या दशकातच मराठी लेखनात प्रगटला आहे. या प्रकारचे लेखन दत्तप्रसाद दाभोळकरांनी याआधी केले. धर्माधिकारींच्या या लेखनाने त्या दशकाचे अंतरंग स्वतःच्या रंगढंगाने आणखी स्पष्ट केले आहे. 'आजचा चार्वाक' या दिवाळी अंकात (१९८९) शेख नावाच्या कार्यकर्त्याने बिहारमधल्या नक्षलवाद्यांची ओळख करून दिली आहे. तिचाही बाज असाच आहे. सामान्यतः आजच्या तरुण पिढीतला कार्यप्रवण तरुण आपले सच्चे अनुभव आडपडदा न ठेवता, आतल्या उमाळ्याने लिहीत असतो. त्या लेखनाची वाट वर्तमानातली असली तरी मागचा संदर्भ अतूट असतो आणि भविष्याबद्दल हुरहुर, आशा आणि व्यथा देखील असते. गेल्या दशकातले हे वास्तवावर आधारलेले लेखन बोलघेवडे नाही. स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाची जाण ठेवून केलेल्या सामाजिक, राजकीय आणि प्रांतिक घटना यांचा जटिलपणा व गुंतागुंत इथे जिज्ञासू वृत्ताने हेरली जाते, पारखली जाते. आणि मग या सामाजिक वटितांच्या मागे उभा असलेला राष्ट्रव्यापी परिसर ही गेल्या दशकात उमलू पाहणारी मने आत्मसात करू पाहतात.

साहित्यात आलेली ही नवी लाट मला फार आवडते. ते लेखन सुरस असते. नेमके असते. धर्माधिकारी यांनी केवळ साहित्यिक व्हायच्या हौसेने केलेले हे लेखन नाही. तरी देखील याची गणना उत्तम ललित लेखनात करता येईल. या लेखनाची प्रेरणा राष्ट्रप्रेम ही आहे. त्या प्रेरणेचे सूत्र राष्ट्रीय एकता हे आहे. त्याची भूमिका ही जिज्ञासू आणि कळकळीच्या कार्यकर्त्याची आहे. पायाखालची भूमी ज्ञानप्रबोधिनीने तयार केलेली आहे. वियाणे या नर्सरीत तयार झालेले आहे. मात्र रोप किंवा गवतही म्हणा हवे तर, भारतभर वाढले आहे किंवा अखंड देशाच्या एका भागात ही भारतीयत्वाची जाण ठेवून वाढले तरच त्या अस्तित्वाला किंमत आहे. हेच आवाहन आहे. आव्हानही आहे. धर्माधिकारी ते सुजाणपणे स्वीकारतात.

आता प्रास्ताविकाकडे म्हणजे 'डायरी उघडण्यापूर्वी'-या प्रकरणाकडे वळते.

देश म्हणजे अखंड भारत; म्हणजे फाळणीनंतरचा 'अखंड' भारत. विवेकानंदांकडून घेतलेली राष्ट्रप्रेमाची स्फूर्ती त्यापूर्वीच्या खऱ्याच अखंड भारतातून सतत प्रवाहित



अनुक्रमणिका

झालेली. घरातले व बाहेरचे संस्कार मिसळून गेल्यामुळे या राष्ट्राची सेवा आपण केली पाहिजे हे ब्रीद किंवा वेड डोक्यात घेतलेला अविनाश धर्माधिकारी नावाचा पुण्याचा कुणी एक मुलगा छांदिष्टपणे आपली कर्मभूमी तयार करण्यासाठी शालेय जीवनापासून धडपडत होता. अखंड राष्ट्रवादाचा जीवनाचा केंद्रबिंदू म्हणून स्वीकार केलेल्या जिज्ञासू आणि कष्टाळू मध्यमवर्गीय तरुणांचेच एक प्रतीक होता. पण हा तरुण एका विशिष्ट कालखंडात जन्मलेल्या व वाढलेल्या पिढीचा प्रतिनिधी होता. स्वातंत्र्योत्तर काळातल्या देशाच्या फाळणीचे विदारक परिणाम झाले. त्यात गांधींचा बळी गेला होता. महाराष्ट्रातल्या एका तरुणाने गांधींना फाळणीच्या बाबतीत एक प्रमुख गुन्हेगार म्हणून गोळ्या घालून जगातून नाहीसे केले होते. अनेक राष्ट्रभक्तांनी त्या हत्याऱ्याला वीरपुरुष मानून गांधींना खलनायक मानले होते. याच विशिष्ट गटाच्या गांधींबद्दलच्या तिरस्काराचा परिणाम अविनाश धर्माधिकारी या विद्यार्थ्यावरही झाला होता आणि एका दशकात देशभरात जनतेबद्दल सहानुभूती आणि सामाजिक अन्यायाचा प्रत्यक्ष अनुभव घेत धर्म, जात-पात, गरीबी-श्रीमंती, राजकीय पक्षभेद यांची पुटे बाजूला सारीत हा तरुण देशभर भटकला आणि त्यातून राष्ट्रीय एकात्मतेचे सूत्र हुडकीत राहिला. आणि नवल म्हणजे या एकात्मतेचे सूत्रधार खुद्द महात्मा गांधीच आहेत हे त्याला उमगले. आसामचे अवलोकन करताना गांधी फाळणीच्या विरुद्ध असून आसामची फाळणी त्यांनीच टाळली हे आपल्या निदर्शनाला आलेले सत्य त्याने बेधडक सांगून टाकले आहे. कारण गांधींनीच या देशाचा 'शेवटचा माणूस' पाहायला लोकांना शिकवले, याचा साक्षात्कार या तरुणाला झाला.

इथे मला कॉम्रेड डांगे यांचे उदाहरण आठवते. 'कॉम्रेड डांगे' या पुस्तकाचे लेखक बाबूराव रणदिवे यांनी 'गांधी विरुद्ध लेनिन' हे पुस्तक लिहून १९२२ साली गांधींवर टीकेची झोड उठविली होती हे सांगितले आहेच. पण १९७४ साली त्याच डांग्यांनी महात्मा गांधींना स्वातंत्र्याच्या लढ्यातला अग्रणी आणि राष्ट्राचे परमभूषण मानले. हेही सोदाहरण दाखवले आहे. जर डांगे यांच्यात असा फरक होतो तर अविनाश धर्माधिकारी या तरुणाची गांधींवर अविचल श्रद्धा बसावी यात नवल ते काय?

गांधींचा प्रभाव मरणोत्तर देखील जगाच्या श्रेष्ठ विचारवंतांवर का व कसा पडला याचे प्रत्ययकारक वर्णन लेखकाने केले आहे. हे प्रकरण वारंवार वाचावे असे आहे. कारण यात पुढील दशकाच्या वाटचालीचे फलित लेखक आपल्याला सांगतो.

"आपल्याला वाटायला लागतं, आपला मार्ग हाच काय तो एकमेवाद्वितीय व सत्य; मग इतरांबद्दल तुच्छता, आपले आग्रह आणि दुराग्रह, आत्मविश्वास आणि अहंकार यातल्या सीमारेषा फार पुसट आहेत; पण प्रवासात जेव्हा अनेक वाटसरू भेटतात, या रेषांच्या अलीकडे राहायला मदत होते. तशी झाली म्हणून थोडेफार शिकताही आले. आपल्या मार्गाबद्दलच्या श्रद्धा जास्त डोळस व चिकित्सक बनायला मदत झाली. तात्पुरत्या भावुकतेच्या पाकळ्या गळून वैचारिक जाणिवेची फळं धरण्याची प्रक्रिया

कदाचित त्यातूनच विकसत गेली. आणि प्रश्न विचारणारी बुद्धी भावनांच्या उत्कटतेच्या आड आली नाही. मग प्रवासाला अधिकाधिक अर्थ येत गेला. वेग येत गेला. आपल्या 'यात्रिक'पणाचे भान आले.

हा प्रवास म्हणजे देशभर केलेली भटकंती. या भटकंतीत लागलेला महात्माजींचा शोध ही या प्रवासाची प्रकाशमान किनार होती, ती केवळ किनार राहिली नाही. या प्रवासाने प्रवासाची वाटच उजळून टाकली.

'अग्निहोत्र' याचा लेखकाला अभिप्रेत असलेला अर्थ असा : कुणा एका सत्पुरुषाची लोकांनी हत्या केली. त्याचे रक्त लेखकाच्या भाळी पडले. तो पेटून उठला. पण त्याच महात्म्याच्या रक्ताचा दुसरा थेंब काटेरी गुलाबावर पडला नि तिथे दोन कोवळी पाने उमटली. हे एक रूपक आहे. काव्यात्मक गद्यातले रूपक आहे. मथितार्थ असा की लेखक आपल्या आयुष्यात स्वतः जळून (म्हणजेच अग्निहोत्राचे व्रत घेऊन), या जगात उद्याचा सूर्य सुखशांती घेऊन येईल अशा श्रद्धा बाळगतो. सुंदर वाटावा असा हा ललित लेख. पण मला वाटते की इथे तो दिला नसता तरी चालले असते.

आंध्र प्रदेशाला १९७७ साली वादळाचा प्रचंड तडाखा बसला. त्या वेळी धर्माधिकारी आणि ज्ञानप्रबोधिनीचे काही कार्यकर्ते तिथे गेले आणि ठिकठिकाणी प्रेतांचा खच पाहून ते प्रथम भयविस्मित झाले. नंतर प्रत्यक्ष कार्य करताना जणू भावनाशुष्क बनले. कार्यकर्त्यांच्या ध्यासाने समस्यांना तोंड देऊ लागले. अर्थात ही तटस्थता वरवरचीच होती. कारण आतून ते काहीतरी सत्य शोधीत होते. प्रेतांनी भयानक सत्ये त्यांना सांगितली. तशीच माणुसकीची कोवळीक देखील दाखवली. भेसुरातील मानव्य त्यांनी पाहिले. प्रेतांनी विचलित केले नाही इतके विचलित त्यांना सत्यलिंगम् या जिवंत माणसाच्या नागव्या 'सांगाड्या'ने केले. या मोहिमेत भारतभरचे व परदेशातलेही मदतनीस सामील झाले होते. अशा या स्थितीत धर्माधिकारी यांना काही खुपणारी शल्येही दिसली. तिथलेच काही भारतीय परदेशस्थ वार्ताहरांशी किती लाचारीने वागत होते. वस्तू, अन्न-धान्य, कपडे वगैरे घेऊन येणारे ट्रक्स त्या अंतर्भागात पोचतच नसत. तिथेच मागणाऱ्यांना वाटप करून निघून जात. काही जण त्याच वस्तू बाजारात नेऊन विकत. त्या 'व्यापारा' वरही अनेकजण गबरू झाले होते.

सर्वांत मार्मिक तितकेच मर्मभेदी सत्य आंध्रातल्या हरिजनाविषयीचे. ते सांगतात, हरिजनांच्या प्रेतांना मूठ-माती द्यायला कुणी 'हिंदू' तयार नसे. अन्नवस्त्रासाठी हरिजन रस्त्यावरच भीक मागत. हरिजन वस्ती गावाबाहेर. त्यांचीही घरे पडली. बाकीच्यांनी बाहेरच्या लोकांच्या आणि सरकारच्या मदतीने घरे बांधून घेतली. पण आपली मोडकी घरे हरिजनांनीच स्वतः नीट केली. कारण त्यांना पुरते मोहीत होते की, आपली घरे दुरुस्त करून देणारे कुणीच नाही!

धर्माधिकारी तिथून परत येताना फिरत आन्ध्रात जायचे स्वप्न बघतात. पण ते आपले

नेहमीचे स्वप्न नाही. परत जायचे तर तिथल्या "मातीवरचे सावट दूर करण्यासाठी, लोक उंचावण्यासाठी' असे त्यांचे 'पदसिद्ध स्वप्न' आहे." कारण आता ते तिथलेच म्हणजे भारतातल्या मातीचेच झाले आहेत. आन्ध्रात उन्हाने भाजलेली कातडी, रापलेला चेहरा हा आता त्यांचा ढंगच बनून गेला आहे. आपल्या या स्वप्नांना 'गगनभेदी कर्तृत्वाचा अर्थ' यावा असे त्यांना वाटले. कारण या साऱ्याचा अर्थ अग्निहोत्र, म्हणजे त्या परमपुरुषाने स्वतःचीच आहुती देऊन हे विश्व निर्माण केले.

'स्वतःची आहुती स्वतःच' देणे हेच परम जीवन श्रेय आहे, ही जाणीव ही त्यांची मोठी कमाई आहे.

भिरीभिरी भ्रमंतीमध्ये स्वतःची मस्ती भागवण्यासाठी निघालेला धर्माधिकारी हा पोरगेला सायकलस्वार ठरवतो की, पुणे ते पुणे अशी सहल एकट्याने करायची. पुणे ते खंडाळा घाटातून पनवेल, मग गोवा, मुंबईमार्गे पेणवरून महाडहून वरंधा घाटातून, कात्रज घाट उतरून परत पुणे. अनेक भयभीतीच्या उर्मींना मागे सारून १४ तासांत तो २०५ किलोमीटर्स अंतर सायकलीने आणि सायकल काम देईना म्हणून पायपीट करीत कापतो. कारण 'जो स्वतःशीच स्पर्धा करतो त्याला कोण जिंकणार?' सह्याद्रीतली ही सहल म्हणजे काय प्रकार आहे ते कळायला मात्र तत्सम अनुभव घ्यावा लागतो. असे अनुभव पुसटसे माझ्याही संग्रही भाग्यानेच आहेत. ज्याच्यापाशी रग नाही, मस्ती नाही, तो मोठ्या स्वानंदसुखालाही मुकतो.

क्रायसिस ऑफ आयडेंटिटी– आसाम ईशान्य आणि आपण हे प्रकरण ८३ पानांचे आहे. हा दुसरा महत्त्वाचा टप्पा. दुसरा नव्हे, तर सर्वांत महत्त्वाचा. कारण अजून आसाम भारतात रीतसरपणे सामावलेलाच नाही. याला आमचे राजकारणीच बव्हंशी जबाबदार आहेत. नेहरूंच्या राजवटीत व्हेरियर एलविनच्या हाती नागालँडची नाडीच जणू नेहरूंनी सोपवली. आधीपासूनच ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या आधिपत्याखाली असलेला हा आदिवासी नागांचा प्रांत. ब्रिटिश राजवटीत तो बंदिस्त होता. इतका की 'इंडिया' हा शेजारचा पण परका देश आहे हीच या लोकांची भावना झाली. ती अजून कायम आहे. एल्विनने याच भावनेला खतपाणी घातले.

या प्रकरणाचे दोन विभाग आहेत.

पहिल्या विभागात आसामी विद्यार्थ्यांचे शांततापूर्ण आंदोलन, त्यातले गुण-दोष व्यवस्थित सांगितले आहेत. यात प्रफुल्ल महंत वगैरे तेव्हाच्या विद्यार्थिनेत्यांचे यथातथ्य वर्णन आहे. पण आता १९९० साली तेच प्रफुल्ल महंत मंत्रिपदावर आरूढ झाले आहेत. आसामचे प्रश्न तेच असले तरी महंतांचा मुखवटा बदलल्याची शंका येते.

१९८० सालाचे ज्ञानपीठ पारितोषिक विजेते वीरेन्द्रकुमार भट्टाचार्य यांच्या अनुपम शुद्ध तार्किक व निखालस भावनिक व्यक्तिमत्त्वाचा परिचय आपल्याला होतो. त्यांच्या 'मृत्युंजय' या कादंबरीलाच पारितोषिक मिळाले आहे आणि ती कादंबरी सुभापबाबूंच्या



अनुक्रमणिका

ब्रह्मदेशातील राजकीय हालचालीवर लिहिली आहे.

बंगाली व आसामी यांतली तेढ आणि तेथील मुस्लिम आपल्या अल्पसंख्येच्या बळावर घेत असलेली भूमिका आपल्या ध्यानात येते. दुखणे जुने आहे पण ते भारतभर कसे पसरले आहे त्याचा हा आणखी एक पुरावा!

इंदिरा गांधींनी घूसखोरांच्या बाबतीत असमी जनतेला कसे फसवले आणि त्यांच्या शांततापूर्ण चळवळीची केवळ ती शांततामय असल्यानेच खोटी वृत्ते पसरवून ती हिंसक मार्गावर आणण्याचे सूचक धोरण कसे राबवले हेही आपल्याला कळते. आता दहा वर्षांनीही हिंसक उद्रेक आसामात होत आहेतच.

या भेटीचे सार धर्माधिकारी यांनी काढले आहे ते असे, "आसाम कायमचा बिनभाडे पट्टीने देण्यात यावा असा जणू बांगला देशाशी अनधिकृत करार झालाय. आसामचा 'तीन बिघा' आधीच करून टाकण्यात आला आहे.... बांगला देशाच्या नागरिकांना या विभागांतून मुक्त रहदारीची परवानगी, पासपोर्टची वगैरे आवश्यकता नाही. तर भारतीयांचे सर्व अधिकार दिले जातील (आणि काश्मीरमध्ये भारतीयांना नागरिकत्वाचे हक्क नाकारले जातील). वाटून गेले की आसाममध्ये शांततामय आंदोलनाची सरकारने बूज राखली नाही तर हे आंदोलन हिंसक बनणे अशक्य नाही. आसामला आपल्या कळपात ओढायला नागालँड, मिझोराम, मणिपूर, मेघालयामधील छुपे युद्धखोर टपून बसलेलेच असतील." आता दहा वर्षांनी हे चित्र बघताना त्या युद्धखोरांना अगदीच यश मिळाले नाही असे नाही.

नागालँड, मिझोराम वगैरेंचा दौरा हा दुसऱ्या भागाचा विषय आहे. पण यात एक उणीव आहे. डायरीला आवश्यक ती तारीख व सालाची नोंद नाही. त्यामुळ या दोन भेटीत किती काळ लोटला हे कळत नाही. 'आसु'चे पाहुणे म्हणून ते हिंडत होते तेव्हा काळ फार लोटलेला नसावा.

आसामचा एक सुखद विशेष धर्माधिकारी आपल्याला सांगतात तो असा : १५/१६व्या शतकात संत शंकरानंद यांनी चैतन्य प्रभूंचा वैष्णव धर्म आसाममध्ये पसरवला. या असमिया संताची अमूल्य देणगी म्हणजे आसाममध्ये जातीभेद जवळजवळ नाही. आसामातला रेल्वेच्या डब्यात 'आतले' व 'बाहरेचे' यांचा दैनंदिन अहोरात्र चालणारा संघर्ष आणि प्रत्येक पॅसेंजरकडून 'खंडणी' वसूल करून प्रवासाचा 'परवाना' मिळवणारा प्रवासी यांचे चित्रण आले आहे.

'अग्निकुंड' नामक वृत्तपत्र चालवणाऱ्या करीमगंजच्या हरिपाद देव यांचा परिचय होतो. दारिद्र्याशी सतत टक्कर देऊन बंगाली व असमी यात भेदभाव करू नका म्हणून टाहो फोडून ते लोकांना सांगत आहेत. पण 'माझे ऐकतो कोण. कर्तव्य तेवढे केलेच पाहिजे.' असे तो म्हणतो. महाभारतकार व्यास म्हणाला की मी हात वर करून बोंबलत आहे; पण कुणी माझं ऐकतच नाही. अशी ही एक भारतीय परंपरा!

मराठी माणसाचे कर्तव्यनिष्ठ अस्तित्व भारताच्या सर्व प्रांतांत आढळते, हेही निरीक्षण नोंदवून धर्माधिकारी आपल्याला सुखवतात. १२ वर्षे शिलांगमध्ये विवेकानंद केंद्राचे काम निष्ठेने करणारे ज्ञानेश्वर एकनाथ सातव हे एकनाथजी रानडे यांचे शिष्य. तेव्हा त्यांची निष्ठा सांगायलाच नको.

याच प्रकरणात मते मिळवण्यासाठी आपणही हीन क्लृप्त्या करतो ही एका असमी कार्यकर्त्याची कबुली दिली आहे. फुटीरवाद प्रामुख्याने उद्‌भवतो हे आम्हाला आजचे राजकारण ओरडून सांगते आहे. मात्र ज्याचा-त्याचा फुटीरवाद वेगवेगळी नावे घेऊन येतो एवढेच. आसाममधले प्रश्न भारतातले आहेत नि भारताबाहेरचेही. इथले प्रश्न चीनच्या राजकारणाला भिडले आहेत. सोव्हिएत युनियनच्या राजकारणाला भिडले आहेत. ब्रिटिशांच्या नागालँड, मिझोराम वगैरे इशान्येकडचे सीमेचे प्रदेश पहिल्यापासून हिंदुस्थानापासून तोडून ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या संस्कृतीला अग्रक्रम देण्याच्या राजकारणाला भिडले आहेत. मग बाहेरच्या सीमा, अंतर्गत सीमा, संस्कृती व भाषा यांच्या सीमा, धर्मभेदांच्या सीमा सारे काही आले. ही सारीच प्रश्नचिन्हे बनली आहेत. धर्माधिकारींनी माडीपुरातले एक तळे आहे, तिथेच यक्षाने युधिष्ठिराला प्रश्न विचारले, ही माहिती देऊन म्हणूनच या प्रदेशात सारे प्रश्नच प्रश्न येतात असे म्हटले आहे. प्रश्न आपणच आपल्याला वं लोकांना विचारतो. पण उत्तर देणारा युधिष्ठिर मात्र आता गायब झाला आहे. मणिपुरात 'विदेशी हटाव'ला 'अमणिपुरी हटाव' असा अर्थ आहे हे ऐकून आपण विचलित होत नाही. थोड्याच काळात आपणही मुर्दाड झालो आहोत नि जातवार नि जिल्हावार आपले-तुपले करीत बसलो आहोत.

इंफाळपासून दीड तासाच्या अंतरावर मोइरांग या गावापर्यंत नेताजींची आझाद हिंद सेना पोचली होती. नेताजींनी सिंगापूर जिंकल्यावर हुतात्मा सैनिकांच्या स्मरणार्थ नेताजींनी सिंगापूरमध्ये एक स्तंभ उभारला होता. पुढे ब्रिटिशांनी सिंगापूर जिंकल्यावर लगेच हा स्तंभ उखडून फेकला. धर्माधिकारी म्हणतात, "आम्हाला अजून पंचम जॉर्जचा, तिसऱ्या एडवर्डचा पुतळा दिमाखात असलेला चालतो. आमच्या सहिष्णुतेला एल्फिन्स्टन रोड, औरंगजेब रोड ही नावं बोचत नाहीत. गुलाम भारताचा शेवटचा व्हाइसरॉय माउन्टबॅटन निवर्तला की तिरंगा अर्ध्यावर उतरतो." किती खरे आहे हे. नशीब की अजून मोइरांगमध्ये सुभाषबाबूंच्या दुर्मिळ फोटोंचे संग्रहालय शिल्लक आहे.

नागालँडच्या बाबतीत मुख्य सूत्रधार ख्रिस्ती मिशनरी स्कॉट यानेच फिझोला (व लाल डेंगा याला) हाती धरून स्वतंत्र नागालँडची मागणी केली. हिंदुस्तानशी नागा, मिझो वगैरेंचा संबंध नाही असा प्रचार फणिभूषण दास गुप्तासारखे विख्यात वार्ताहरही करू लागले; आणि अतिरेकी फुटीरपणाची भाषा बोलू लागले. मिशनऱ्यांबद्दल गांधींनी म्हटले होते की, "मला एक दिवसाची सत्ता मिळाली तरी मी या देशातल्या ख्रिस्ती मिशनऱ्यांना देशाबाहेर हाकलून लावीन." हे वचन उद्‌धृत करून धर्माधिकारी आपल्याला पुढे सांगतात

की, फिझोला बंदिवास होऊ नये म्हणून भारताबाहेर लंडनला पळवून नेऊन सुरक्षित ठेवले ते स्कॉटनेच. या बाबतीत माझी जनता सरकार अस्तित्वात असतानाची एक आठवण आहे. लाल डेंगा तेव्हा गाजलाच होता. नानासाहेब गोरे इंग्लंडला भारताचे राजदूत होते. त्याच काळी जनता पार्टीचे महान नेते एस्. एम्. हे आयुष्यात प्रथमच इंग्लंड-यात्रा करून आले. हेतू हा की फिझोची भेट घ्यायची आणि 'समझोता' (?) करायचा. पण झाले नाही काहीच. मी त्या वेळी त्यांच्यावर टीका केली होती. माझ्या मते ही भेट अयोग्य होती. असो. पुढे फिझो नागालँडमध्ये आला. फुटीरवाद मात्र अजून संपलेला नाही.

१९८४मध्ये राजीव गाधींच्या कारकिर्दीत आसाम करार झाला आणि आसुच्या चळवळीला यश आले. शांततेच्या मार्गाने जाऊन यशस्वी झालेली ही एकच चळवळ आहे आणि ती चळवळही विद्यार्थ्यांची!

क्रायसिस ऑफ आयडेंटिटी : अस्मितेचा संघर्ष हे त्या लेखाचे शीर्षक. त्याचा अन्वयार्थ असा की भारतात कुठल्याही प्रांतात राहणाऱ्या माणसाची अस्मिता एकच. भारतीयत्व. भारतात कुठल्याही प्रांताची समस्या ही सगळ्या भारताची समस्या. हीच जाणीव सर्व तऱ्हेच्या संकटांवर, विभाजनांवर नियंत्रण आणू शकेल.

## युवकवर्ष! भारतवर्ष

१९८५ हे युवकवर्ष म्हणून राष्ट्रसंघाने ठरवले आणि भारताचे त्या वर्षाचे अधिष्ठाते स्वामी विवेकानंद होते. विवेकानंद धर्माधिकारींचे आधिदैवत. चिरयौवनाचे व समर्पणाचे प्रतीक म्हणून आनंदित झालेले धर्माधिकारी भारतातल्या ठिकठिकाणच्या युवाशक्तीने केलेल्या कार्याची दखल घेतात. गुजरातची नव-रचना समिती, आसाममध्ये आसु, अखिल भारतीय शीख विद्यार्थी परिषद, रा. स्व. संघ व राष्ट्र सेवा दल, शरद जोशींची ग्रामीण युवकांची संघटना इत्यादी. मुस्लिम सत्यशोधक समाज आणि दलित रंगभूमी यांचाही समावेश ते युवा शक्तीत आवर्जून करतात. रचनात्मक कार्य, परिवर्तन, नव-निर्मिती वगैरेंचे वेड घेतलेली युवक मंडळी हे वर्ष साजरे करण्यात गुंतली होती.

रामकृष्ण मिशनने अखिल भारतीय युवा वर्ष साजरे केले. त्यात त्यांचे संमेलन कलकत्त्यात भरले. तिथे मात्र हे संमेलन १९८२मध्ये न होता, सत्ताधारी मार्क्सवादी पक्षाच्या हस्तक्षेपामुळे १९८५ साली भरले. वास्तविक हे संमेलन रामकृष्ण मिशनने १९८४ सालीच करायचे म्हणजे जागतिक युवक वर्षापूर्वीच करायचे ठरवले. पण पश्चिम बंगालमध्ये सरकार सी.पी.एम.चे म्हणजे कम्युनिस्टांचे होते. त्याचा रामकृष्ण मिशनवर राग होताच. कलकत्त्याजवळ रोहरा या गावी रामकृष्ण मिशनचे मोठे शैक्षणिक कार्य चालते. तिथल्या महाविद्यालयाचे प्राचार्य असलेले स्वामी प्राचार्यपदासाठी लायक नाहीत. महाविद्यालयाच्या प्राचार्यांची नियुक्ती सरकारी पॅनेलद्वारा व्हायला हवी या धोरणाचा आग्रह शासनाने धरला. तेव्हा रामकृष्ण मिशनने हायकोर्टात धाव घेतली आणि घटनेत

अल्पसंख्यांकांना मिळते ते संरक्षण आम्हाला मिळायला हवे असा दावा केला. निकाल मिशनच्या बाजूचा झाला आणि त्यामुळे मिशनच्या संस्था मिशनला बचावता आल्या. यावर स्टेट्स्मनने हे वृत्त देताना असा मथळा दिला की "Ramakrishnism is non-Hindu" इथवर मी धर्माधिकारींचाच मजकूर थोडक्यात दिला आहे. पण स्टेट्स्मनने रामकृष्ण पंथाला अहिंदू म्हटले त्याची पार्श्वभूमी धर्माधिकारी लक्षात घेत नाहीत. आणीबाणीने रामकृष्ण मिशनच्या राष्ट्रीयत्वावर व पर्यायाने हिंदुत्वावर घाड येऊ नये, आपली सरकार-विरोधकांत गणना होऊ नये म्हणून मिशनने स्वतःच आम्ही हिंदू नसून, समाजसेवक आहोत, अशी जबानी देऊन स्वतःची त्या आंदोलनातून मुक्तता करून घेतली होती. विनोबांनी आणीबाणीला अनुशासनपर्व म्हटले. त्याच नाण्याची ही दुसरी बाजू मला वाटत आली आहे. इथेही स्वतःला मायनॉरिटी म्हणूवून घेणे संस्था टिकवण्याच्या दृष्टीने सोयीचे असले तरी ते विवेकानंदांच्या सरणीत बसते, असे मला वाटत नाही.

### लढाई संपली, युद्ध चालूच

'लढाई संपली, युद्ध चालूच' हा मथळा पंजाबच्या समस्येला साजेसाच आहे. १९८४मध्ये पंजाब करार झाला नि एक लढाई जिंकली. पण पंजाबमध्ये अधिकाधिक हिंसाचार होतोच आहे. १९९० चे चार महिने उलटले तरी दररोज हवे तेवढे खून पडल्याचे वृत्तपत्रात छापून येते. निवडणुकीनंतरही पंजाबचे चित्र तसूभर बदललेले नाही. भयभीषणता मात्र झपाट्याने वाढते आहे. भिंद्रनवाले यांची हत्या झाली. त्यांचे आदरपूर्ण आणि करुणाजनक चित्र चार एक वर्षांपूर्वी दत्तप्रसाद दाभोळकर यांनी मराठीत सादर केलेले आठवते. आता धर्माधिकारी यांनी तसेच चित्र संत लोंगोवाल यांचे दिले आहे.

शीख व हिंदू यांच्यातली दरी वाढतेच आहे. खलिस्तानची मागणी फोफावत जाऊन तिला परदेशातून खतपाणी घातले जात आहे. पण शीख-हिंदू समस्या उद्भवली तेव्हा राजकर्त्यांनी उचललेली पावले काही सरळ नव्हती हे ओघाने येतेच. पंजाबचा प्रश्न इंदिराजींनीच दुटप्पी नीतीने गंभीर केला. खलिस्तानची मागणी त्यांच्या मृत्यूपूर्वीही होतीच. पण शिखाने त्यांना मारले म्हणून त्या गेल्या त्या दिवशी शिखांच्या कत्तलीचा जो प्रयोग दिल्लीत पुढे तीन दिवस झाला, त्या वेळी राजीव गांधी व त्यांचे सहकारी स्वस्थ होते. शीख कँपमधल्या लोकांची हालत सुधारण्यासाठी काँग्रेस सरकारने योग्य ती पावले उचलली नाहीत, हे प्रकट सत्य आहे. त्या शिखांच्या भीषण भोगांच्या कथा आम्ही वृत्तपत्रात वाचल्या आहेत. अजूनही अधूनमधून वाचतो. दाभोळकरांनी हे चित्र रंगवले आहे. पण धर्माधिकारी यांच्या मीमांसेत त्याचा मागमूसही आढळत नाही. राजकारण टाळून परिस्थितीचा अभ्यास करण्याचे धोरण तर याच्या आड आले नसेल? त्यांच्या या दौऱ्याचा विशेष असा की प्रबोधिनीतर्फे पन्नास-बावन्न तरुण-तरुणी एकात्मतेचा प्रयत्न करण्यासाठी पंजाबात जाऊन तिथे आपले विधायक कार्य, मुलाखती, भजने, लोकात

की, फिझोला बंदिवास होऊ नये म्हणून भारताबाहेर लंडनला पळवून नेऊन सुरक्षित ठेवले ते स्कॉटनेच. या बाबतीत माझी जनता सरकार अस्तित्वात असतानाची एक आठवण आहे. लाल डेंगा तेव्हा गाजलाच होता. नानासाहेब गोरे इंग्लंडला भारताचे राजदूत होते. त्याच काळी जनता पार्टीचे महान नेते एस्. एम्. हे आयुष्यात प्रथमच इंग्लंड-यात्रा करून आले. हेतू हा की फिझोची भेट घ्यायची आणि 'समझोता' (?) करायचा. पण झाले नाही काहीच. मी त्या वेळी त्यांच्यावर टीका केली होती. माझ्या मते ही भेट अयोग्य होती. असो. पुढे फिझो नागालँडमध्ये आला. फुटीरवाद मात्र अजून संपलेला नाही.

१९८४मध्ये राजीव गांधींच्या कारकिर्दीत आसाम करार झाला आणि आसुच्या चळवळीला यश आले. शांततेच्या मार्गाने जाऊन यशस्वी झालेली ही एकच चळवळ आहे आणि ती चळवळही विद्यार्थ्यांची!

क्रायसिस ऑफ आयडेंटिटी : अस्मितेचा संघर्ष हे त्या लेखाचे शीर्षक. त्याचा अन्वयार्थ असा की भारतात कुठल्याही प्रांतात राहणाऱ्या माणसाची अस्मिता एकच. भारतीयत्व. भारतात कुठल्याही प्रांताची समस्या ही सगळ्या भारताची समस्या. हीच जाणीव सर्व तऱ्हेच्या संकटांवर, विभाजनांवर नियंत्रण आणू शकेल.

## युवकवर्ष! भारतवर्ष

१९८५ हे युवकवर्ष म्हणून राष्ट्रसंघाने ठरवले आणि भारताचे त्या वर्षाचे अधिष्ठाते स्वामी विवेकानंद होते. विवेकानंद धर्माधिकारींचे आधिदैवत. चिरयौवनाचे व समर्पणाचे प्रतीक म्हणून आनंदित झालेले धर्माधिकारी भारतातल्या ठिकठिकाणच्या युवाशक्तीने केलेल्या कार्याची दखल घेतात. गुजरातची नव-रचना समिती, आसाममध्ये आसु, अखिल भारतीय शीख विद्यार्थी परिषद, रा. स्व. संघ व राष्ट्र सेवा दल, शरद जोशींची ग्रामीण युवकांची संघटना इत्यादी. मुस्लिम सत्यशोधक समाज आणि दलित रंगभूमी यांचाही समावेश ते युवा शक्तीत आवर्जून करतात. रचनात्मक कार्य, परिवर्तन, नव-निर्मिती वगैरेंचे वेड घेतलेली युवक मंडळी हे वर्ष साजरे करण्यात गुंतली होती.

रामकृष्ण मिशनने अखिल भारतीय युवा वर्ष साजरे केले. त्यात त्यांचे संमेलन कलकत्त्यात भरले. तिथे मात्र हे संमेलन १९८२मध्ये न होता, सत्ताधारी मार्क्सवादी पक्षाच्या हस्तक्षेपामुळे १९८५ साली भरले. वास्तविक हे संमेलन रामकृष्ण मिशनने १९८४ सालीच करायचे म्हणजे जागतिक युवक वर्षापूर्वीच करायचे ठरवले. पण पश्चिम बंगालमध्ये सरकार सी.पी.एम.चे म्हणजे कम्युनिस्टांचे होते. त्याचा रामकृष्ण मिशनवर राग होताच. कलकत्त्याजवळ रोहरा या गावी रामकृष्ण मिशनचे मोठे शैक्षणिक कार्य चालते. तिथल्या महाविद्यालयाचे प्राचार्य असलेले स्वामी प्राचार्यपदासाठी लायक नाहीत. महाविद्यालयाच्या प्राचार्यांची नियुक्ती सरकारी पॅनेलद्वारा व्हायला हवी या धोरणाचा आग्रह शासनाने धरला. तेव्हा रामकृष्ण मिशनने हायकोर्टात धाव घेतली आणि घटनेत

अल्पसंख्यांकांना मिळते ते संरक्षण आम्हाला मिळायला हवे असा दावा केला. निकाल मिशनच्या बाजूचा झाला आणि त्यामुळे मिशनच्या संस्था मिशनला बचावता आल्या. यावर स्टेट्स्मनने हे वृत्त देताना असा मथळा दिला की "Ramakrishnism is non-Hindu" इथवर मी धर्माधिकारींचाच मजकूर थोडक्यात दिला आहे. पण स्टेट्स्मनने रामकृष्ण पंथाला अहिंदू म्हटले त्याची पार्श्वभूमी धर्माधिकारी लक्षात घेत नाहीत. आणीबाणीने रामकृष्ण मिशनच्या राष्ट्रीयत्वावर व पर्यायाने हिंदुत्वावर घाड येऊ नये, आपली सरकार-विरोधकांत गणना होऊ नये म्हणून मिशनने स्वतःच आम्ही हिंदू नसून, समाजसेवक आहोत, अशी जबानी देऊन स्वतःची त्या आंदोलनातून मुक्तता करून घेतली होती. विनोबांनी आणीबाणीला अनुशासनपर्व म्हटले. त्याच नाण्याची ही दुसरी बाजू मला वाटत आली आहे. इथेही स्वतःला मायनॉरिटी म्हणूवून घेणे संस्था टिकवण्याच्या दृष्टीने सोयीचे असले तरी ते विवेकानंदांच्या सरणीत बसते, असे मला वाटत नाही.

### लढाई संपली, युद्ध चालूच

'लढाई संपली, युद्ध चालूच' हा मथळा पंजाबच्या समस्येला साजेसाच आहे. १९८४मध्ये पंजाब करार झाला नि एक लढाई जिंकली. पण पंजाबमध्ये अधिकाधिक हिंसाचार होतोच आहे. १९९० चे चार महिने उलटले तरी दररोज हवे तेवढे खून पडल्याचे वृत्तपत्रात छापून येते. निवडणुकीनंतरही पंजाबचे चित्र तसूभर बदललेले नाही. भयभीषणता मात्र झपाट्याने वाढते आहे. भिंद्रनवाले यांची हत्या झाली. त्यांचे आदरपूर्ण आणि करुणाजनक चित्र चार एक वर्षांपूर्वी दत्तप्रसाद दाभोळकर यांनी मराठीत सादर केलेले आठवते. आता धर्माधिकारी यांनी तसेच चित्र संत लोंगोवाल यांचे दिले आहे.

शीख व हिंदू यांच्यातली दरी वाढतेच आहे. खलिस्तानची मागणी फोफावत जाऊन तिला परदेशातून खतपाणी घातले जात आहे. पण शीख-हिंदू समस्या उद्‌भवली तेव्हा राजकर्त्यांनी उचललेली पावले काही सरळ नव्हती हे ओघाने येतेच. पंजाबचा प्रश्न इंदिराजींनीच दुटप्पी नीतीने गंभीर केला. खलिस्तानची मागणी त्यांच्या मृत्यूपूर्वीही होतीच. पण शिखाने त्यांना मारले म्हणून त्या गेल्या त्या दिवशी शिखांच्या कत्तलीचा जो प्रयोग दिल्लीत पुढे तीन दिवस झाला, त्या वेळी राजीव गांधी व त्यांचे सहकारी स्वस्थ होते. शीख कँपमधल्या लोकांची हालत सुधारण्यासाठी काँग्रेस सरकारने योग्य ती पावले उचलली नाहीत, हे प्रकट सत्य आहे. त्या शिखांच्या भीषण भोगांच्या कथा आम्ही वृत्तपत्रात वाचल्या आहेत. अजूनही अधूनमधून वाचतो. दाभोळकरांनी हे चित्र रंगवले आहे. पण धर्माधिकारी यांच्या मीमांसेत त्याचा मागमूसही आढळत नाही. राजकारण टाळून परिस्थितीचा अभ्यास करण्याचे धोरण तर याच्या आड आले नसेल? त्यांच्या या दौऱ्याचा विशेष असा की प्रबोधिनीतर्फे पन्नास-बावन्न तरुण-तरुणी एकात्मतेचा प्रयत्न करण्यासाठी पंजाबात जाऊन तिथे आपले विधायक कार्य, मुलाखती, भजने, लोकात

मिसळणे, कळकळ कार्यव्यापृत करणे हे सारे काही करीत होती.

हा वृत्तान्त खरा आहे. त्यात आच ओतप्रोत आहे; पण जे आन्ध्रानुभवात किंवा आसाम अनुभवात आहे ते इथे आढळत नाही, हे खरे. इथे चिकित्सेला धार नाही. अनुभवांना डूब नाही.

## दिल्ली....पंजाब.... काश्मीर

हे संमिश्र म्हणजे उत्तरीय खिचडीचे, पुस्तकातले सर्वात मोठे म्हणजे १०० पानांचे प्रकरण. पण याच्यात लेखकाच्या मनावर पंजाबच्या सद्भाव-यात्रेत आलेले एक अनामिक दडपण जाणवते ते इथे आढळत नाही. गर्दीत, वर्दळीत, भांडणातही एक मोकळेपणा आढळतो. इथे धर्माधिकारी यांनी काश्मीरला घटनेने ३७० कलमाने बहाल केलेल्या स्वायत्ततेबद्दल वाटणारा रास्त आकस त्यानी योग्य शब्दात व्यक्त केला आहे. अगोदरसुद्धा या कलमाचा उच्चार त्यांनी केलेला आहे. हा त्यांना दशकभर सतावत आलेला प्रश्न आहे. हे कलम तसे हंगामी स्वरूपाचे आहे. काढून टाकता येण्याजोगे. त्याचा गाभा असा की काश्मीर स्वायत्त आहे. काश्मीरमध्ये भारतीयाला नागरिकत्वाचे कुठलेही हक्क नाहीत. पण काश्मीरच्या रहिवाशांना मात्र भारतात कुठेही घर बांधायचा, मत देण्याचा वगैरे सर्व नागरिक हक्क आहेत. हे काय म्हणून? भारतीय नागरिक व काश्मीरी नागरिक फक्त एवढाच उल्लेख धर्माधिकारींनी केला आहे. काश्मीरला वेगळा दर्जा मिळाल्याने पाकिस्तानी नागरिकही तिथे 'सोय' म्हणून राहू शकतो. धर्माधिकारी यांनी या दोन्ही नागरिकांचे धर्मगट सांगितले नाहीत हे फार चांगले झाले. पण आपण ओळखतो की आताचा काश्मीरी नागरिक हा मूलतः मुस्लिम नागरिकच समजला जातो. तेव्हा भारतीयांना म्हणजेच हिंदूंना काश्मीरात वाव नाही. नुकतेच काश्मीरहून आलेल्या वार्तावरून आम्हाला असे कळले की, आता काश्मीरातून हिंदूंच्या हकालपट्टीची मोहीम सुरू झाली आहे. मी काही हिंदुत्ववादी नाही. तरीसुद्धा जिथे शतकानुशतके हिंदू राजांनी राज्य केले तिथे आता आमचे-- मी काँग्रेसचे मुद्दामच म्हणत नाही-- राज्य आल्यावरच हा एकतर्फी संग्राम सुरू झाला. ते घटनेचे कलम युनोच्या दडपणाखाली खंडित भारतावर; पाकिस्तान नवे राज्य बनता बनताच भारतावर लादले गेले. घटनेला अर्धे शतक उलटून गेल्यावरही, घटनेच्या काळी ज्यांचा जन्मही झाला नव्हता असे धर्माधिकारींसारखे उमदे तरुण भयचकित होऊन विचारताहेत, हे कलम रद्दबातल का करीत नाही? आणि विठ्ठलराव गाडगीळ त्यांना उडवाउडवीचे उत्तर देतात. इथे मात्र नेहरूंपासून चालत आलेला काँग्रेसी कावा दृष्टोत्पत्तीस येतो. कारण पाश्चात्य ग्रंथकारांनी आता स्पष्टच नोंद करून जगाला सांगितले आहे की स्वायत्त काश्मीर हे माऊंटबॅटन यांनी नेहरूंना घ्यायला लावले. कारण उघड आहे. भारत व पाकिस्तान यांच्यामध्ये त्या वेळी युद्ध झाले असते तर ते माऊंटबॅटन या आमच्या ब्रिटिश व्हाइसरॉयसाहेबांना नको होते. नाही तर त्या वेळी

काश्मीरचा प्रश्न भारतापुरता तेव्हाच निकालात निघाला असता. तेव्हा काश्मीर युनोच्या छत्राखाली राहू द्यावे, स्वायत्त व्हावे असे नेहरूंच्या मनावर बिंबवण्यास माऊंटबॅटन यांनी आपल्या पत्नीस सांगितले. प्रा. श्री. म. माटे यांनी नेहरूंच्या या वर्तनावर टीका केली तेव्हा चोहोकडून टीकेचा मारा त्यांच्यावर झाला. आणि माटे सार्वजनिक अब्रू हरवून बसले. तेच सत्य पाश्चात्यांकडून प्रकट झाले आणि आम्ही माट्यांचा छळ पाहणारे मात्र भारताच्या हानीचा हा पाया विसरून गेल्याचे ढोंग करीत बसलो आहोत. नेहरू-विजयगाथा अजून तशीच दिमाखात वावरते आहे. भारतविनाशाचे प्रचंड भय मात्र हरएकाच्या नसेनसेत वाहते आहे.

नेहरूंनी असा काश्मीरचा सवतासुभा मान्य का केला? पाश्चात्य ग्रंथकारांनी गुपित उघडे केले आहे. नेहरूंना लेडी माऊंटबॅटन यांचा सहवास हवा होता. नित्याचा भरघोस मोबदला म्हणून केलेला हा समझोता. विठ्ठलराव हात झटकून मोकळे न होतील तर काय करतील? धर्माधिकारींसारखे प्रश्न विचारीतच बसतील. मात्र इथे भारतीयत्वाचा म्हणजेच पर्यायाने हिंदुत्वाचा असा होम झालेला पाहून, 'तथाकथित जातीयवादी' मात्र काश्मीरच्या व भारताच्या शासनाला चैन पडू देणार नाहीत. पंजाब, काश्मीर, पाकिस्तान, चीन, सर्व मुस्लिम राष्ट्रे, अमेरिका आणि रशिया असे सर्वविश्वीय अभेद्य कोडेच आता आम्हा भारतीयांपुढे आ वासून उभे राहिले आहे. धर्माधिकारी म्हणतात की 'एकात्मता विरोधी चळवळीला भारताबाहेरून चेतवलं जातं हे उघड सत्य आहे.' हे कुणाही भारतीयाला नाकबूल करता यायचे नाही. तरीही 'जातीयते'च्या नावाखाली भारतीय नागरिकांपैकी बरेच राजकीय खेळी खेळतात. त्यामुळे ते कलम हंगामी स्वरूपाचे वाटले तरी भ्रमाच्या अंधारात ते पिशाच्चासारखे आम्हाला भेडसावते आहे. इथेच एकात्मतेची अंतिम परीक्षा आहे.

नशीब एवढंच की विठ्ठलराव गाडगीळ पुढे काश्मीरात राष्ट्रघातक कारवाया चालू आहेत, एवढे तरी म्हणतात.

धर्माधिकारी यांनी लंकेचा प्रश्नही इथे उपस्थित केला आहे. लंका व भारत यांच्यामध्ये तामिळी प्रश्नावरून तणाव वाढत गेला. आता तो युद्धप्रकार गणला जातो. जाणते तपशील जाणतातच. दोष कुणाचा? सर्वसत्ताधीश काँग्रेस पक्षाचाच. कारण देशात दुसरा कुठला पक्ष काँग्रेसला पर्यायी ठरू शकेल इतका बलवान नाही, हे प्रकट सत्य आहे.

भा. ज. प. सत्तेवर असला तरी तुम्ही फारुक सरकारबद्दल कोणते धोरण अवलंबिले असते? त्याला माथुरजींचे उत्तर असे की हा प्रश्न काल्पनिक आहे. आगाऊ आहे. विठ्ठलरावांप्रमाणेच धर्माधिकारी यांनी भा. ज. प. नेत्यांची छान फिरकी घेतली आहे.

अटलजी, अडवानी इत्यादी नेत्यांची भेट मिळणेसुद्धा किती दुर्घट आहे ते धर्माधिकारी मोकळेपणाने सांगतात आणि त्यावर नेते जनसंपर्कापासून कसे दुरावत जातात हे एक अनोखे सत्य सांगतात, तरी अडवानींची मुलाखत मिळते.

धर्माधिकारींचा प्रश्नः काश्मीरमध्ये मुख्यमंत्री शहा फारूकपेक्षा जास्त वाईट व

जातीयवादी आहे.

अडवानींचे उत्तर : राष्ट्रीय हितासाठी नव्हे, तर पक्षीय हितासाठी फारूकना दूर केलं. पुढे ३७० कलमाचा प्रश्न धर्माधिकारी यांनी केला.

उत्तर : ते रद्द करायला काँग्रेस बांधलेली नाही. ही तात्पुरती तरतूद आहे अशीच पंडितजींची भूमिका होती.... हे कलम चालू ठेवण्यामागे मुस्लिमांचा अनुनय करण्याची भूमिका आहे हे फार सोपं स्पष्टीकरण झालं. खरं तर असं आहे की राज्याचे काही हक्क मानण्यात आलेले आहेत ते हिरावून घेणं नाही. वगैरे.

पण जम्मू-काश्मीर वादातूनच केंद्र व राज्य यांच्यामधल्या ताणतणावाला प्रत्यक्ष उद्‌गार मिळाला एवढेच या प्रकरणाचे फलित. मुख्य म्हणजे या भ्रमंतीचा काळ हा इंदिराजींच्या पुनरागमनाचा काळ आहे. इथे या संदर्भात धर्माधिकारी यांनी एका पत्रकाराने मांडलेले एक वास्तव दिले आहे. ते असे, "निवडणुका उंबरठ्यावर आल्या की इंदिराजी देशभर पायाभरणी समारंभ पार पाडत फिरतात. येत्या निवडणुका दाराशी असता त्यांनी 'खलिस्तान'चा समारंभ पार पाडला आहे.

पण इंदिराजीच आसाम, पंजाब, काश्मीरच्या प्रश्नांना जबाबदार असल्या असे गृहीत धरूनसुद्धा विरोधी पक्षाची, विशेषतः भा.ज.प.ची धोरणे कोणती हे स्पष्ट होत नाही. विरोधकांची संघटनाशक्ती, पर्यायी पक्ष बनायला अपुरी पडते. इंदिराजींना हटवन कार्यभाग सिद्ध होत नाही, हे ऐतिहासिक सत्य आहे, हेच या प्रकरणाचे सार आहे.

दुसरे म्हणजे प्रादेशिक अस्मितेचे एक सुरेख उदाहरण काश्मीरच्या बाबतीत धर्माधिकारी आपल्यापुढे ठेवतात. 'इथंच एक मुद्दा लक्षात घ्यायला हवा. काश्मीर घाटीतील, बहुसंख्य जनता मुस्लिम असूनही, खऱ्या अर्थानं आम जनतेचा कल कधीही पाकिस्तानकडे नव्हता. कारण काश्मीरी अस्मितेलाही एक स्वतःचे रूप आहे. जम्मू आणि काश्मीरचा मुसलमान निदान अगदी अलीकडेपर्यंत जम्मू किंवा काश्मीरचा असे.' १९८४ मधल्या काश्मीरच्या प्रवासात सर्वांत सुरेख व नमुनेदार चित्रण मौलवी मीरवाझ फारूक यांचे आहे. भारताला काश्मीरच्या गृह-राजकारणाची ओळखं याहून चांगली अशी मला कुठे दिलेली दिसली नाही.

साऱ्या राजकारण्यांच्या जबान्या एकमेकांना छेद देणाऱ्या. यावर वार्ताहर देठे यांनी एकच उत्तर दिले, "सब चोर हैं, इनके रग रग में झूठ भरा है!"

काश्मीरमध्ये सार्वत्रिक मतदान व्हावे याला भारत सरकारचा प्रथमपासून विरोध होता, अजूनही आहे. पण काश्मीरचे हे 'नेते' ते आवश्यक कृत्य मानीत होते. देठे म्हणाले, "तळा-गाळातल्या जनतेला घेऊन एक सर्वंकष आंदोलन उभं करा, और सब सालों को फेंक दो.'

यात एन. टी. रामाराव, स्वामी अग्निवेश वगैरे अनेक मुखवटेधारी पात्रे आहेत. तो साराच वार्तापट मजेशीर आहे. वाचीत पुढे जावे. प्रश्न विचारू नयेत.



अनुक्रमणिका

**साबरमतीच्या सांन्निध्यात**

इथे १९८५ साल चालू आहे. इथे गुजराथचे राजकारण येते. हे राजकारण राखीव जागा- संबंधीचे आहे. धर्माधिकारी राखीव जागेची समस्या काय आहे याचे सुरेख विवेचन करतात. पन्नास टक्के राखीव जागा असू नयेत, त्या ४९ पर्यंतच असाव्यात असा सर्वोच्च न्यायालयाने निर्णय दिल्यापासून देशभर राखीव जागांचा प्रश्न धुमसतो आहे. राखीव जागांविरोधी आंदोलन गुजराथमध्येच चालू झालं. मग इतरत्र त्याचं लोण पसरत गेलं.

राखीव जागांची संख्या ४९ टक्क्यांपर्यंत वाढवली. निवडणुकांमध्ये मागासवर्गीयांची एकगठ्ठा मते मिळावीत यावर ऐन निवडणुकांच्या उंबरठ्यावर राखीव जागा वाढवल्या असे म्हणतात. धर्माधिकारी म्हणतात, "राखीव जागांमागच्या या राजकारणाचा एकूण एकगठ्ठा मत मिळवण्याशी किती संबंध आहे याविषयी शंका घेता येईल, कारण आपल्यासाठी जागा वाढविण्यात आल्या म्हणजे हे सरकार आपल्या हिताचं आहे असा विचार करून जाणीवपूर्वक मागासवर्गीयांनी आपापली मतं काँग्रेसच्या पारड्यात टाकावीत एवढी जागृती अजून दिसत नाही. राखीव जागांचा अर्थच न कळलेला खूप मोठा मागासवर्गीय समाज आहे. आतासुद्धा– १९८५– १५ टक्केच राखीव जागा भरल्या जातात. त्या ४९ झाल्या यात आपला काही फायदा आहे म्हणून काँग्रेस सरकारच सत्तेवर आणावं एवढी राजकीय जागृती कशी असणार? काँग्रेसला मागासवर्गीयांची मतं अन्य मार्गाने मिळतात."

१९८० मध्ये सर्वच राजकीय पक्ष मागासवर्गीयांची एकगठ्ठा मते मिळविण्याच्या खटाटोपात होते. त्यांच्या युत्या व पाठिंबे हे केवळ फार्स होते. सर्वच रामभरोसे होते.

तेव्हा याच्यापूर्वी गुजरातमध्ये जे घडले तो सोळंकी सरकार आणि त्यांच्या पोलिसांचा अत्याचार आता जनतेला तेवढा भयंकर वाटेनासा झाला आहे. कारण भयंकर जिणे गोड करून घ्यायला जनता सरावली आहे. निर्ढावली आहे. भ्रष्टही झाली आहे.

बडोद्याच्या हिंदु-मुस्लिम दंग्याच्या वार्ता वृत्तपत्रात व टी.व्ही.वर फार संदिग्ध असतात.. धर्माधिकारी म्हणतात, जातीय दंगलींचा वृत्तान्त देण्याच्या बाबतीत वृत्तपत्रांनी एक अलिखित नियमावली स्वीकारली आहे. तीनुसार ज्यामुळे जातीय भावना भडकतील अशा बातम्या द्यायच्या नाहीत, असा संकेत आहे तो योग्य आहे, पण अशा वेळी अनेकदा विश्वासार्ह बातम्या न पोचता अफवा पोचतात. त्या वेळी खऱ्याखोट्याची शहानिशा करायचा काही मार्ग उपलब्ध नसतो, वातावरण तापतं अन् अखेर एवढ्यावरून भडका उडतो. त्याऐवजी तपशीलवार वस्तुनिष्ठ बातम्याच देणं कदाचित उपयुक्त ठरेल.

गुजरातमध्ये १९८५ साली राखीव जागांचे आंदोलन मेस-फी वाढीच्या निमित्ताने मोरवीच्या इंजिनियरिंग कॉलेममध्ये सुरू झाले. त्यात राजकारणी पडल्यावर 'मुख्यमंत्री हटाव' व 'राष्ट्रपती राजवट आणा' इथपर्यंत ते पोचले. हे सारे पूर्वीच्या नवनिर्माण

चळवळीचे विडंबन आहे.

रक्तपात, बेबंदशाही, फुटीरपणा यांचे ओंगळ दर्शन महात्माजींच्या या भूमीत घडावे याचे वैषम्य धर्माधिकारी यांना सतत बोचते. या वादग्रस्त विषयाचा म्हणजे मागासवर्गीयांना 'दहा वर्षे राखीव जागा मिळाव्यात ही तरतूद १९३२ साली गांधी-आंबेडकर करारानुसार झाली होती. टक्केवारी प्रथम पंधरा होती. आता १९९० पर्यंत टक्केवारी व मुदत दोहोंचीही वाढ झाली आहे आणि आज देशाच्या बहुसंख्य असलेला नागरिक वर्ग त्यामुळे अस्वस्थ झाला आहे यात शंका नाही. गुजरातचे वरचे उदाहरणच सर्वत्र आज विविध रूपांत प्रगटले आहे. धर्माधिकारींच्यामध्ये एक मुत्सद्दीही मला त्यांच्या या पुस्तकात मुलाखती घेणाऱ्या नेमक्या सांध्यावर विचारलेल्या खुबीदार पण सत्याच्या कलाने जाणारे प्रश्न विचारण्याच्या खास शैलीत आढळतो. हे मी स्वागतार्ह चिन्ह समजते. काश्मीरमध्ये त्याने मौलवी फारुकना पकडले आहे. डॉ. फारुकना पकडले आहे. त्यांच्या प्रश्नाने हे 'छुपे' लोक एकदम उघडे पडले आहेत. पण सर्वांत छान फिरकी त्यांनी गुजराथच्या डॉ. आंबडेकरांचे विद्यार्थी व सहकारी, पेशाने वकील आणि मागासवर्गीय यांच्या 'राखीव जागा' या विषयांत तज्ज्ञ असलेल्या डॉ. लेहुआ यांची घेतली ती अगदी प्रारंभापासूनचा राखीव जागांसंबंधीचा लैदुआंनी दिलेला तपशील ब्र न उच्चारता नमूद करीत आहेत. राखीव जागांच्या व्यवस्थेमुळे मागासवर्गीयांना आर्थिकदृष्ट्या वर यायला संधी उपलब्ध झाली; खाजगी क्षेत्रात सवर्णच प्रमुख असल्याने तिथे दलितांना नोकऱ्या मिळणे कठीणच. तेव्हा राहता राहिले सरकारी क्षेत्र. तिथे मागासवर्गीयांना सवलती मिळाल्यावर सवर्णांची आर्थिक गुलामगिरी सैल होऊ लागली. अनेक ठिकाणी सवर्णांना मागासवर्गीयांचे पाय धरावे लागले. हे लेहुआंच्या प्रवचनाचे पहिले भाष्य. दुसरे भाष्य असे : ते गुणवत्तेच्या मुद्द्याच्या अनुषंगाने. कितीही सोयी निर्माण केल्या तरी दलित विद्यार्थी मेरिटवर उच्चवर्णीयांशी अजूनही फार टिकू शकत नाही. राखीव जागांची म्हणून अजून आवश्यकता संपलेली नाही. हे भाष्य लेहुआंच्या 'आर्थिकदृष्ट्या सबळ झाला तरी, दलित सामाजिकदृष्ट्या दलितच राहातो.' लेहुआंच्या या विधानातला विरोधाभास पाहून धर्माधिकारींनी चटकन त्यांना 'वर्गयुद्धाविषयी तुम्हाला काय वाटते?' असा पेचप्रश्न विचारला. लेहुआ आता त्यांच्या 'खऱ्या' अवतारात प्रगटले. ते 'वर्गयुद्ध? आम्हालाच हवं आहे. होणारच आहे. मार्क्सच्या पद्धतीनं म्हणायचं झालं तर We have nothing to loose, but backwardness. त्यामुळे मी म्हणतो की वर्गयुद्धासाठी Dalits of India will unite.'

भारतात आढळून येणाऱ्या नोकरशाहीची किती दुर्दशा सत्ताधीश राजकारण्यांनी करून टाकली आहे याचे अत्यंत मर्मभेदी उदाहरण म्हणून पोलिस कमिशनर जसपाल सिंग यांची मुलाखतवजा कहाणी धर्माधिकारी यांनी अत्यंत आदरभावाने व व्यथित होऊन आपल्यापुढे ठेवली आहे. जसपालसिंगांनी आपल्या पदाचा राजीनामा दिला. ते भा.ज.प.

मध्ये शिरले. तिथेही त्यांना तिकीट मिळाले नाही. ते स्वतंत्रपणे निवडणूक लढले नि पराभूत झाले. भा.ज.प.ने त्यांना अर्थातच पक्षातून काढून टाकले. इथे धर्माधिकारी त्यांना पेचप्रश्न विचारूच शकले नाहीत. मनोमीलन झाले होते. असो. जसपालसिंगांचे, शीख, हिंदू, दलित, पंजाब समस्या, राखीव जागा यांचे विचार खरोखरीच मौलिक आहेत. धर्माधिकारी यांनी त्यांना अक्षररूप दिले आहे.

खरं म्हणजे हे प्रकरण एक प्रबंधच आहे. मुलाखतींच्या भरगच्च पुराव्यांनी भरलेला. इथे मुख्यमंत्री सोळंकी आहेत. चिमणभाई पटेल आहेत. डॉ. नेने आहेत. विष्णु पंड्या आहेत. शिवाय मंडल आयोग, राणे आयोग, नर्मदा प्रोजेक्ट वगैरे सारे आहेच. आणि या साऱ्यांना फेर घालीत एक झपाटलेली, झपाटून टाकणारी लेखणी फिरते आहे. आणि त्या नंतर 'भविष्यवेध' घेणारी भेदक कविता आहे.

### नद्यांचे तीर : रक्तपातांच्या दिशेने

हे प्रकरण म्हणजे अनुभवांचे कोलाज. म्हणजे बायकी भाषेतील वेगवेगळया रंगीत चिंध्यांची गोधडीच आहे. यांत अनेक विषय आहेत. रामजन्म भूमी-बाबरी मशीद, शहाबानो खटला, मुस्लिम महिला विधेयक, मुस्लिम माणसाचा अलिगडमधील शोध, शरियत, समान नागरी कायद्याचा जाहीरनामा. मुस्लिम सत्यशोधक चळवळ, आणखी कितीतरी. यात अलिगढ युनिव्हर्सिटीचं एक उत्कृष्ट अंग आपल्या नजरेस येतं. शिवाजीबद्दल आदर, संस्कृत पांडित्याबद्दलची कळकळ वगैरे. डॉ. कैंद्रे यांचे चित्रण धर्माधिकारींनी फार रोचक घडवले आहे. वेदपठणावरून वाद पण नंतर कुराण-पठण करणे हा त्यावरचा तोडगा इथे निघाला. ब्रिटिश काळात भारतीय मुस्लिमांच्या आधुनिकीकरणाला अलिगढमध्येच सुरुवात झाली हेही आपल्याला कळते. स्वातंत्र्योत्तर काळात मुस्लिमांचे अल्पसंख्यांक म्हणून संरक्षण करण्याचा पवित्रा इथलाच. संघाच्या शाखेपासून साम्यवादी संघटनेपर्यंत पोचणारा विद्यार्थी कार्यकर्ता बंकिम कुलश्रेष्ठ हे चांगले व्यक्तिचित्र आहे. फॅनॅटिक भूमिकेमुळे मुस्लिमांचे अहित होईल असे म्हणणारे आणि त्याला दुजोरा देण्यासाठी पाकिस्तानातल्या स्टार वृत्तपत्रातला तसाच लेख सादर करणारे अलिगढचे रसूलसाहेब आपण विसरू नयेत. आखाती देशांची तरुण शिक्षित मुस्लिमांवर पडलेली मोहिनी चिंतेची बाब आहे. इथे 'फंडामेंटालिझम' मूलतत्त्ववाद या विषयावरही ऊहापोह केला आहे. ख्रिस्ती, मुसलमान वगैरे एकाच देवाची, एकाच पुस्तकाची आज्ञा पाळतात. म्हणून ते मूलतत्त्ववादी आहेत. हिंदूत कुठल्याही अर्थाने मूलतत्त्ववाद नाही. कारण ते बहुश्रद्धावादी आहेत. इथे आहिताग्नी राजवाड्यांना हिंदू मूलतत्त्ववादी म्हणण्यात धर्माधिकारी चुकले आहेत असे मला वाटते. अलिगढातल्या आर्थिक स्थितीचे चित्र असेः हिंदू सावकार आणि कर्जदार मुसलमान. आक्रमक साम्यवादाचेही रूप धर्माधिकारी यांना अलिगढमध्ये दिसले.

यानंतर अयोध्येत धर्माधिकारी प्रविष्ट होतात. इथे समान नागरी कायदा, रामजन्मभूमी हेच मुख्य उद्‌गारांचे विषय. लखनौत मुस्लिम कायदा आणि अरबी भाषा व मुस्लिम इतिहासाचे भाष्यकार डॉ. हर्षनारायण यांचे व्यक्तिमत्त्व परिणामकारक वाटते. लखनौतली दुसरी मुलाखत विश्‍व हिंदू परिषदेशी. लखनौत हिंदूंच्या रक्तपाताच्या रास्त व अतिरेकीही कहाण्या, दोन्ही जातीतला दुरावा व दुष्टावा धर्माधिकाऱ्यांना व्यथित करतो. त्यांना वाटतं, हे सारं मिटवायला 'गांधी' हवाय. अयोध्येत तर काय वातावरण निवांत. पण मुलाखती बाबरी मसजिदबद्दलच्या व रामजन्मभूमीवादी महंतांच्या दोन टोकांच्या भूमिका दर्शवणाऱ्या. इथे मंदिराकडे जाणाऱ्या भारतीयांच्या (हिंदूंच्या) तोंडावर धर्माधिकारी यांना एक वेगळीच शांतता दिसते.. त्यांना वाटते की हीच श्रद्धा काही सृजनशील रूप नाही का घेऊ शकणार? मंदिरात रामापुढे धर्माधिकारी यांचेही हात-आपोआप जुळतात आणि इथेच त्यांना गांधींचे स्मरणही होते.

## स्वयंसेवी चळवळ : महात्माजींचा लोकसेवक संघ

ही वास्तविक प्रस्तावना व्हायची पण ती झाली आहे फलश्रुती. एका कार्यकर्त्याच्या दशकाच्या समाजप्रवृत्ति-निरीक्षणाची, समाज-मानसाच्या विविध जिवंत घटकांशी साधलेल्या संवादांची. समाजाच्या संघर्षाचे स्वरूप समजून घेऊन त्यातून विसंवादाचे, विध्वंसाचे मूळ नष्ट करण्यास समर्थ असलेली प्रेरणा क्षणोक्षणी आणि कणोकणी टिपून घेणारी संवेदनक्षमता, आणि ती शब्दकळेत व्यक्त करण्याचे भरपूर कसब असलेल्या एका तरुणाची. कार्यकर्त्याचे आता सनदी अधिकाऱ्यात रूपांतर झाले आहे.

या शेवटच्या लेखातला मजकूर पाहून मला आनंद वाटला. कारण मी प्रथमच ंगितले त्याप्रमाणे दत्तप्रसाद दाभोळकरांचे पुस्तक धर्माधिकारी यांना प्रेरणादायक ठरले ून जशी त्यांना स्वयंसेवी संस्थांची साखळी जमून समाजविकास व्हावा असे वाटते, व मला या सामाजिक जाणिवा आणि राष्ट्रीय बांधिलकीच्या लेखकांची साखळी सलेली पाहण्यात सुख वाटते. या सदरात धर्माधिकारी यांनी स्वयंसेवी संस्थांची हजारावरची संख्या लक्षात घेऊन तळागाळाचा माणूस हे त्या त्या संस्थांचे मूळ अधिष्ठान समजून, स्वानुभवावर आधारलेले जे संघटनसूत्र सांगितले ते बिनतोड आहे. भारतीयत्व म्हणजे काय याची रोचक मीमांसा केली आहे. संस्थांचे एकीकरण हा मुद्दा फार महत्त्वाचा आहे.

सरकारी ग्रामीण विकास योजनांचा फायदा या संस्थांनी अवश्य घ्यावा आणि सरकारच्या विकास योजनांना जनतेचा चेहरामोहरा द्यावा; परदेशी आर्थिक मदतही घेण्यास प्रत्यवाय नाही. पण सर्वत्र अट एकच– कुठलीही मदत स्वतःच्या अटीवर घ्यायची. स्वावलंबन हे स्वयंसेवी संस्थांचे ब्रीद असावे असे ते म्हणतात. धर्माधिकारी यांनी जगातल्या सर्व देशातल्या युवा चळवळींची योग्य दखल घेतली आहे आणि जागतिक

मानचित्रात भारताचा दरिद्रीनारायणही कुणी असा-तसा नाही, हे काव्यात म्हणजेच खऱ्या भाषेत सांगितले आहे.

असे हे अतिशय व्यापक, भारतीय घटनांचे आणि प्रसंगांचे पाहिलेले आणि अनुभवलेले समाज-चित्र, राजकारणही जाणून पण आत्मीयतेने केलेले चिंतन फार दुर्मिळ आहे. दाभोळकरही आता एकटे नाहीत असे मला जाणवते.

भारतीय जनतेचा आजचा अत्यंत करुण असा आलेख सादर करताना धर्माधिकारी केवळ खंत करीत नाहीत. स्वयंसेवी संस्थांबद्दल त्यांना थोर आशा आहे. प्राप्त परिस्थितीत ध्येयासाठी झगडण्याची त्यांची जिद्द अशीच सर्वदा टिकून राहो अशी माझी इच्छा आहे.

(दुर्गा भागवत, झवेरी व्हिला, गिल्डर लेन, ताडदेव, मुंबई ७.)

(अस्वस्थ दशकाची डायरी : अविनाश धर्माधिकारी. उन्मेष प्रकाशन, पर्वती पुणे ९. पृष्ठे ६२०. दीडशे रुपये.)

---

* **महाबँकेत एक भिकारी!**– (एका धडपडणाऱ्या सामाजिक कार्यकर्त्यांचे प्रांजल आत्मनिवेदन) : प्रीतमसिंग जुनेजा; जनवाणी मुद्रणालय, लि. पुणे-२. पृ. १५२, रु.-६०/-, १९८९.

* **पाब्लोनेरुदांच्या आठवणी**– अनु.- सुधाकर बोरकर, लोकवाङ्मय गृह, भूपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई २५, १-१९८९, किंमत-४५/-, पाने-१००.

* **चार्ली चॅप्लिन**– रंगनाथ कुलकर्णी, लोकवाङ्मय गृह, भूपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई २५, १-१९८९, किंमत-१५/-, पाने-५१.

### काव्य

* **परागपुष्पे**– य. न. केळकर, उपाताई आगरकर, कृषि उद्योग मूलशिक्षणसंस्था, मु. पो. कऱ्हाटी (जि. पुणे), १-१९८९, पृ. २१६, किंमत-४०/-.

* **गाथा**– शिंदे फ. मु., सुरेश एजन्सी, २०५ शुक्रवार पेठ, पुणे २, १-१९९०, किं.-२५/-, पाने-५६.

* **झोपेचा गाव**– शांता शेळके, सुरेश एजन्सी, २०५ शुक्रवार पेठ, पुणे-२, १-१९९०, किंमत-२५/-, पाने-११५.

* **दस्तऐवज**– देवेंद्र खंडारे, सुरेश एजन्सी, २०५ शुक्रवार पेठ, पुणे-२, १-१९९०, किंमत-२५/-, पाने ७६.

* **भ्रमण दिंडी**– भी. ज्ञा. शहाणे, 'ममिता' ४१/४५ एरंडवणे, डॉ. केतकर पथ, पुणे-४, किंमत-३०/-, पाने ६२.

# वडीलधारी माणसं : शांता शेळके

## कौटुंबिक जिव्हाळयाने रसरसलेली व्यक्तिचित्रं

म. श्री. दीक्षित

श्रीमती शान्ता शेळके यांचे 'वडीलधारी माणसे' हे नवे पुस्तक म्हणजे त्यांनी वेळोवेळी (कुठे, केव्हा पत्ता लागत नाही) लिहिलेली अकरा व्यक्तिचित्रे आहेत. त्यांत सात पुरुष आणि चार स्त्रिया असून एकीचा अपवाद वगळता इतर साऱ्या व्यक्ती लोकप्रसिद्ध, किंबहुना लोकप्रिय अशा आहेत. लेखिकेला या सर्वांचे निकट सान्निध्य लाभले असल्याने, ही व्यक्तिचित्रे साहजिकच कौटुंबिक जिव्हाळयाने विणली गेली आहेत. व्यक्तिचित्र हा वाङ्मयप्रकार चरित्राला जवळचा आहे. शान्ताबाईंच्या सहजसुंदर, प्रसन्न ललित लेखणीने या वाङ्मय प्रकाराचे नाते लघुकथेशीही जुळल्याचे जाणवते. संवादांच्या पखरणीमुळे ही व्यक्तिचित्रे उठावदार उतरली आहेत.

वहिनी म्हणजे शान्ताबाईंची आई. जेमतेम लिहिता-वाचता येणारी, एक खेडवळ, खस्ता खाणारी संसारी स्त्री. वाचकांच्या दृष्टीने तशी अज्ञात. पण तिचे व्यक्तिचित्र वाचल्यावर सोपानदेवांच्या बहिणाबाईप्रमाणेच एक दुसरी बहिणाबाई भेटल्याचा आनंद होईल. कौटुंबिक संकटात वाचन हाच जिचा विरंगुळा होता आणि 'आपल्या रूपावर एकही मूल गेले नाही' अशी खंत बाळगणारी, विलक्षण पाठांतर असणारी ही आई शांताबाईंनी भावस्निग्धतेने रेखाटली आहे.

गुरुवर्य बापूसाहेब माटे, समीक्षक रा. श्री. जोग सर, पत्रकार आचार्य अत्रेसाहेब, कादंबरीकार मामा वरेरकर आणि रसिक मनाच्या विदुषी दुर्गा भागवत– या पाच, साहित्य क्षेत्रातील व्यक्तींच्या सहवासातील नाना अनुभव, गमतीजमती सांगून शांताबाई त्यांचं व्यक्तित्त्व नि कर्तृत्व प्रकट करतात. कै. केशवराव कोठावळे लहानाचे मोठे कसे होत गेले, लेखकांची योग्यता हेरून-जोखून त्यांना ते कसे जोपासत, फुलवत याचा त्या अचूक वेध घेतात नि 'त्यांचे सारे आयुष्य हाच मुळी एक साहित्योत्सव होता' अशी एक सार्वत्रिक प्रतिक्रिया नोंदवून त्यांचं प्रत्ययकारी व्यक्तिचित्र उभं करतात.

वाङ्मयीन व्यक्तींप्रमाणेच संगीत क्षेत्रातील व्यक्तींची चित्रेही सरस, किंबहुना अधिक प्रभावी उतरली आहेत. आशा, लता आणि हृदयनाथ ही मंगेशकर भावंडं म्हणजे लेखिकेच्या खास प्रेमादराचे, नव्हे, भक्तीचे विषय. शब्द आणि सूर असेच उभयपक्षी आप्तसंबंध. शांताबाईंची सोपी, अर्थपूर्ण नि आर्त गीतरचना कंठगत करणारी ही तिन्ही भावंडं म्हणजे जणू देवाचीच भाग्यवान लेकरं. लेखिका त्यांच्या गुणवैशिष्ट्यांचं ओंजळ

भरभरून कौतुक करते. थोर कलावंत घरात आणि समाजात कसे वावरतात याचे सर्वांगाने दर्शन त्या घडवतात. दीनानाथ यांच्याविषयीचा पूज्य भक्तिभाव, जुन्या-नव्या वाङ्मयाविषयीचं उदंड प्रेम, संगीतसाधनेसाठी कष्ट घेण्याची जिद्द, प्रयोगशील मन, औदार्य इत्यादी अनेक पैलू स्पष्ट करतात. त्यातही आशाबाईंचं व्यक्तिचित्र विशेषच सरस आहे. संगीत दिग्दर्शक वसंत पवार यांच्या यशस्वी पण बेहोष, बेहिशोबी, अकाली वाटचालीचं चित्रण चटका लावून जातं.

पुस्तकाच्या प्रास्ताविकात लेखिकेने जणू सारभूत वैशिष्ट्य सांगितले आहे. 'या साऱ्यांच्या संगतीतून, मार्गदर्शनातून आजची मी घडत गेले आहे. या व्यक्तिचित्रांमधून आणखी एक व्यक्तिचित्र गुप्त लिपीसारखं उमटत गेलं आहे. ते व्यक्तिचित्र माझं आहे.' त्या त्या व्यक्तिचित्रात दडून बसलेलं शांताबाईंचं साहित्य-संगीत-कलाभिरुचीने समृद्ध बनत गेलेलं चिरतरुण व्यक्तित्त्व गुप्त सरस्वतीप्रमाणे सहजगत्या सोबत करीत जातं. स्वतःकडे कमीपणा घेऊन, बावळटपणाचा आरोप करून दुसऱ्याचे चांगले तेवढेच पैलू प्रकाशमान करायचे हा प्रस्तुत व्यक्तिचित्रांचा एक समान धागा आहे. या व्यक्तिचित्रांमधला उणेपणाच काढायचा तर अघळपघळपणाचा काढता येईल. अघळपघळपणा हा म्हटला तर गुण आहे, म्हटला तर दोष आहे. या दोन्ही रूपांत तो दृग्गोचर होतो आणि कधी साखर थोडी जास्त झाल्याचा भास होतो, तर कधी फक्कड, झकास, मस्त अशा विशेषणांनीही दाद द्यावी असा कौटुंबिक जिव्हाळ्याने ओथंबलेला हा व्यक्तिचित्रसंग्रह आहे.

(म. श्री. दीक्षित, नवा ८६५ सदाशिव पेठ, पुणे ३०)

(वडीलधारी माणसं : शान्ता ज. शेळके, सुरेश एजन्सी, २०५ शुक्रवार पेठ, पुणे २, किं. ६० रु.)

---

**साहित्यिक निधी– देणगीदार (१ एप्रिल १९८९ पासून)**

१. भाऊसाहेब गमे, मढी. (पुणे) ५०/- २. हेमंत वसंत कटककर, पुणे. ३. सौ. तोरणे, ठाणे. १०१/- ४. कमल इलेक्ट्रीक वर्क्स, ठाणे. ५००/- ५. सेक्रेटरी चीफ मिनिस्टर्स रिलीफ फंड १ लाख रुपये/- ६. प्राचार्य सत्यवती कुलकर्णी, पुणे. १०००/- (ठाणे स्मरणिकेतील जाहिरात) ७. पनालाल लखमीचंद टाटीया, इगतपुरी. ५०१/- ८. वैभव को. ऑ. बँक लि. ५०००/- ९. सौ. नीला सुरेंद्र शृंगारपुरे २००/- १८. मॅनेजर भारत सहकारी बँक लिमिटेड, ठाणे. २०००/- १२. आर. रामनाथ, मुंबई– ८२. ५०१/- १३. श्री. कमलाकर ग. भूमकर, नौपाडा, ठाणे– २. ५०१/- १४. दामोदर कुडे, अमळनेर. १००/- १५. डॉ. कल्याणी दिवेकर, पुणे. ५०/- १६. प्रा. मालती शं. किर्लोस्कर १००/- १७. डॉ. यू. म. पठाण, औरंगाबाद. ५०१/- १९. विलास विनायक फडके, पेण (जि. रायगड). २५/- १०. विश्वनाथ विनायक जोशी. ५१/- ११. ललिता भावे, पुणे. १०१/-



अनुक्रमणिका

# मनमीरा : प्रा. हिरेमठ

## रोमँटिकतेची ओढ, परमार्थाची जोड

डॉ. दुर्गा दीक्षित

मातृभाषा कन्नड, पण आज हिंदीचे प्राध्यापक म्हणून काम करणारे प्रा. हिरेमठ.... डोंगरकुशीतील निसर्गरम्य परिसरात उमललेले जीवन आणि बालपणापासून घरातील भक्तिरसाच्या वातावरणाने भारलेले सश्रद्ध मन काव्यात जाणवते. संवेदनशील मनाची सहज स्पंदने भजनाच्या लयीने आणि सुरांनी जोपासलेल्या भावनेशी मेळ घालून प्रकट होतात. खेड्यातल्या मुलावर 'परिश्रम विद्यालया'चे संस्कार, दिव्य-भव्यतेची ओढ, काव्यानंदात डुंबण्याची हौस, निसर्ग अशा रसायनातून फुललेली रोमँटिक वृत्ती.

रोमँटिकता कधी दाट प्रणयगर्भ जाणिवेतून तर कधी विफलतेच्या दारूण गहिवरातून व्यक्त होते. मध्यमवर्गीय संवेदनाशील व्यक्तीचे साधेसुधे भावविश्व प्रासादिक काव्यरूप घेते. 'माझी कविता प्रेमाची / प्रेमाने जग जिंकायची' अशी कवीची भावना. 'प्रेम' हा मुख्य विषय. मखमली मीरेवर प्रसन्न गंधाची उधळण करणारा श्रीरंग प्रणयभावाची तन्मयता दाखवतो. या प्रेमात रोमँटिकता तर आहे, रोमान्स नाही. या प्रेमाला सौंदर्याची ओढ व शिवत्वाची जोड आहे. पावित्र्याचे भान आहे. प्रेमाचे रूपांतर अद्वैतात होण्यावर श्रद्धा आहे. 'श्याममय राधा होता / अद्वैत झाल्या शब्दखुणा ।'

निसर्गाच्या वेगवेगळया उपमांतून प्रेम फुलते, व्यक्त होते आणि अद्वैताकडे झेप घेते. अनेकदा ते विफलतेने ओथंबलेले दिसते. पण नैराश्याकडे जात नाही. अखेर जीवनाच्या या प्राप्त परिस्थितीशी समझोताच करायला हवा. सहनशीलता आणि दुर्दम्य आशावाद यात आहे.

अध्यात्म आणि भक्तिभावना हा ह्या रोमँटिकतेचा दुसरा पदर होय. 'अद्वैताच्या रम्य किनारी / आत्म्याचे रे अर्घ्यदान / आज मी देऊन आल्ये' या ओळीमध्ये याची साक्ष पटते. पुण्यपंथ, छान यात सश्रद्ध मनाचे प्रतिबिंब आहे. षड्रिपूचे सहा खांब रोवून, आत्म्याची तुळई सरळ ठेवून, तीन गुणांच्या आडव्या काठ्या टाकून, झोपडीच्या दाही दिशांना षट्-दर्शने, अठरा पुराणे सोऽहंचे घुमवित तराणे..: अशी झोपडी कवीला हवी आहे. अध्यात्म भक्तिरसाच्या अंगाने येते. तात्त्विकता, वैचारिकता किंवा तत्त्वचिंतन त्यात नाही. निकोपपणे जीवनाला सामोरे जाण्याचा, ते समजावून घेण्याचा प्रयत्न आहे.

हिरेमठांच्या या कविता एकेरी वाटतात, त्यांचा परीघही फारसा मोठा नाही, तरी त्यातला खरेपणा आणि सहजपणा वाचणाऱ्या मनाला भावतो.

हिरेमठांच्या कवितांमध्ये काही शब्दबंध फारच सुंदर आहेत. अर्थाच्या नाजुक छटा व्यक्त करताना आढळतात. गंधरात्र / पुर्णेन्दु श्रांतला / स्तब्धता / विश्रांत / दवाश्रूंचा अभिषेक / मौनगंध / मधुर शाप / शब्दकुटी असे शब्द कवितेला साज चढवितात. पारंपरिक धर्तीवर रचलेल्या काही कविता. फूल / अभंग / सखे / धून / गौळणी, लय आणि सुरामध्ये प्रासादिक बनल्या आहेत.

'मनमीरा'मध्ये एक-दोन अपवाद सोडले तर सामाजिक जाणिवांच्या कविता नाहीत. खरे तर असे वाटते की, कवीचा तो पिंडच नाही. वास्तवाचं दर्शन घडवावं असा मोह कवीला पडत नाही. 'अहो' कवितेत असं वास्तवदर्शन काहीसं झालं आहे. पण 'दिवाळी'त मात्र ते फसलेलं आहे.

रोमँटिकतेची ओढ आणि परमार्थाची जोड यातून कवीला रम्य भविष्यकाळ जाणवत असला तर अनैसर्गिक काहीच नाही.

(मनमीरा : प्रा. सुकांत हिरेमठ, शिवगंगा प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठे ४०, २५ रु.)

(डॉ. दुर्गा दीक्षित, हिंदी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे)

---

* **जागल्या–** बाळ हरि झेंडे, प्रशांत प्रका. २३६ आनंदनगर, कोपरी ठाणे (पू.) जि.-ठाणे, १-१९८९, किंमत-२०/-, पाने-४४.

* **विनोद लहरी–** बावुलनाथ, प्रपंच प्रका., ३८९ शनिवार पेठ, पुणे-३०, १-१९८९, किंमत-४०/-, पाने-१५९.

* **वावर–** भास्कर बडे, वावर प्रका., औरंगाबाद, १-१९८८, किंमत-१०/-, पाने-३६.

* **वेड्या मना–** हनुमंत पवार, विलास पवार, निमगाव मगराचे, १-१९८९, किंमत-७१/-, पाने-४५.

* **पाथेय–** कुसुमाग्रज, पॉप्युलर प्रका., ३५ सी. पं. मालवीय मार्ग, ताडदेव, मुंबई ३४, १-१९९०, किंमत-४०/-, पाने-९५.

* **प्रार्थना दयाघना–** ना. धों. महानोर, पॉप्युलर प्रका. ३५ सी. पं. मालवीय मार्ग, ताडदेव, मुंबई, ३४, १-१९९०, किंमत-५०/-, पाने-९४.

* **पक्ष्यांचे लक्ष थवे–** ना. धो. महानोर, पॉप्युलर प्रका. ३५ सी. पं. मालवीय मार्ग, ताडदेव, मुंबई ३४, १-१९९०, किंमत-६०/-, पाने-९८.

## कादंबरी

* **महाद्वार–** ढेरे अरुणा, सुरेश एजन्सी २०५ शुक्रवार पेठ, पुणे ३०, १-१९९० किंमत २५/-, पान ८८.

* **उर्वशी–** ढेरे अरुणा, सुरेश एजन्सी, २०५ शुक्रवार पेठ, पुणे-२, १-१९८९, पृ. ७६, किंमत-२५/-.



अनुक्रमणिका

# पीकपाणी : इंद्रजित भालेराव

## मातीशी अशी एकरूपता दुर्मिळच

**पु. ल. देशपांडे**

'पीकपाणी' हा तुमचा कवितासंग्रह वाचला. मला तुमच्या कवितांमधली ओळन् ओळ आवडल्याचं कुठल्या शब्दात लिहावं ते मला सुचेना. गायन उत्तम झालं असेल तर ते संपल्यावर मैफिलीत एकदम शांतता पसरते. मैफिलींच्या परिभाषेत त्याला 'सन्नाटा' म्हणतात. मनाची अशी एक अवस्था होते ज्या एका दुनियेत त्या सुरांनी आपल्याला नेलेले असते तिथून बाहेर पडूच नये असे वाटते. तुमच्या कविता वाचत गेलो आणि असाच अवाक् झालो. ग्रामीण काव्य, ग्रामीण साहित्य वगैरे प्रयोग साहित्याच्या जगात सतत होत असतात. पण मातीशी अशी एकरूपता, त्या अलौकिक भावावस्थेतून निर्माण झालेली अशी प्रतिमासृष्टी, भाषेचा असला अस्सलपणा, मातीशी गुंतलेल्या जिवांच्या सुखदुःखांच्या क्षणांची नेमक्या शब्दांतून केलेली अभिव्यक्ती– हे सारं तुमच्या कवितांमधून अनुभवताना आपली सुखदुःखं चित्रमय ओव्यांतून फिरत्या जात्याला सांगणाऱ्या बहिणाबाईची आणि त्याच कुळातल्या असंख्य अज्ञान बहिणींच्या ओव्यांची आठवण झाली.

तुमच्या रचनेतली सहजता आणि जिव्हाळ्याच्या बोलीभाषेत वाचकाशी साधला जाणारा संवाद यामुळे ही जाणीवपूर्वक केलेली काव्यरचना न वाटता अनुभवाच्या बीजातून सहज फुललेल्या कोंभासारखी वाटते. तिला एक प्रकारचं स्वयंभूपण लाभलेलं आहे. प्रा. सुधीर रसाळ यांनी म्हटल्याप्रमाणे अंकुरासारखे ऊनपाऊस-मातीच्या संयोगातून फुटावे तसे फुटलेले हे धुमारे प्रत्येक कवितेतून विखुरले आहेत. ह्या अलग करून निवडायच्या प्रतिमा नसून ती अखंड कविता हाच एक एक धुमारा आहे. संग्रहातल्या पहिल्या कवितेतच तुम्ही पोटच्या पोरापेक्षा शेताला अधिक जपणाऱ्या शेतकरी बापाचं अगदी थोड्या ओळीत इतकं प्रभावी चित्र उभं केलं आहे की, जाणकाराने हे पाणी निराळंच आहे हे पहिल्या सलामीतच ओळखावं. तुमचा संग्रह एखाद्या दीर्घ कवितेसारखा मी सलगपणाने वाचला. ग्रामीण जीवनात जन्मलेल्या त्या कविता वाचताना गुंतत गेलो आणि बहिणाईवरील तुमची कविता वाचताना डोळे कधी भरून आले ते कळलंही नाही. बहिणाईला मऱ्हाटी कविकुलाची आधुनिक कुलस्वामिनी म्हणायला हवी. जनाई, मुक्ताईसारखीच. पाखरांच्या बोलीतून तिला शेताचं सुखदुःख कळलं. त्यातून माणुसकी ठाशी झाली– ह्या सुरावर तुमची ही कविता संपली आणि बराच वेळ मनात झंकारत

राहिली. असा झंकार तुमच्या कितीतरी कवितांनी मनात निर्माण केला. कविता वाचल्यावर यावीशी वाटणारी अशा प्रकारची अनुभूती अलीकडे दुर्मिळ झाली आहे.

एखाद्या रानातली ओळखीची आणि अनोळखी झाडे आणि वेली पाहात पाहात हिंडताना त्या रानानंच निरोपाचं गीत गावं तशी तुमची शेवटची कविता आहे. हे एका मातीवर जिवापाड प्रेम करणाऱ्या आजच्या काळातल्या कवीनं मागितलेलं पसायदान आहे. सर्वेऽपि सुखिनः सन्तु किंवा जो जे वांछील तो ते लाहो ही युगानुयुगे चाललेली प्रार्थना ग्रामवधूचा वेष आणि आत्म्यातून उमटलेली भाषा घेऊन तुमच्या संग्रहात आली आहे आणि सांगता साधून गेली आहे.

मऱ्हाटी साहित्याला एक सुंदर लेणं तुम्ही दिलं आहे. तुमचे आभार आणि मनःपूर्वक अभिनन्दन.

तुमचा
पु. ल. देशपांडे
(रुपाली, ७७७ शिवाजीनगर, पुणे४)
(कवीला लिहिलेले पत्र)

---

# पाश्चात्य साहित्यशास्त्र : डॉ. धायगुडे

## व्यापक विषयाचा आटोपसर परिचय

डॉ. अशोक रा. केळकर

मराठी साहित्याच्या अध्यापकांना आपल्या विद्यार्थ्यांचा संस्कृत साहित्यविचारांइतकाच पाश्चात्य साहित्य विचारांशीही परिचय व्हावा असे नेहमीच वाटत आलेले आहे आणि मराठी साहित्याची स्थिती पाहता ते स्वाभाविकच आहे. (मराठीसाठी किंवा मराठीमधल्या दलितसाहित्यासाठी स्वतंत्र साहित्यविचार का नको हा प्रश्न नंतर विचारण्यात आला.) परंतु काहीशी आश्चर्याची गोष्ट म्हणजे तसा परिचय करून देणारे पुस्तक अजूनपर्यंत मराठीत उपलब्ध नव्हते. (स. गं. मालशे यांनी केलेला वेलेक-वॉरन यांच्या 'थिअरी ऑफ लिटरेचर'चा मराठी अनुवाद आणि वि. ना. ढवळे यांचे 'साहित्याचे तत्त्वज्ञान' ही पुस्तके आपापल्यापरी उपयुक्त असली तरी ही गरज नेमकी भागवणे हा त्यांचा उद्देश नाही.) प्रस्तुत पुस्तकातील सुरवातीची स्वरूप आणि व्याप्ती यांवरची प्रास्ताविक प्रकरणे सोडली तर प्राचीन ग्रीस व रोम, मध्ययुगीन युरोप, आणि अर्वाचीन युरोप (विशेषतः इंग्लंड) यांमधल्या निवडक साहित्य विचारांचा सामान्यतः कालक्रम सांभाळून आणि जरुरीपुरता पार्श्वभूमीचा परामर्श घेऊन परिचय करून दिला










आहे. निवड करताना विचारांचे मूळचे महत्त्व आणि सामान्य मराठी विद्यार्थ्यांची गरज या दोहोंचे चांगले अवधान ठेवले आहे. विचारांची मांडणी साधार आहे, सुबोध आहे, अति-त्रोटक नाही. जरूर तेथे अधिक खोलात गेले तर कसे याची चुणूक दाखवली आहे. महत्त्वाच्या विचारवंतांना (उदा. प्लेटो, सिडनी, टी. एस. एलियट– ईलियट नव्हे) स्वतंत्र प्रकरणे योजली आहेत. संदर्भ शेवटी एकत्र न देता प्रकरणशः दिले आहेत हे एका दृष्टीने उचित आहे. अवतरणे मूळ इंग्रजी किंवा इंग्रजी भाषांतर या स्वरूपात देताना मराठी अनुवाद, निदान गोषवारा देण्याची काळजी घेतली आहे.

या पुस्तकाचा मला आवडलेला एक विशेष म्हणजे सैद्धांतिक पातळीवरचे विचार प्रत्यक्ष साहित्यकृतींना कसे लागू पडतील हे मराठीच्या विद्यार्थ्यांच्या लक्षात आणून देण्याची विशेष गरज आहे असे ज्या ठिकाणी जाणवले त्या ठिकाणी 'कुमारसंभव', ज्ञानेश्वरीमधले 'पसायदान' अशा प्रसिद्ध कृतींचा उल्लेख केला आहे. प्रसंगी मर्ढेकर, करंदीकर, चेंदवणकर यांच्या कविता उद्धृत करून त्यांची त्या विचारांच्या संदर्भात चर्चा केली आहे. दुसरे म्हणजे जरूर तेथे साहित्यविचाराची तत्त्वज्ञानात बैठक असेल तर तिचा वेळ काढून परिचय करून दिला आहे. थोडक्यात म्हणजे परिचय उरकलेला नाही. जिव्हाळ्याने आणि जिज्ञासा जागृत व्हावी अशा बेताने करून दिलेला आहे.

पारिभाषिक संज्ञा निवडताना सुलभतेबरोबर नेमकेपणाचा विचार जरा साक्षेपाने केला असता तर बरे होते, असे कुठेकुठे वाटते. साहित्यशास्त्र ही संज्ञा प्रचलित असली तरी दिशाभूल करणारी आहे याची जाणीव जर आहे (पान १) तर मग साहित्यमीमांसा ही अधिक अन्वर्थक संज्ञा का नाही निवडली? दीनता (पिटी), आदर्शवाद (जर्मन आयडियलिझम), संदर्भसंज्ञा (टर्म्ज ऑफ रेफरन्स) या संज्ञा अशाच निष्काळजीपणे निवडल्या आहेत. पाश्चात्य विशेषनामांबद्दलही कुठेकुठे दुर्लक्ष झाले आहे– उदाहरणार्थ Oedipus एडिपस ऐवजी Aedipus ईडिपस. मार्क्सवादावरील प्रकरणात ब्रेश्तची अनुपस्थिती खटकली. (पुढच्या आवृत्तीचा योग येवो व हे दोष दूर होवोत ही इच्छा.)

हे पुस्तक वाचल्यावर जिज्ञासू विद्यार्थी आणि साक्षेपी अध्यापक यांचे लक्ष याच लेखकाच्या 'वेस्टर्न अँड इंडियन पोएटिक्स : ए कँपॅरेटिव्ह स्टडी' या प्रकाशित पदवी-प्रबंधाकडे (वितरक निर्भय प्रकाशन, १९८१) वळले तर बरे होईल हाही विचार पुस्तक वाचून खाली ठेवताना मनात आला.

(डॉ. अशोक केळकर, ए-२, परिमल, १२३९ ए आपटे रस्ता, पुणे ४)

(पाश्चात्य साहित्यशास्त्र : सिद्धान्त आणि संकल्पना, डॉ. सुरेश धायगुडे, निर्भय प्रकाशन, पुणे ९. पृष्ठे २४६. ऐंशी रुपये.)










# लोकसंचित : डॉ. तारा भवाळकर

## लोकसाहित्याच्या अभ्यासाची प्राथमिक कल्पना देणारा लेखसंग्रह

डॉ. मीना खाडिलकर

'लोकसंचित' हा लोकसाहित्याभ्यासाच्या काही दिशा स्पष्ट करणारा डॉ. तारा भवाळकर यांचा २० लेखांचा एक साक्षेपी संग्रह! त्यांचे तीन गटांत वर्गीकरण करून त्यांचा परिचय करून देण्याचा प्रयत्न येथे केला आहे. पहिल्या गटातील लेखात ब्रेख्टचा नाट्यविचार, संत नामदेवांच्या अभंगातील लोकतत्त्व, दोन भाषिक टिपणे, जाहिरातीतील यात्वात्मकता, कैलासराणा शिव आणि आदिशक्तीचे जागरण या संशोधनाच्या अंगाने जाणाऱ्या लेखांचा समावेश करता येईल. दुसऱ्या गटात लोककला, लोकनाट्य, लावणी, पोवाडा, आख्यान, शाहिरी पाळणा आणि कीर्तन या लोककलांवरील लेखांचा विचार केला आहे तर तिसऱ्या गटामध्ये मानवी जीवनाशी संबंधित विवाहविधी आणि रक्षाबंधन, नागपंचमी, हादगा, होळी आणि दिवाळी या सणांचा परिचय करून देणारे लेख आहेत.

'लोकसाहित्याच्या अभ्यासाच्या दिशा' ही दीर्घ प्रस्तावना लोकसाहित्याच्या अभ्यासकांना मोलाची ठरेल. लोकतत्त्वीय अभ्यासाच्या सर्वच दिशा स्पष्ट करणारे लेख या संग्रहात नाहीत, ही या संग्रहाची मर्यादाही लेखिकेने नोंदविली आहे.

या संग्रहाचे आकर्षक शीर्षक, सरळ, सहज आणि अतिशय सोपी आणि ललित निबंधाच्या अंगाने जाणारी भाषाशैली, लेखांची शीर्षके पाठकांच्या यात्वात्मकतेला आव्हान देणारी, छपाई या ह्या संग्रहाच्या जमेच्या बाजू आहेत. सारांशं, लोकसाहित्याचा हा अभ्यास विषय एकदम नवीन, बराचसा साहित्य– समाजशास्त्रीय आंतरशाखीय विचारांना प्रवृत्त करणारा एक गहन विषय. तो जनसामान्यांपर्यंत पोहोचविण्याचे काम केल्याबद्दल लेखिकेला धन्यवाद द्यायला हवेत.

'जाहिरातीतील यात्वात्मकता' या लेखात यातुश्रद्धेचा आजच्या वैज्ञानिक युगात जाहिरातीसाठी कल्पक रीतीने उपयोग करून घेण्यात येतो, याकडे लक्ष वेधले आहे. यातुशक्ती ज्या मार्गांनी आणि ज्या साधनांनी माणसाने उपयोगात आणली आणि आपले ईप्सित साध्य करून घेतले, नेमके तेच कार्य त्याच साधनांनी जाहिरात करत असते. फरक इतकाच की, यातुविधी व यातुश्रद्धा हे संस्कृतीच्या आदिपर्वात समूहनेणिवेतून निर्माण झालेले अपत्य, तर जाहिरातयंत्रणा हे १९व्या शतकातील मानस-वैज्ञानिक अध्ययनानंतर जाणीवपूर्वक उपयोगात आणले जाणारे तंत्र आहे. लेखिकेचे हे विधान निश्चितच

वाचकांना यातुविर्धीच्या अभ्यासाला प्रेरित केल्याशिवाय राहणार नाही.

'एक मंत्र एक शिवी' या लेखात शिवीचा सांस्कृतिक विकास स्पष्ट केला आहे. मनुष्य आपला संताप किंवा विरोध कधी सौम्य तर कधी झणझणीत शब्दात प्रकट करतो. हे शेलके शब्द म्हणजे शिवी! शिवी एक परीनं शल्यचिकित्सेचे आणि शल्यक्रियेचे काम करते.

एखाद्या व्यक्तीला अपमानित करण्यासाठी ज्या शिव्यांचा उपयोग केला जातो, त्यामध्ये स्त्री-पुरुषविषयक अनैतिक लैंगिक संबंध, अवैध नाती तसेच मानवतेवर प्राण्यांचाही संकेत असतो. शिवीमुळे अप्रतिष्ठा झाली की, माणूस आपले वर्तन सुधारून आपल्याला अपेक्षित कृती करेल, अशी याच्या मुळाशी भावना असते. तसे पाहिले तर संस्कृतीबरोबरच शिवीचा जन्म होतो. जर संस्कृतीने काही नाती, शब्द, आनुषंगिक भावना पवित्र मानल्या नसत्या तर पावित्र्यभंजनाचा आणि मानखंडनेचा प्रश्नच उद्भवला नसता, म्हणजेच शिवी अस्तित्वातच आली नसती!

'दोन भाषिक टिपणे' हा लेख भाषाशास्त्राशी संबंधित आहे. यांतील पहिले टिपण आहे– 'शाळा मागची सुटेना.' यामध्ये परंपरागत 'शाळा' या अर्थाखेरीज अन्य अनेक संदर्भात 'शाळा' या शब्दाचा होणारा प्रयोग प्रसंगी कसा अडचणीत आणतो, हे दाखविले आहे. 'मायबोलीमधले धक्के आणि हिसके' यामध्ये 'शिस्तीत होणे, खिळे-मोळे, उभारणे, घालणे, दळप, साळुता आणि उकाडा आदी शब्दांचा प्रादेशिक संदर्भातून ललित शैलीत परिचय करून दिला आहे. तामिळनाडूत आढळणारे ज्ञानेश्वरांच्या जमान्यातील मराठी शब्द आणि त्यांचे तामिळ धाटणीचे उच्चार यामुळे आपण बुचकळ्यात पडतो. 'वटँगले, भूप, बिबवा, वराड, श्रम, निर्धार जाऊ', सारख्या शब्दांचे संदर्भ समजल्यानंतर कसा 'उदंड संतोष' होतो आणि त्याच वेळी दोन-तीनशे वर्षांपूर्वीचे शब्द आणि वाक्प्रचार मंडळी दैनंदिन बोलीतही कशी संभाळून आहेत, हे समजल्यावर वाचक आश्चर्यचकित होतो.

शिवशंकर हे भारतातले अतिप्राचीन दैवत! सिंधु संस्कृतीत लिंगपूजा आणि योनिपूजा अस्तित्वात होती. या दैवताचे स्वरूप विविध अंगांनी स्पष्ट करण्यात आले आहे.

शिवाप्रमाणेच भगवती देवी ही सर्व विश्वाचं आदिकारण आहे. हीच महाविद्या, महामाया, पूर्णप्रकृती, विष्णुमाया, चेतनाशक्ती आणि जगत्जननी महामाताही आहे. शक्तीदेवता म्हणून ज्या अर्थी स्त्रीदेवता दीर्घकाळ मानवी मनावर अधिराज्य गाजवीत आहेत, त्या अर्थी यामागे मानवी स्त्रीमधीलच सामर्थ्याचा प्रत्यय एकूण समूहमनात खोलवर रुजला असला पाहिजे. मानवी जीवनातले स्त्रीच्या मातृत्वाचे **महत्त्व** आजही कमी झालेले नसले तरी तिची निर्माणशक्ती मात्र पुरुषप्रधान समाजव्यवस्थेच्या हातातले बाहुले बनली आहे. आपल्या मनावर पिढ्यान् पिढ्या थापलेले अबलत्वाचे रोगण स्त्रियांनीच खरडून काढले पाहिजे, असे प्रतिपादन केले आहे.



अनुक्रमणिका

संत नामदेवांच्याच नव्हे, तर सर्वच संत वाङ्मयाचा प्राचीन आणि मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचा अभ्यास लोकतत्त्वीय अभ्यासाअभावी अपुरा ठरेल, ही जाणीव नव्याने सर्वच अभ्यासकांना होऊ लागली आहे. ह्या जाणिवेतून 'संत नामदेवांच्या अभंगातील लोकतत्त्व' हा लेख साकारला आहे. नामदेवांनी 'कात्यायनी' व्रताच्या कथेत केलेले परिवर्तन, भुता-खेतांचे किंवा वारे संचारणे अशा भ्रामक समजुतींचे निराकरण याखेरीज दैनंदिन जीवनातील काही लोकतत्त्वांची उकल, लोकसमज व लोकाचारांचे वर्णन, जनसामान्यांची रंजन साधने, इतकेच नव्हे, तर खाद्यपदार्थांचे वर्णन तत्कालीन लोकजीवनाचे चित्र स्पष्ट करतात.

या पुस्तकातील लेखांचा दुसरा गट हा लोकनाट्य, लोककला, लावणी, पोवाडा, आख्यान, पाळणा आणि कीर्तन या प्रयोगपरंपरांचा परिचय करून देतो.

धार्मिक बैठकीवर उभा असलेला तमाशा हा प्रकार पारंपरिक धार्मिकता व श्रद्धा यांचे प्रवाह क्षीण झाल्यामुळे लोकनाट्याकडे झुकत असल्याचे लेखिकेने दाखवून दिले आहे. कोकणातील दशावतार, खंडोबाचे जागरण, गोंधळ आणि लोकनाट्ये धार्मिकतेपेक्षा लौकिक जीवनाकडे व मनोरंजनाकडे झुकलेली आढळतात.

'लोककलांची आवाहकता' या लेखामध्ये मराठी नागरी रंगभूमीवर दशावतार, भारूड, जागरण, यक्षगान अशा लोकरंगभूमीवरील घाटांचा उपयोग होऊ लागला ह्याकडेलक्ष वेधले आहे.

'अदाची लावणी आणि नाट्यगीत' या लेखातून लावणीचा उदय, उत्कर्ष आणि अधोगतीची मीमांसा केली आहे. मराठी रंगभूमीचे वैशिष्ट्य म्हणजे शृंगाररस प्रधान नाट्यगीते. ही नाट्यगीते म्हणजे अदाच्या लावणीचाच नवा अवतार असे लेखिकेने दाखविले आहे.

'पवाडा' या शब्दाचा अर्थच मुळी स्तुती, स्तवन, कीर्तिकाव्य किंवा यशोगीत! कन्नडमधून मराठीत आलेला प्रकार! आज परंपरागत वीररसाच्या पोवाड्यांचा काळ संपला असला तरी गोंधळींच्या रूपाने त्यांचे अस्तित्व टिकून आहे. 'सत्यवान सावित्री' या शाहीर बापूराव विभुते यांच्या शाहीरी पाळणा– आख्यानाचा परिचयही दिला आहे.

'कीर्तन : एक लोकविद्यापीठ' असल्याचे स्पष्ट करून वारकरी संप्रदायाच्या उदयापासून अखंडपणे चालू असलेल्या या परंपरेची वैशिष्ट्ये दाखवली आहेत. नारदीय कीर्तन आणि वारकरी कीर्तन, सोंगी कीर्तन आणि गोंधळी कीर्तन या प्रकारातील बारकावे उलगडून दाखवले आहेत.

समाजसातत्य ज्या धार्मिक विधीवर आधारित आहे, असा मानवी जीवनातील सर्वांत महत्त्वाचा मानला जाणारा विधी म्हणजे विवाह विधी! बालकवींची 'फुलराणी' आणि 'लग्न' शीर्षकांतर्गत लिहिलेल्या भटक्यांमधील विवाह पद्धती यांच्या अनुषंगाने विवाहविधीचा सांगोपांग विचार केला आहे. मानवी जीवनातल्या या लौकिक

सोहळयाचा अलौकिकत्वाशी संबंध जोडण्याचा प्रयत्न विवाहविधीचे पावित्र्य राखण्याच्या कल्पनेतून झालेला असावा.

विवाहविधींशी संबंधित दुसरा लेख– 'शुभमंगल'– यामध्ये मातुलगृह– परिणय– प्रथेचे स्पष्टीकरण देऊन विवाहविधीतील कळसवणी, देवक, बोहले, वेदी, होमकुंड, लाजाहोम, मधुपर्क, सीमांतपूजन, आजेचीर, रुखवत, घाणा, सौभाग्यालंकार, अंतरपाट, मंगलाष्टके, नाच-गाणी, वाजंत्री– इतकेच नव्हे, तर विवाहविच्छेद आणि पुनर्विवाहाच्या पद्धतीचाही विचार सांगोपांग करण्यात आलेला आहे. हा सर्वच भाग उद्बोधक आहे.

रक्षाबंधन, नागपंचमी आणि हादगा हे खास स्त्रियांचे सण! रक्षाबंधनाच्या सणामध्ये भाऊ-बहिणीचे पवित्र नाते सूचित होत असले तरी आदिकालात ते तसे नव्हते. म्हणूनच लेखाचे शीर्षक आहे– 'सांस्कृतिक प्रवास : एका नात्याचा!' आदिम काळापासून या नातेसंबंधाचे विश्लेषण करणारा हा लेख मुळातूनच वाचायला हवा.

'नागबंध' आणि 'आली आली ग पंचमी' या दोन लेखांतून क्रमशः विश्वामध्ये कोणत्या ना कोणत्या रूपात रूढ असलेली नागपूजा आणि नागपंचमीच्या सणांशी निगडीत असलेले माहेरवाशिणीचे भावविश्व लोकगीतांच्या माध्यमातून हळुवार उलगडून दाखविले आहे.

लोकसंचितातील परंपरांचा लेखिकेने घेतलेला हा आढावा एकीकडे सामान्य वाचकांना लोकपरंपरांचा परिचय करून देतो, तर दुसरीकडे आपल्या प्राचीन परंपरांचे भान जागे करतो. लोकसाहित्याचा अभ्यास हा दुहेरी मोलाचा ठरतो.

(डॉ. मीना खाडिलकर, १७२, शिवाजीनगर, सांगली– ४१६४१६)

(लोकसंचित : डॉ. तारा भवाळकर. राजहंस प्रकाशन, पुणे ३०. पृष्ठे २००. ऐंशी रुपये)

---

*** पहाटेपूर्वीचा काळोख**– कमलेश, रश्मी प्रका., १९१ शुक्रवार पेठ, पुणे-२, १-१९९०, किंमत-६०/-, पाने-१५१.

*** पुढचं पाऊल**– व्यंकटेश माडगूळकर, साकेत प्रका. ११५, म. गांधीनगर, स्टेशनरोड, औरंगाबाद, ५, ३-१९८९, किंमत-५५/-, पाने-१४८.

*** आधार**– श्यामकांत कुलकर्णी, अभिजित प्रका., ३०ब गणेश पौर्णिमा, पांडे ले आऊट, खामला नागपूर-२५, १-१९८९, किंमत-२२/-, पाने-८४.

*** दत्तकपुत्र**– सुरेश शंकर बल्लाळ, अभिजित प्रका., ३०ब, गणेश पौर्णिमा, पांडे ले आऊट, खामला नागपूर-२५, १-१९८९, किंमत-४०, पाने १८०.

*** फोबिया**– प्रा. विश्वास वसेकर, नवल पब्लि. ३९ अत्रे नगर, सेलू ४३१५०३, जि. परभणी, १-१९८९, किंमत ३०/-, पाने ७२.

*** वणवा**– रंगा मराठे, श्रीविद्या प्रका. २५० शनिवार पुणे ३०, १-१९९०, किंमत-३०/-, पाने-९२.

# स्फुट परामर्श

## वणवा, सौंदर्यलहरी, जवाहरलाल नेहरू विचारधारा, विश्वगांधार, वाङ्मय विमर्श, मराठी गौळण या पुस्तकांचा परिचय

शंकर सारडा

# वणवा : रंगा मराठे

## हवे ते मिळवण्याची जिद्द नसणाऱ्या जोडप्याची घुसमट

'वणवा' ही रंगा मराठे यांची कादंबरिका. पहिलीच. दिवाळी अंकासाठी लिहिलेली. आता पुस्तक रूपात आलेली. माधव आणि रेवती यांच्या वैवाहिक जीवनाची शोकांतिका. हे नवदांपत्य महाबळेश्वर ला हनीमूनला जाते. नंतर मुंबईत संसार सुरू. पहिलं वर्ष फुलांच्या गालिच्यावरून चालल्यासारखं छान जातं. नंतर माधवची नोकरी सुटते. सी. ए. च्या शेवटच्या टर्म्स भरायची टाळाटाळ तो करतो. दुसरी नोकरी मिळते, पण कमी पगाराची. तीही जाते. तिसरी नोकरी आणखीनच कमी पगाराची. तशात एका मुलीचा जन्म. घरची ओढाताण. माधवचे धूम्रपान, मद्यपान व मित्रांवरोबर कॉफी हाऊसमधे चकाट्या पिटणे यामुळे घरात वादावादीला आरंभ होतो. रेवती एम. ए., बी. टी. असते. लग्नाआधी शिक्षिका म्हणून नोकरीही करीत असते. तेव्हा ती पुन्हा शाळेत काम करू लागते.

रेवतीच्या स्वप्नातला आदर्श पुरुष माधव होऊ शकत नाही. कोणी एक पुरुषोत्तम असतो. नवथर वयात भेटलेला पण पुढे परागंदा झालेला. माधवच्या मद्यपानामुळे रेवती रुष्ट असते. त्याला ती जवळ येण्यास मज्जाव करते. "तुम्हाला राहवत नसेल तर वेश्येकडे जा. मी पैसे देईन" असेही सुनावते.

नोकरीत माधवचे कामाकडे लक्ष नसते. फिनॅन्शियल ॲडव्हायजरचा हुद्दा असूनही कामे वेळेवर न झाल्याने बोलणी खावी लागतात. नोकरीही जाते. आपली स्थिती 'ओल्ड मॅन अँड दि सी' मधल्या म्हाताऱ्या कोळ्यासारखी झाल्याची जाणीव होते. समुद्राशी व प्रचंड देवमाशाशी सामना देऊनही हाती काहीच लागले नाही; हा विचार खंतावणारा ठरतो. कधी

त्या गोष्टीतला मासा आपण आहोत असे वाटते. 'आय ॲम नॉट फिट टु बी आयडियल हजबंड' ही जाणीव जाचू लागते. मस्कतला जाऊन नोकरी बघावी असा विचार मनात येतो. रेवती म्हणते, "तुम्ही गेलात तर हो जागा माझ्या नावावर करून जा." पण मस्कतच्या नोकरीचे जमत नाही. रेवती भोपाळला आपल्या बहिणीकडे सुटीसाठी जाते. माधव आईला आपल्या धाकट्या भावाकडे सोडून कंपनीच्या कामासाठी नाशिकला जातो. ते काम न जमल्याने नोकरीला मुकतो. घरी आल्यावर हृदयविकाराच्या झटक्याने कोसळतो आणि मरण पावतो.

माधवच्या मृत्यूनंतर त्याचे धार्मिक विधी करण्याबाबत त्याचा भाऊ विसू चालढकल करू पाहतो तेव्हा रेवती 'मी हे विधी करणार' म्हणते. लाजेखातर विसूभाऊ ते विधी करतो. खर्च रेवतीचा.

तिचे सांत्वन करायला माधवचे मित्र प्रधान येतात; शेखर गम्रखे येतो. तिचा एकेकाळचा विद्यार्थी विलास हा देखील तिच्यात गुंतलेला असतो. परंतु त्यांपैकी कोणालाही तिच्याशी मोकळेपणाने बोलता येत नाही. नोकरी सोडून आपल्या लहानपणच्या अलिबागला जावे, आजोळी जावे, मामाच्या शेतीवर जावे असे बेत ती घोळवते. पण लहानपणी मामाच्या शेतावर गेले असताना लागलेल्या वणव्याची आठवण येऊन ती शहारते. बदामाच्या झाडाला वणवा लागलाय आणि त्यावरचे पोपट होरपळून पटापट खाली पडताहेत असा भ्रम तिला होतो.

माधव व रेवती यांच्यातील संबंधाची ही परवड– त्यातून माधवच्या धरसोड वृत्तीमुळे त्याला आलेले वैफल्य व त्यातून वाढीला लागलेले व्यसन; त्याला समजावून घेण्याऐवजी नोकरीमुळे आलेल्या आत्मविश्वासाच्या बळावर स्वतःचे स्वतंत्र अस्तित्व टिकवणारी रेवती; शिक्षकी पेशा आणि मुलगी यात तिने शोधलेले साफल्य; पूर्वाश्रमींच्या प्रियकरात देखलेली परिपूर्णता पुन्हा न लाभल्याने एकूणच पुरुष सहवासाबद्दल असणारी द्विधा मनोवृत्ती; विलाससारख्या तरुणाच्या सहवासात रमण्यातील सुरक्षितता आणि आपल्या नवऱ्याच्या मित्रांबाबत असणारी साशंकता वेळोवेळी प्रकट होते. लग्नाच्या वेळच्या शेखरच्या हस्तांदोलनाच्या स्पर्शातील उबग आणणारी वासनात्मकता, माधवच्या मृत्यूनंतरही शेखरने तिच्याशी जवळीक साधण्याचा केलेला प्रयत्न– या सर्वांतून तिच्या मनाची घालमेल प्रकट होते. रेवती, विलास, शेखर सर्वच जणांना परस्परसहवास हवा आहे; परंतु तो मिळवण्यासाठी लागणारा आक्रमकपणा वा धीटपणा त्यांच्यात नाही. सारेच भुकेलेले; पण तृप्तीपासून दूर. सारेच वणव्यात सापडलेले.

एकूणच ही कादंबरी असमाधानाचा सूर आळवत राहते; आणि या कहाणीला उद्देशहीन बनवते. रेवतीच्या व्यक्तिरेखेद्वारे लेखक काय उभे करू पाहतो? नवरा दारू पितो म्हणून त्याला ती दूर लोटते; आणि तोही तगमगत अवघे आयुष्य तसाच न्यूनगंडात काढत राहतो. फक्त एकाच मित्राजवळ तो आपल्या पोखरलेल्या संसाराबद्दल मृत्यूपूर्वी मोकळेपणाने

बोलतो आणि त्यानंतर तो पार रिता रिकामा होऊन जातो. त्याच्या मृत्यूने रेवतीच्या त्याच्याबद्दलच्या भावनेत काही फरक पडतो असेही नाही. आपली उपासमार लोकापवादाला घाबरून ती तशीच जारी ठेवते. तिच्या स्वप्नातला तो सुंदर निळा बंद दरवाजा कधी उघडतच नाही. त्यामागचा पुरुषोत्तम तिला भेटतच नाही. एखाद्या कथेएवढाच जीव असणारा हा विषय. तो नको त्या तपशिलांनी अवजड करून टाकल्याने आपला नेमकेपणा गमावून बसला आहे.

(शंकर सारडा, प्राकृती प्रिंटर्स, ८५७ शनिवार पेठ, सातारा, ४१५००२)
(वणवा : रंगा मराठे, श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०. पृष्ठे ९२. तीस रुपये.)

# जवाहरलाल नेहरू विचारधारा : भुस्कुटे

## निवडक भाषणांच्या आधारे घेतलेला वेध

वि. वि. भुस्कुटे

'जवाहरलाल नेहरूः विचारधारा' हे नेहरूंच्या विविध विषयांवरील ५२ उताऱ्यांचे संकलन आहे. सी. आर. नेरूरकर यांचे काही वर्षांपूर्वी 'व्हॉइस ऑफ जवाहरलाल नेहरू' हे संकलन महाराष्ट्र प्रगती मंडळ या संस्थेने प्रसिद्ध केलेले होते. त्याचे भाषांतर नेहरू जन्मशताब्दीच्या निमित्ताने सुप्रसिद्ध कार्यकर्ते वि. वि. भुस्कुटे यांनी करून मराठी वाचकांपुढे नेहरूंच्या प्रचंड वैचारिक खजिन्यातील काही विचाररत्ने ठेवण्याचे पुण्य संपादन केले आहे. भारताला समाजवादी दिशा देऊन, योजनाबद्ध आर्थिक विकासाद्वारे एक महासत्ता बनवण्याच्या दिशेने नेहरूंनी आरंभापासूनच दमदार पावले टाकली. फाळणीच्या यातना, आपल्यापुढील कार्य, नियतीचा संकेत, अधिक उत्पादनाची गरज, औद्योगिक शांततेचे महत्त्व, काश्मीरचे विलीनीकरण, अलिप्ततेचे धोरण, विश्वविद्यालयाचे कार्य, सार्वत्रिक निवडणुका, विज्ञाननिष्ठा, स्वातंत्र्य, इंग्रजी भाषेचे स्थान, प्रशासन यंत्रणा आणि नेहरूंचे मृत्युपत्र अशा अनेक विषयांवरील नेहरूंच्या विचारांचे संकलन या पुस्तकात आले आहे. बहुतांश उतारे त्यांच्या भाषणांतून घेतलेले आहेत.

"खरे स्वातंत्र्य हे केवळ राजकीय स्वातंत्र्य नसते, तर ते आर्थिक आणि आत्मिकही असते. ते प्राप्त झाले तरच मानवाचा विकास होईल व तो आपले नियतीने ठरवून दिलेले कार्य पूर्ण करू शकेल. हे स्वातंत्र्य म्हणजे केवळ परस्परांशी लढणाऱ्या राष्ट्रांमध्ये परिणत होणारे समुदायांचे स्वातंत्र्य नव्हे, तर स्वतंत्र आणि सुव्यवस्थित जगाच्या संदर्भातील स्वतंत्र राष्ट्रीय समुदायांमधील व्यक्तिगत स्वातंत्र्य असले पाहिजे. आशिया, युरोप आणि

अमेरिका यांच्या समस्यांकडे यापुढे अलगपणे पाहता येणार नाही. एकाच जागतिक समस्येचे ते भाग आहेत." कॅलिफोर्निया विद्यापीठात १९४९ साली दिलेल्या व्याख्यानातील हा इशारा नेहरूंच्या द्रष्टेपणाची कल्पना देतो.

भाषांतर वृत्तपत्रीय वळणाचे आहे. भाषेचे लालित्य त्यात विशेष नाही. इंग्रजी वाक्यरचनेचा प्रभावही भाषांतरात आढळतो. चिकित्सकता आणि भावनाशीलता यांपैकी कुठल्याही अंतिम टोकापर्यंत जाण्याच्या आतच नेहरू आपले भाषण वा लेखन थांबवतात. त्यांच्या भाषणात प्रकट चिंतनाचा सूर दिसतो; पण कुठल्याही एका विचाराचा तर्कशुद्ध पाठपुरावा करून, विशिष्ट निष्कर्षापर्यंत जाण्याचे ते टाळतात. त्याचप्रमाणे एखाद्या विशिष्ट मताशी स्वतःला ते भावनात्मक पातळीवर झोकून देण्याचेही टाळतात. विचार व भावना यातला हा सुवर्णमध्यही म्हणता येणार नाही. त्यामुळे त्यांच्या भाषणात अधूनमधून काव्यात्मकता आढळते. तद्वतच अनुभवचिंतनाधिष्ठित समस्यांची वास्तव जटिलताही आढळते. या विचारधारेतही हा दुहेरी प्रवाह आपल्याला भेटेल.

(पं. जवाहरलाल नेहरू : विचारधारा. अनुवाद- वि. वि. भुस्कुटे, नृसिंह प्रकाशन, ५ मातृपितृ गुरुकृपा, कोपरगाव. डोंबिवली (प.) पृष्ठे १५६. तीस रुपये.)

# सौंदर्यलहरी : सौ. कमल बापट

## हौस म्हणून केलेला अनुवाद

शंकराचार्यांनी रचलेल्या स्तोत्रांमध्ये सौंदर्यलहरी या १०० श्लोकांच्या भगवती आदि शक्तीच्या– त्रिपुरसुंदरीच्या स्तवनाचे महत्त्व आगळेच आहे. तंत्र-मंत्र-यंत्र व योग या शक्तीच्या उपासनेशी पहिले ४१ श्लोक संबंधित आहेत; तर त्रिपुरसुंदरीच्या सगुण स्वरूपाचे वर्णन करणारे उर्वरित श्लोक (४२ ते ९९) आहेत. सौ. कमल बापट यांनी रोज एकेक श्लोक घेऊन त्याचा मराठी पद्यानुवाद १९८५ मध्ये केला. त्याचे पुनःपुन्हा संस्करण केले. सान्तःसुखाय केलेल्या या उपक्रमाचे सार्थक अर्थात पुस्तक प्रकाशनाशिवाय कसे होणार? मूळ सौंदर्याला अलंकृत करण्याचे कार्य मनाच्या विशिष्ट अवस्थेत व सत्पुरुषांच्या कृपाशीर्वादाने घडले असे निदर्शनास आले, असे करवीर पीठाच्या शंकराचार्यांचे प्रशस्तिपत्र त्याला लाभले.

या भावानुवादाचे सौंदर्य व सहजपण अजमावण्यासाठी एक श्लोक उदाहरणादाखल देतो. अनुवाद शिखरिणी वृत्तात असून, जरूर तेव्हा कल्पनाविस्तार करताना गीतिवृत्त वापरले आहे. ६८व्या श्लोकाचा भावानुवाद ८ ओळींमध्ये केला आहे.



अनुक्रमणिका

भुजाश्लेषांन्नित्यं पुरदमयितुः कण्टकवती
तव ग्रीवा धत्ते मुखकमलनालश्रियमियम्
स्वतः श्वेता कालागुरु-बहुल-जम्बाल-मलिना
मृणाली-लालित्यं वहति यदधो हारलतिका ।।६८।।
मिठी दो बाहूंची नित तव गळ्याला पडतसे
शिवाच्या स्पर्शाने सकल तनु रोमांचित असे
जणू भासे ग्रीवा वदनकमला देठ बरवे
वरी रोमांचाचे खुलुन दिसती कंटक नवे ।।१२६।।
सुचारू मोत्यांचे धवलसर कंठी झळकती
दिसे भारी लेपे अगरुवटिच्या धूसर किती
गळ्याखाली शोभे कमलिनिपरी सुंदर अती
'तुझी भक्ती वाढो नित मम मनी हीच विनंती' ।।१२७।।

ही वामन पंडित थाटाची धिटाई रसिकजनांनी गोड करून घ्यावी अशी विनवणी सौ. बापट करतात. त्यांचे कौतुक करायला हवे.

(सौंदर्यलहरी : सौ. कमल बापट. सराफ चेंबर्स, माउंट रोड, नागपूर १. पृष्ठे ३२ + ७८. वीस रुपये.)

# विश्वगांधार : शिवेन्द्र कंदाहारी

## व्यवहारी जगात सुख मिळवण्यासाठी काही ठोकताळे

विश्वगांधार लेखक शिवेन्द्र कन्दाहारी असे म्हटल्याबरोबर हे एखादे अध्यात्म्यावरचे किंवा संगीतावरचे पुस्तक असावे असा प्रथमदर्शनी ग्रह होतो. परंतु 'जगात वागावे कसे' याबद्दल काही सूचना देणारे आणि त्या स्पष्ट करण्यासाठी बोधकथांची रेलचेल असलेले हे एक संकलन आहे. आणि त्याला वजन यावे म्हणून लेखकाने आपल्या गुरूंशी जवळचे टोपण नाव घेतले आहे. गहनगूढ काही रहस्य उलगडून दाखवण्याचा आव आणणारे आणि कोणा प. पू. बाबाजी महाअवतार कंदाहारी महाराज यांच्या सत्संगातून प्राप्त झालेले अमर शब्द, आम्ही केवळ निमित्तमात्र याच भावनेने सादर करणारे हे पुस्तक क्षणात गंभीर आणि क्षणात हास्यास्पद असे झोके घेत राहते आणि वाचकांना धक्के देत राहते.

प्रत्येकजण सुखाची अपेक्षा धरतो व या जगातील लहान-मोठ्या घटनांचे नियंत्रण



अनुक्रमणिका






करणारी महाशक्ती आपल्याला सुख देण्यापूर्वी शेकडो बाबींचा सूक्ष्म विचार करून त्याचे प्रमाण व स्वरूप ठरवते, या शक्तीचे आकलन करणे हे मानवी शक्तीच्या आवाक्यापलीकडचे आहे असे प्रास्ताविकात प्रतिपादन करून, अतर्क्य घटनांची उदाहरणे दिली आहेत. काही महापुरुषांना भविष्यकाळातील घटनांचा अचूक अंदाज करण्याची अद्भुत क्षमता लाभलेली दिसते. त्यांची वाणी हा दिव्य शब्द असतो असेही ते म्हणतात. 'संभ्रमा'मुळे मात्र सर्वांची फसगत होते, अशा इशाराही ते देतात.

कंदाहारी महाराजांशी लेखकाची चर्चा होते. रक्तदाब मोजण्यासाठी जसे यंत्र असते तसे माणसातील सज्जनता, दुर्जनता वगैरे मोजण्यासाठीही शास्त्रीय मोजपट्टी असते असे त्या वेळी सांगण्यात येते. या पुस्तकात चार श्रेणींमध्ये मानवाचे वर्गीकरण करणारा तक्ता पृष्ठ ५७ वर दिला आहे, मानवता व सामर्थ्य असणारे लोक (प्रथम श्रेणी– निर्देशांक ८१ ते १००), मानवता नसलेले पण सामर्थ्य असणारे लोक (द्वितीय श्रेणी– निर्देशांक ६१ ते ८०), मानवता असलेले पण सामर्थ्यहीन लोक (तिसरी श्रेणी– निर्देशांक १ ते ६०) व मानवता व सामर्थ्य दोन्ही नसलेले लोक (चवथी श्रेणी– निर्देशांक उणे १०० ते १) असे हे वर्गीकरण आहे. या चार वर्गीकरणांतही पुन्हा मानवतेचे प्रकटीकरण करण्याचा स्वच्छ वा विक्षिप्त मार्ग, भावनाशीलता किंवा बुद्धिप्रवणता या निकषांवर १३ पोटभाग पाडले आहेत. त्या प्रत्येकाची वैशिष्ट्ये डझनावारी उदाहरणे व दृष्टान्त देऊन उलगडून दाखवली आहेत. या उदाहरणांमध्ये काही हास्यास्पद व लेखकाच्या तर्कशक्तीची अचाट उड्डाणे दाखवणारीही आहेत. चित्रपटातील संवाद, रामदास, चार्ल्स शोभराज, येशू ख्रिस्त, शॉ, लोकमान्य, कुंभकर्ण– हे सारे एकापुढे एक सुखेनैव येतात आणि लेखक त्याद्वारे मुद्दे स्पष्ट करतो. मानवांच्या श्रेणीची तपासणी व आत्मसंशोधन या चौथ्या प्रकरणात तत्त्व, संपत्ती व सुख या तीन गोष्टींवर सर्व जीवन आधारलेले आहे; जीवनाच्या दर्जानुसार या तीन घटकांचे प्रमाण वेगवेगळे आढळते असा विचार मांडला आहे. त्याच्या स्पष्टीकरणासाठी भरपूर किस्से, कथा, दंतकथा व थोरामोठ्यांची वचने दिली आहेत.

पाचव्या प्रकरणात काही जीवनविषयक सूत्रे देण्यात आली आहेत. महापुरुषांचा सहवास म्हणजे प्रगतीच्या दिशेने हनुमानउडी होय, जीवनात तारतम्याला प्रमाणाला महत्त्व असते, सत्य हे प्रस्थापित करावे लागते, ग्लॅमर ठेवून वागावे व लोकांत कमीत कमी दिसावे, निरनिराळ्या व्यक्तींच्या दृष्टीने एकाच गोष्टीचे मूल्य कसे बदलते ते जाणून घ्यावे, शंभरापैकी एक्कावन्न गुण मिळवणारा जिंकतो व ४९ गुण मिळवणारा पराभूत होतो– यातले अंतर फार कमी असते हे लक्षात ठेवून यशासाठी शर्थ करावी, जीवनातील बहुसंख्य मानसिक तणाव स्वनिर्मित आणि काल्पनिक असतात, आपल्या कर्तृत्वाचा परीघ वाढवता येत नाही. पण त्याची खोली वाढवून कमाल यश मिळवता येते, अशी ही सूत्रे असून, ती प्रेरक ठरतील.

सहाव्या प्रकरणाला अध्यात्मविवेचन नाव दिले असून, नामजप, ईश्वरावर श्रद्धा,

ईश्वरी कृपेचे स्वरूप, गुरूची आवश्यकता, तीर्थयात्रा, सद्‌ग्रंथवाचन, आध्यात्मिक साधना, वासनांचे संयमन, दैनंदिन जीवनात आध्यात्मिक साधना, मानसिक शांती, क्रियायोग, सत्पुरुष संगती, संरक्षक कवच इत्यादी बाबींचे त्यात विवेचन केले आहे. आय ॲम ओके– यू आर ओके या ट्रँझॅक्शनल ॲनॅलिसिसमध्ये व्यक्तींचे प्रौढ, तरुण व बाल असे वर्गीकरण केले जाते. इतरांशी कसे वागावे याचे त्यावरून मार्गदर्शन होते. येथे पारंपरिक प्रथांचा पुरस्कार आहे.

'या जगात सुखी कसे व्हावे' अशासारखे नावही या पुस्तकाला शोभून दिसले असते. माणसांचे वर्गीकरण भावनाशील, बुद्धिप्रवण व सामर्थ्यशाली या अंगाने करून, त्याचे सज्जनपण वा दुर्जनपण– दोन्हींचा उपयोग असतो, याकडे लक्ष वेधण्यात हे पुस्तक यशस्वी ठरते. सामर्थ्य हे संपत्ती व सत्ता यांनीच लाभते असे नाही; विद्या, कलाप्रावीण्य, अध्यात्मसाधना, सौंदर्य, साहित्यनिर्मिती, वृत्तपत्रीय लेखन, क्रीडानैपुण्य, माहितीचे संकलन, संघटना, बौद्धिक झेप, मानवता, यांतही असते असे लेखकाचे प्रतिपादन आहे. व्यवहार आणि आदर्श यांची सांगड घालून सुख-समृद्धी लाभते; पण त्यातही डावे-उजवे असते याची जाणीव करून देणारे हे बोधामृत इहपरलोकी कल्याणकारक ठरेल; आणि आपल्याला दिव्यत्वाचा स्पर्श होईल अशी लेखकाची खात्री आहे. तेव्हा भाविकांनी जरूर त्याचा लाभ घ्यावा असे म्हणायलाच हवे, नाही का?

(विश्वगांधार. शिवेन्द्र कंदाहारी, माधव हरी सन्त, ३८१ शनिवार, पाध्ये वाडा, पुणे ३०. पृष्ठे २७२. साठ रुपये.)

---

# वाङ्मय विमर्श : रा. श्री. जोग

## अभिरुचिसंपन्न संयत मतप्रदर्शन

---

प्रा. रा. श्री. जोग यांच्या १२व्या पुण्यतिथीच्या निमित्ताने वाङ्मय विमर्श हा २३६ पृष्ठांचा लेखसंग्रह प्रसिद्ध करून, व्हीनस प्रकाशनचे संचालक श्री. स. कृ. पाध्ये यांनी एक प्रकारे आपले मित्रऋण फेडले आहे. प्रा. श्री. के. क्षीरसागर आणि प्रा. रा. श्री. जोग यांनी १९३५ ते ६० या काळात मराठी विद्यार्थ्यांची एक अभिरुचिसंपन्न पिढी घडवली. प्रा. जोगांच्या शांत-संयत आणि अभिजात शालीनतेने, अभिरुचीबद्दलच्या चोखंदळपणाने विद्यार्थी विवेकशील होत; वाङ्मयाकडे एक जीवननिष्ठा म्हणून पाहण्यास प्रवृत्त होत.

पुस्तक रूपात प्रसिद्ध न झालेल्या प्रा. जोग यांच्या २३ लेखांचा या पुस्तकात समावेश केला गेला आहे. रससिद्धान्त, ध्वनिसिद्धान्त, साहित्य म्हणजे काय व साहित्य

समीक्षण या चार लेखांचा साहित्यशास्त्र हा विभाग तत्त्वचर्चात्मक आहे. त्या अनुषंगाने काव्यालोचन, रसविमर्श, मराठीचे साहित्यशास्त्र वगैरे आठ पुस्तकांचे केलेले समालोचन दुसऱ्या विभागात आले आहे. चिद्‌घोष, अजगर, विशाखा इ. पुस्तकांवरही त्यांनी लिहिले आहे. मराठी वर्णमालेतील आनुपूर्वी, मराठी शब्दांचा कोश, शब्दवेध, भाषावार प्रांतरचना या विषयीचे लेखही त्यांची वैचारिक भूमिका स्पष्ट करणारे आहेत. प्रा. जोग यांच्या १९६४ नंतरच्या लेखनाची सूची देऊन तिलाही परिपूर्णता आणली आहे.

या लेखांमधून व्यक्त होणाऱ्या मतांचा परामर्श घेण्याचा प्रयत्न करायचा असेल तर स्वतंत्र लेखच लिहावा लागेल. त्यांच्या एकूण मतप्रणालीपेक्षा वेगळे असे या संग्रहात काही नाही. आपली मते ते रोखठोक पण अत्यंत सौजन्याने मांडत. चिं. त्र्यं. खानोलकर यांच्या 'अजगर'बद्दल ते लिहितात : 'अनीतीची अत्यंत खोल अशी पायरी गाठणे यातूनच माणसाच्या उद्धाराचा मार्ग जातो असे एक तत्त्वज्ञान आहे; बीभत्साची पराकोटी गाठली की त्याच्या उलट असणाऱ्या सौंदर्याकडे आपण जाऊ शकतो अशी विचारसरणी या लेखनामागे असावी...लेखकाने हे सारे कलात्मक अलिप्ततेने केले असेल, पण ही कलात्मक अलिप्तता सांभाळून वाचकाला ते वाचणे शक्य होईल असे वाटत नाही. निदान मला तरी ते शक्य झाले नाही." (पृष्ठ १५९)

प्रा. जोग यांच्या उर्वरित अप्रकाशित साहित्याचाही संग्रह निघायला हवा. मराठी समीक्षेत प्रा. जोग यांचे स्थान मोठे आहे. त्यांचे सर्व लेखन उपलब्ध असणे, त्याचा साकल्याने अभ्यास होणे हे मराठी वाङ्मयविषयक अभिरुचीला जागरूक ठेवण्यासाठी योग्य दिशा दाखवणारे ठरेल. जोगांचा धाक हा बहकणाऱ्यांना वठणीवर आणण्यास सदैवच पथ्यकर राहील.

(वाङ्मय विमर्श : संपादक. डॉ. द. न. गोखले, दत्तात्रय पुंडे, जयंत वष्ट. व्हीनस प्रकाशन, ३८१ क शनिवार पेठ, पुणे ३०. पृष्ठे २३६. ऐंशी रुपये.)

# मराठी गौळण : वसंत जोशी

## एका वाङ्मयप्रकाराचे सर्वांगीण विवेचन

डॉ. वसंत स. जोशी यांचे नाव महानुभाव, संत एकनाथ, मुक्तेश्वर वगैरेंचे अभ्यासक आणि संशोधनपर लेखसंग्रहाचे संपादक म्हणून महाविद्यालयीन क्षेत्रात ख्यातनाम आहे. मराठी संतकवींच्या आणि शाहिरांच्या गौळणींचा विषय बरीच वर्षे त्यांच्या डोक्यात घोळत होता; त्या मंथनातून बाहेर पडलेले 'मराठी गौळण' हे पुस्तक या लोकप्रिय पण

उपेक्षित साहित्यप्रकाराकडे पाहण्याची एक नवी आदराची दृष्टी देईल यात शंका नाही.

बावन्न पृष्ठांच्या पूर्वार्धात राधाकृष्ण भक्तीचा विस्ताराने मागोवा घेऊन, राधेच्या आध्यात्मिक, धार्मिक आणि वैज्ञानिक स्वरूपावर डॉ. जोशी यांनी प्रकाश टाकला आहे. तसेच ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम, निळोबा, पंडितकवी, संत कवयित्री, शाहीर कवी यांनी लिहिलेल्या गौळणींचा आढावाही सादर केला आहे. नाट्यात्मक व श्रोतृसापेक्ष ही विशेषणे भारूड, लावणी या साहित्य प्रकारांप्रमाणेच गौळणीलाही लागू पडतात. तथापि भजन-कीर्तनाशी गौळणींचा सांधा अधिक जुळला. राधा-कृष्णाच्या माध्यमातून कवि-कवयित्रींना आपल्या लौकिक प्रेमभावनेचा आणि वात्सल्य-शृंगाराचा आविष्कार करण्यासाठी गौळणी हे सोयीस्कर साधन ठरले; मात्र उत्तरेकडील मधुराभक्तीतील आपल्यातच राधारूप पाहणारा आत्यंतिक– काहीसा मनोविकृतीच्या पातळीवरचा– अध्यात्मप्रधान शृंगार मराठीला कधीच रुचला नाही याकडे डॉ. जोशी लक्ष वेधतात.

गोपालिनी-गवळण-गौळण अशी व्युत्पत्ती देऊन, गाथासप्तशती व गीतगोविंद यांमुळे मराठीतील गौळणींना प्रेरणा मिळाली असावी असा अंदाज ते प्रकट करतात.

राधेचा उल्लेख भागवतात नाही; मात्र कृष्णचरित्रात गोपीकृष्णलीलांची वर्णने येतात. राधा लोकमानसात रूढ झाली ती इ. स. १४४० च्या सुमारास आणि तिच्या मान्यतेचे श्रेय निंबार्कस्वामींकडे जाते. रा म्हणजे प्राप्त करणे व धा म्हणजे निर्वाण; यावरून राधा हे उपासक-उपास्य यांच्यातील एकात्मतेचे प्रतीक बनते. त्यामुळेच भगवंताची राधा ही प्रकृती आहे किंवा राधाकृष्णात अभिन्नता आहे असे मानले गेले. राधेची संकल्पना नक्षत्र-ज्योतिषशास्त्र दृष्ट्याही उलगडून दाखवता येते, हे देखील दाखवण्यात आले आहे.

मराठी गौळणीचे उगमस्थान भागवतपुराण हे आहे; त्यातील गोपीगीत व भ्रमरगीत यांचा गौळणींना आधार आहे. ज्ञानेश्वरांची गौळण हरी सोयरा व्हावा म्हणून साजशृंगार करून कृष्णाजवळ जाते; 'पूर्वपुण्य फळले, देहमुक्त झाले' असा अनुभव घेते. 'पैल तो गे काऊ कोकताहे'मधील विरहिणीची वेदनाही ती प्रकट करते. नामदेवांची विरहिणी 'तो कोण त्याची भेट घडवा' अशी काकुळतीला येते; तर नाथांच्या गौळणी कधी गाऱ्हाणी गातात, कधी विरहिणी बनून झुरतात; तर कधी कृष्णरूपाच्या चिंतनात दंग होऊन देहभान हरतात. आकर्षक, नादमधुर, लयबद्ध मुखड्याने नाथांच्या गौळणी एकदम तोंडात बसतात. (वारियाने कुंडल हाले) 'बाळो जन मज म्हणोत शिंदळी । परी हा वनमाळी न विसंबे' असे परखड आत्मप्रतीतीने रोखठोक बोलणारी तुकारामांची गौळण 'हरिरत' आहे. निळोबांची गौळण कृष्णाच्या परब्रह्म स्वरूपाच्या सुघड दर्शनात रममाण होते. हरीची भूषणे निजांगी लेवून सुखी सुखरूप भोग घेत राहते.

तुकारामशिष्या बहिणाबाई एका गौळणीत श्रीकृष्णाची स्तुतिगर्भ निंदा करते; कृष्णाशी अंग संग करण्यात कसलाही व्यभिचार नाही असे रूपक ती रंगवते.

पंडित कवींच्या काही गौळणीत अतिरिक्त शृंगार आढळतो. वामनपंडितांनी

रतिभावनेतून केलेला भक्तीचा आविष्कार अस्थानी वाटतो असे डॉ. वसंत जोशी मानतात. श्रीधरांच्या रासक्रीडेत शृंगारचेष्टांचा विलास आहे, तरःच ग्राम्य अश्लीलतेचाही प्रभाव आहे. मोरोपंतांच्या गौळणी यमक, अनुप्रास, कोटिक्रम व बुद्धिचातुर्य यांत प्रवीण आहेत.

होनाजी बाळा, रामजोशी, पठ्ठे बापूराव यांच्या गौळणींचेही सौंदर्यविशेष डॉ. जोशी यांनी रसिकपणे टिपले आहेत. प्रभाकराच्या तुलनेने राम जोशींच्या गौळणी अ-नागर व ग्राम्य वाटतात असे ते म्हणतात. स्त्रियांची छेड काढणारा उनाड गावगुंडच वाटावा असा रामजोशींचा कृष्ण आहे असे त्यांना वाटते. रामजोशींच्या छेकापन्हुतीचे वळण गिरवणाऱ्या होनाजी बाळाच्या गोपीही सुरतानंदाने श्रमून जातात आणि कृष्णाला त्यांच्या कंचुकी फाडण्यात गंमत वाटते. पठ्ठे बापूरावाची गौळण मराठमोळी आहे. चौऱ्यांशी तऱ्हेच्या चवी दाखव असा तिचा हट्ट आहे.

पु. शि. रेगे, ग. दि. माडगूळकर, मनमोहन, कृष्णा गुरव वगैरेंच्या काव्यातील राधा-कृष्ण प्रेमभावनेचा आविष्कारही लक्षणीय आहे. त्याचा निर्देशही वसंतरावांनी केला आहे. राधा हे लोकविलक्षण प्रेमभावनेचे प्रतीक आहे; ते नित्य नूतन रूप धारण करते. नवनवे आकृतिबंध धारण करून गौळणी मराठीत अवतरत राहतील असा आशावाद त्यामुळे बाळगणे अनाठायी ठरणार नाही.

उत्तरार्धामध्ये ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, रामजोशी, होनाजी, अमृतराय, माणिकप्रभू वगैरेंच्या ८३ गौळणी दिल्या आहेत. त्यामुळे गौळणी हा वाङ्मयप्रकार संहिता व समीक्षा या दोन्ही रूपांत ठसठशीतपणे वाचकांपुढे उभा राहतो.

या वाङ्मयप्रकाराचा साक्षेपाने मागोवा घेऊन, मराठीच्या अभ्यासकांपुढे एक समृद्ध दालन खुले केले याबद्दल डॉ. वसंतराव जोशी अभिनंदनास पात्र आहेत.

(मराठी गौळण : डॉ. वसंत स. जोशी. मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे ३०, पृष्ठे १०६, तीस रुपये.)

---

*** एका स्पृश्याची डायरी–** सदा कऱ्हाडे, लोकवाङ्मय गृह, भूपेश गुप्ता भवन, ८५, सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई-२५, २-१९९०, किंमत-२५/-.

## लेखसंग्रह

*** भरती ओहोटी–** जोशी श्री. ज., श्रीविद्या प्रका., २५० शनिवार पेठ, पुणे-३०, १-१९९०, पृ. १६१, किंमत-५०/-.

*** अतिशय गाजलेले लेख–** रघुवंशी रमेश, रघुवंशी प्रका. २४२ ब शुक्रवार पेठ, पुणे-२, पाने-१३९, किंमत-३६/-.

*** पालावरचं जग–** माने लक्ष्मण, श्रीविद्या प्रका. २५० शनिवार पेठ, पुणे-३०, १-१९९०, किंमत-६०/-, पाने-१८४.

*** झुंज आमदाराची**– युधिष्ठिर जोशी, नागेश कांगणे, अभिजित प्रका. गणेश पौर्णिमा ३० ब, पांडे ले आऊट, नागपूर-२५, १-१९९०, किंमत-२०/-, पाने-१३३.

*** सेनापती**– राजेश दर्यापूरकर, अभिजित प्रका. ३०ब, गणेश पौर्णिमा, पांडे ले आऊट, खामला नागपूर-२५, १-१९९०, किंमत-१५/-, पाने-५८.

*** विज्ञानाची गरूडझेप**– जयंत नारळीकर, श्रीविद्या प्रका. २५० शनिवार पेठ, पुणे-३०, १-१९९०, किंमत-५०/-, पाने-१३६.

*** आंबेडकरी चळवळ**– य. दि. फडके, श्रीविद्या प्रका. २५० शनिवार पेठ, पुणे-३०, १-१९९०, किंमत-६०/-, पाने-२१९.

*** विज्ञान आणि वैज्ञानिक**– जयंत नारळीकर, श्रीविद्या प्रका. २५० शनिवार पेठ, पुणे-३०, १-१९९०, किंमत-३५/-, पाने-१०५.

*** तिरकस आणि चौकस**– दिलीप पु. चित्रे, लोकवाङ्मय गृह, भूपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई-२५, १-१९९०, किंमत-५०, पाने-१५२.

*** गुरूदत्त**– भाऊ पाध्ये, लोकवाङ्मय गृह, भूपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई-२५, १-१९९०, किंमत-३०/-, पाने-६७.

*** प्रबोधन उद्यासाठी**– मुरलीधर गंधे, चेतश्री प्रका. मुक्ताई अंमळनेर (४२५४०१) १-१९९०, किंमत-८०.

*** छत्रपती संभाजी**– डॉ. जयसिंगराव पवार, मंजुश्री प्रका. 'शिवतेज' १०८, साने गुरुजी वसाहत, वाशी नाका, कोल्हापुर-११, १-१९९०, किंमत-२५०/-, पाने-५४४.

## समीक्षा

*** आधुनिक मराठी गद्याचे जनक**– डॉ. सौ. नलिनी मुळजकर, मोकाटे, श्री. एस. एस. मोकाटे सायंटिफिक इलेक्ट्रिकल्स, शालीबंडा, हैद्राबाद, ५००२६५ १-१९८९, किं- ६५/- पाने-१०६.

*** तीन अर्वाचीन कवी मार्क्सवादी दृष्टीकोण**– कुल्ली सं. त्र्यं., लोकवाङ्मय गृह, ८५, सयानी रोड, भूपेश गुप्ता भवन, प्रभादेवी, मुंबई-२५, १-१९८९, पृ. १५०, किंमत-५०/-.

*** मनुष्याची ज्ञानसाधना**– संत दु. का., पुणे विद्यार्थी गृह प्रका., १७८६ सदाशिव पेठ, पुणे-३०, किंमत-६०/-, पाने-२४८.

*** कुसुमाग्रज-शिरवाडकर एक शोध**– डॉ. दत्तात्रय पुंडे, मेहता पब्लिशिंग हाऊस, १२१६ सदाशिव पेठ, पुणे-३० १-१९८९, किंमत-६०/-, पाने-१९६.

*** प्रश्नशोध**– केशव मेश्राम, लोकवाङ्मय गृह, भूपेश गुप्ता भवन, ८५, सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई-२५, १-१९८९, किंमत-५०/-, पाने-१६७.

*** नव्या वाटा नवी वळणे**– बी. रंगराव, सुगावा प्रका. ८६१/१ सदाशिव पेठ,











पुणे-३०, १-१९८९, किंमत-२०/-, पाने-६९.

*** मराठी विनोद–** कुलकर्णी उषा ; श्रीविद्या प्रका. २५० शनिवार पेठ, पुणे-३०, १-१९९०, किंमत-२००/-, पाने-५००.

*** रंगतरंग–** बापट सुहास भालचंद्र, पॉप्युलर ३५ सी. पं. मालवीय मार्ग, ताडदेव, मुंबई-३४, १-१९९०, किंमत-८०/-, पाने- २०२.

### नाटक

*** वंश-पाऊलखुणा–** जयंत पवार, अभिनव प्रका., ५३ गुरू नानक मार्केट, डॉ. आंबेडकर रोड, दादर, मुंबई-१४, १-१९८९, किंमत-१५/-, पाने-७९.

*** मिठू मिठू पोपट आणि सुतक–** चित्रे दिलीप पुरुषोत्तम, साकेत प्रका. ११५, म. गांधीनगर स्टेशन रोड, औरंगाबाद-५, १-१९८९, किंमत-३५/-, पाने-७४.

*** संगीत रक्षाबंधन–** ग. स. ठोसर, १०९५ सदाशिव पेठ, पुणे-३०, १-१९८९, किंमत-१०/-, पाने-४६.

### भाषाशास्त्र

*** धन्यालोक–** संपा– पु. ना. वीरकर, मा. वा. पटवर्धन, महाराष्ट्र राज्य, साहित्य आणि संस्कृति मंडळ मंत्रालय, मुंबई-३२, १-१९८९, किंमत-९०/-, पाने-७०१.

### विज्ञान

*** विज्ञानविहार –** कोगेकर ना. वा., उत्कर्ष प्रका. रेणुका अपार्टमेंट, पुणे-४, १-१९९०, किंमत-२५/-, पाने-१२३.

*** विज्ञान कुतूहल–** जगदीश काबरे, अरविंद कुलकर्णी, लोकवाङ्मय गृह, भूपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई-२५, १-१९९०, किंमत-२५/-, पाने-८५.

### प्रवास वर्णन

*** पंडिता रमाबाई यांचा इंग्लंडचा प्रवास–** पंडिता रमाबाई, महाराष्ट्र राज्य साहित्य सं. मंडळ, नवीन प्रशासन भुवन, मुंबई-३२, २-१९८८, किंमत-२१/-, पाने-७७.

*** ज्ञानेश्वरी स्वरूप दर्शन–** संपा– हे. वि. इनामदार, चंद्रमा प्रका. १५४, शोभानगर सोसा. सहकारनगर, पुणे-९, १-१९९०, किंमत-५०/-, पाने-१४४.

### आरोग्य

*** लठ्ठपणातील आहार आणि प्रकार–** डॉ. प्रकाश परांजपे, सौ. सिंधुताई

साठे, श्रीविद्या प्रका. २५० शनिवार पेठ, पुणे-३०, १-१९८९, किंमत-३५/-, पाने-७०.

### कथासंग्रह

* **ओझं–** मेधा जोशी, सुपर्ण प्रका., १५५२ चिमणबाग, सदाशिव पेठ, पुणे-३०, १-१९८५, किंमत-१४/-, पाने-८७.

* **आणखी पूर्वज–** वि. ग. कानिटकर, श्री विद्या प्रका, २५० शनिवार पेठ, पुणे-३०, १-१९९०, किंमत-४०/-, पाने-१२३.

* **सुगरनीचा खोपा–** प्रतिमा इंगोले, साहित्यसेवा प्रका. औरंगपुरा, औरंगाबाद, १-१९८९, किंमत-३५/-, पाने-७९.

* **डॉगव्हॅन–** राजा राजवाडे, लोकवाङ्मय गृह, भूपेश गुप्ता भवन, ८५, सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई-२५, १-१९८८, किंमत-३०/-, पाने-२०३.

* **संख्यानगरीचा फेरफटका–** सुरेश शंकर बल्लाळ, अभिजित प्रका. ३०ब, गणेश पौर्णिमा, पांडे ले आऊट, खामला, नागपूर-२५, १-१९८९, किंमत-१५, पाने-३२.

* **विद्यापती–** पं. राघवेंद्र पगडी, प्रपंच प्रका. माधव कानिटकर, ३८९ शनिवार पेठ; पुणे-३०, १-१९९०, किंमत-५०/-, पाने-२००.

---

### पुण्यातील नवे आजीव सदस्य (३० एप्रिल १९९० अखेर)

श्रीमती प्रभा वझे, श्रीमती सुलभा अजय देउस्कर, श्री. वि. द. कुलकर्णी, श्री. वि. रा. जोशी, श्री. रमण रणदिवे, श्रीमती स्नेहल लिखिते, सौ. माधुरी मु. क्षीरसागर, श्री. चिं. वि. करंबेळकर, श्रीमती आरती सु. चित्रे, श्री. सुहास शिरवळकर, श्रीमती सुधा मु. नरवणे, श्री. मा. रं. देव, श्री. कल्याण भ. लंकेश्वर, कु. ममता द. उपगडे, कु. शुभांगी वि. काळे, श्री. प्र. ग. पाटणकर, श्री. सु. य. पतकी, श्री. कृ. रा. दामले. श्री. सु. ग. थोरात, (सायगाव पुणे), श्री रामकृष्ण मोरे, श्री. भालचंद्र म. गुप्ते, कु. विदुला वि. कीर्तने, श्री. अशोक के. पाटेकर, कु. सुनिला वि. रानडे, श्री. शरद वा. टेंबे, श्री. शिरीष ग. जोशी, श्री. प्र. भा. दाते, श्री. अ. वि. साबळे, श्रीमती शकुंतला क्षीरसागर, श्री. अ. दि. कोकड, श्री. मा. दा. देवकाते, सौ. शोभा वा. कर्वे.

### नवे आजीव सदस्य
(३० एप्रिल १९९० पर्यंत)

सौ. शोभना जोशी (पिंपरी), श्री. अ. बु. कदम (गिरवी), श्री. वि. पा. देशमाने (सोलापूर), श्री. आबा धुमाळ (सोलापूर), श्री. प्रेमचंद वा. मेने (सोलापूर), श्री. रा. वा.

पडवळ (परेल-मुंबई), श्री. दि. व. पाटील (जळगाव), श्री. तुकाराम नाईक (सावंतवाडी), श्री. मा. गं. गंगापूरकर (येवला), श्री. र. या. गेडाम (येवला), श्री. वि. पां. लुटे (येवला)

### मालेगाव

श्री. अ. बा. आवलगावकर, सौ. मृदुला र. महाशब्दे, सौ. उषा ज. गावडे, श्री. रा. मो. मोरे, श्री. म. ल. सरोदे, श्री. दिलीप भामरे, श्रीमती तायाबाई पवार, श्री. श्री. अ. पारिपत्यवार, सौ. शोभा अ. बडवे, श्री. र. भा. वालवडकर, श्री. ध. श्रा. पवार.

### लासलगाव

श्री. र. पानगव्हाणे, श्री. व. आ. संगवे, श्री. रा. द. होळकर, श्री. हरिभाऊ राणा, डॉ. अरुण काळे, श्री. न. र. राणा, श्री. ओ. बा. ब्रह्मेचा, डॉ. रा. भा. मलोसे, श्री. मो. बा. बोरसे, श्री. व. बा. सोनवणे,

श्री. शिवाजी गावडे (ठाणे), डॉ. सुरेश दा. जोशी (देवरुख), श्री. ब. मु. पवार (नासिकरोड), श्री. पु. मा. कालभुत (वरोरा), श्रीमती विजया द. खडपेकर (विलेपार्ले), श्री. डॉ. श्रीराम म. भातखंडे (ठाणे), श्री. जोशी दि. द. (कळवा, ठाणे), श्री. बाळ हरी झेंडे (ठाणे), श्री. वि. गं. भागवत (सावंतवाडी), श्री. चंद्रभूषण कुलश्रेष्ठ (सोलापूर), सौ. लीला माढेकर (सोलापूर), सौ. अंजली पटवर्धन (सोलापूर), श्री. नागेश बा. सुरवसे (सोलापूर), प्रा. विलास शि. पाटील (सोलापूर), प्रा. गणेश आवटे (जिंतूर), श्री. श्रीकांत वाड (ठाणे), डॉ. सौ. रजनी शा. नारखेडे (जळगाव), श्री. वाणी (जळगाव), डॉ. प्रभाकरसिंह राजपूत (जळगाव), सौ. विनीता ऐनापुरे (डोंबिवली), श्री. नि. के. मालाडकर (पिंपरी), श्री. शम्मी चौधरी (दापोडी), सौ. विमल कवडे (अहमदनगर), श्री. ना. व्यं. देशपांडे (कोल्हापूर), श्री. ज. पा. पाटील (कामथे, चिपळूण), श्री. भास्कर फ. पाटील (जळगाव), श्री. अ. ह. वाकडे (आरफळ), श्री. रविप्रकाश कुलकर्णी (डोंबिवली), सौ. जयश्री गो. कुलकर्णी (धुळे), श्री. चंद्रशेखर सु. खैरनार (धुळे), सौ. लीला देवरे (धुळे), श्रीमती प्रिया वि. तेंडुलकर (मुंबई), श्री. अ. वि. कांबळे (श्रीरामपूर), श्रीमती मंगला रा. काजळे (श्रीरामपूर), वामन देशपांडे (मुंबई).



अनुक्रमणिका

# ग्रंथपारितोषिके (१९८९)

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दरवर्षी देण्यात येणाऱ्या विविध पारितोषिकांसाठी १९८९ सालाकरिता निवडलेली पुस्तके

१) हरि नारायण आपटे पारितोषिक (कादंबरी) रु. १००/-
**शोधयात्रा : अरुण साधू (मॅजेस्टिक प्रकाशन, पुणे)**

२) वा. म. जोशी पारितोषिक (कादंबरी) रु. १०००/-
**एम. टी. आयवा मारु : अनंत सामंत (मॅजेस्टिक प्रकाशन, पुणे)**

३) यशवंत पारितोषिक (काव्य) रु. ५०१/-
**यात्री : सुधांशू (दिलीपराज प्रकाशन, पुणे)**

४) कुसुमाग्रज पारितोषिक (काव्य) रु. १२००/-
**मंझधार : अनुराधा पोतदार (सुरेश एजन्सी, पुणे)**

५) चि. वि. जोशी पारितोषिक (विनोदी) रु. १२००/-
**पुन्हा झुळूक : मंगला गोडबोले (मेनका प्रकाशन, पुणे)**

६) ह. स. गोखले पारितोषिक (कविता) रु. ३००/-
**पीकपाणी : इंद्रजित भालेराव (मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे)**

७) कै. आनंदीबाई शिर्के पारितोषिक (कथा) रु. १०००/-
**लांडगा : राजेंद्र बनहट्टी (श्री विशाखा प्रकाशन, पुणे)**

८) नी. स. गोखले पारितोषिक (कथा) रु. ३००/-
**सुगरनीचा खोपा : प्रतिमा इंगोले (साहित्य सेवा प्रकाशन, औरंगाबाद)**

९) अ. स. गोखले पारितोषिक (उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती) रु. ३००/-
**पहाटेपूर्वीचा काळोख : कमलेश**
**(प्रकाशक :- सौ. रश्मी किशोर सोमण, पुणे)**

१०) गिरजा गंगाधर पारितोषिक (उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती) रु. ३००/-
**तिमिरभेद : डॉ. अंजली सोमण (मनोविकास प्रकाशन, मुंबई)**

११) ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक (संपादित ग्रंथ) रु. १००/-
**आदिबंधात्मक समीक्षा : डॉ. म. सु. पाटील (नीहारा प्रकाशन, पुणे)**

१२) तुळशीराम वाघ पारितोषिक (संतवाङ्मय) रु. २५०/-
**संत ज्ञानेश्वरांचा भक्तियोग : डॉ. शंकर अभ्यंकर (आदित्य प्रतिष्ठान)**

१३) सुशीलप्रधान पारितोषिक (कुमार वाङ्मय) रु. २००/-

**विज्ञानकथा : अविनाश कोलारकर (सन पब्लिकेशन्स, पुणे)**

१४) विनायक कोंडदेव ओक पारितोषिक (कुमार वाङ्मय) रु. १००/-

**रहस्यमय ग्रीन हाऊस : आशा भाजेकर (राजा प्रकाशन, मुंबई)**

१५) शि. म. परांजपे पारितोषिक रु. २५०/-

**गतशतक शोधताना : स. गं. मालशे (प्रतिमा प्रकाशन, पुणे)**

१६) ना. गो. चापेकर पारितोषिक – रु. २५०/-

**विसाव्या शतकातील महाराष्ट्र, खंड २ : य. दि. फडके (श्रीविद्या प्रकाशन, पुणे)**

१७) विश्वनाथ-पार्वती गोखले पारितोषिक – रु. १५०/-

**नव्या वाटा, नवी वळणे : बी. रंगराव (सुगावा प्रकाशन, पुणे)**

१८) श्री. शां. हणमंते पारितोषिक – रु. ३५०/-

**क्रीडा ज्ञानकोश : डॉ. सुरेशचंद्र नाडकर्णी (गंधर्ववेद प्रकाशन, पुणे)**

१९) गणेश सरस्वती ठाकूरदेसाई पारितोषिक – रु. ५००/-

**जाती आणि जमाती : रामनाथ नामदेव चव्हाण (मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे)**

२०) गणेश सरस्वती ठाकूरदेसाई पारितोषिक – रु. ४००/-

**महात्मा फुलेंची बदनामी-एक सत्यशोधन : हरि नरके (सुगावा प्रकाशन, पुणे)**

२१) लोकहितवादी देशमुख पारितोषिक – रु. ७५/-

**स्वातंत्र्यवीर सावरकर एक रहस्य : डॉ. द. न. गोखले (मौज प्रकाशन, मुंबई)**

२२) कै. श्रीमंत रा. ना नातू पारितोषिक – रु. ७५०/-

**रमाबाई : जोत्स्ना देवधर (पॉप्युलर प्रकाशन, मुंबई)**

पारितोषिकांचा निर्णय करण्यासाठी परीक्षक म्हणून पुढील व्यक्तींनी काम केले :–

श्री. मो. रा. वाळंबे, डॉ. द. दि. पुंडे, डॉ. कल्याणी दिवेकर,
डॉ. हे. वि. इनामदार, डॉ. प्र. लं. गावडे, डॉ. विलास खोले,
श्री. कमल देसाई, डॉ. वि. भा. देशपांडे, श्री. श्रीधर राजगुरु, श्री. दत्ता टोळ,
श्री. चिंतामणी लाटकर, डॉ. वि. म. कुलकर्णी, श्री. हेमंत जोगळेकर
आणि
डॉ. वीणा देव (निमंत्रक)



अनुक्रमणिका

# श्रद्धांजली

---

## गो. प. नेने

महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभेचे एक अध्वर्यू गांधीवादी कार्यकर्ते गो.प. नेने यांचे वयाच्या ७६ व्या वर्षी दिनांक ६ मे ९० रोजी हृदयविकाराने निधन झाले. राष्ट्रभाषेच्या प्रचार आंदोलनाचा इतिहास, शब्दकोश, बालवाङ्मय वगैरे लेखन करून त्यांनी हिंदीची सेवा केली. हिंदी-मराठी दोन्ही भाषांवर त्यांचे प्रभुत्व होते.

## विनायक राजगुरू

तीन पानी डाव (कादंबरी), चेंगीझखान (चरित्र) वगैरे पुस्तकांचे लेखक आणि गुळाचा गणपती, दूधभात या चित्रपटांचे निर्माते विनायक श्रीपाद राजगुरू यांचे वयाच्या ६४व्या वर्षी अमेरिकेतील बेकर्सफिल्ड येथे निधन झाले. (१० मे, १९९०). १९४२च्या स्वातंत्र्य लढ्यात त्यांनी भाग घेऊन कारावास सोसला. गेली ३५ वर्षे त्यांचे वास्तव्य परदेशातच होते. सकाळ व केसरी यात त्यांची वार्तापत्रे प्रसिद्ध होत. कलाकार, ओसाडगाव वगैरे अनुवादित पुस्तकेही त्यांच्या नावावर आहेत.

## प्र. बा. जोग

पुण्यातील एक वादग्रस्त व्यक्तिमत्त्व प्र. बा. जोग हे वयाच्या ६९ व्या वर्षी (दि. २९ एप्रिल ९०) निधन पावले. मी हा असा आहे, मी हा असा भांडतो आणि खुल्लम खुल्ला ही मराठी पुस्तके व फंटॅस्टिक जोग हे इंग्रजी पुस्तक यात त्यांच्या लेखणीचा स्वैरसंचार दिसतो. त्यांचे वक्तृत्व परखड असे आणि अनेकांची ते करमणूक करणारे असे.

## विष्णु हरी इनामदार

म. सा. प.चे उपाध्यक्ष डॉ. हेमंत इनामदार यांचे वडील आणि वैष्णव रामायण या ग्रंथाचे कर्ते विष्णु हरी इनामदार यांचे वार्धक्यामुळे निधन झाले. (१३ जानेवारी, १९९०)



अनुक्रमणिका

## बालमुकुंद प्रभू

सुप्रसिद्ध स्फूट लेखक बालमुकुंद प्रभू (७०) यांचे मधुमेहाच्या विकाराने निधन झाले. (एप्रिल ९०)

४५ वर्षे वेगवेगळया वृत्तपत्रातून, साप्ताहिकातून आणि मासिकांतून ते सातत्याने लेखन करीत असत. पूर्वीच्या 'चित्रा', 'तारका', 'प्रमोद', वगैरे साप्ताहिकांत व अन्य मासिकांतून विविध विषयांवरचे त्यांचे लेख प्रसिद्ध होत असत. 'मार्मिक'मध्ये त्यांचे विपुल लेखन प्रकाशित झाले आहे.

काही काळ विनोबा भावे यांच्याबरोबर भूदानाच्या कार्यातही ते सामील झाले होते. ज्ञानेश्वरी, भगवद्‌गीता या ग्रंथांवर अधिकारवाणीने प्रवचन करणारे म्हणून त्यांची ख्याती होती.

राजकारणापासून अलिप्त राहून निःस्वार्थीपणे ज्ञानदानाचे व ज्ञानोपासनेचे कार्य एकांड्या शिलेदारी वृत्तीने त्यांनी आयुष्यभर केले.

## अविनाश राम कोलारकर

सुप्रसिद्ध कथा-संपादक राम कोलारकर यांचा तरुण पुत्र अविनाश कोलारकर याचे १० जानेवारी १९९० रोजी पुण्यात निधन झाले. वय होते अवघे एकवीस. कांगारू हा बालगीत संग्रह, विज्ञानकथांचे चार भाग, कोंबडीची पिसे हा विनोदी कथासंग्रह वगैरे पुस्तके प्रसिद्ध झालेली आहेत. सात वर्षे पाठीच्या कण्याच्या आजारामुळे अविनाश हा अंथरुणाला खिळून होता; आणि लेखन हाच त्याचा विरंगुळा होता. डॉन क्विक्झोट हे त्याचे आवडते पुस्तक. त्या पुस्तकाचा प्रभाव त्याच्या सर्वच लेखनात जाणवतो. डॉन क्विक्झोट व त्याचा सेवक सांचो पांझा यांच्या दाट मैत्रीमुळेच की काय, आसन्नमरण अवस्थेतही अविनाशच्या लेखनात हास्य खळखळतच राहिले.

## धर्मेश सोनटक्के

दलित रंगभूमीवरील एक प्रथितयश नट व धडाडीचे सामाजिक कार्यकर्ते धर्मेश सोनटक्के यांचे ऐन तरुण वयात ४ मार्च १९९० रोजी अपघाती निधन झाले.

या सर्वांना आमची श्रद्धांजली

— संपादक



अनुक्रमणिका






# यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान, मुंबई
## यांची प्रकाशने

प्रबोधन कार्यास चालना देणारे खालील ग्रंथ सर्व संस्था आणि राजकीय व सामाजिक कार्यकर्त्यांकडे असायलाच पाहिजेत.

**१. पंचायत राज्य, जिल्हा नियोजन आणि ग्रामीण विकास : परिसंवाद**

मुंबईत झालेल्या परिसंवादावर आधारित आणि प्राचार्य पाटील समितीच्या शिफारशींची साधकबाधक चर्चा करणारा अप्रतिम छपाई, उत्तम संपादन, छायाचित्रांसह ३५४ पानी पुठ्ठा बाइंडिंग ग्रंथ रु. १००/-

**२. यशवंतराव चव्हाण यांचे मौलिक विचार :**

(संपादक : कविवर्य ना. धों. महानोर.)

पॉकेट बुक साइझ, मुलांना वाढदिवशी व शाळांतून बक्षिस समारंभ प्रसंगी देण्यासाठी तसेच नवसाक्षरांना उत्तम वाचनीय बहुगुणी छोटे पुस्तक रु. ३.५०/- पाने ३२.

**३. बेकारी निर्मूलनातून ग्रामीण विकास :**

(संपादक : वि. स. पागे)

रोजगार हमी योजनेच्या प्रारंभापासूनच इतिहास, बेकारांसाठी उपलब्ध विविध व्यवसाय योजनांची आणि शासनातर्फे मिळू शकणाऱ्या विविध सहाय्यांची माहिती देणारा परिपूर्ण ग्रंथ. पाने १७२ मूल्य रु. ३५/-

**४. समाज परिवर्तन :**

लेखक : प्राचार्य. पी. बी. पाटील

वैचारिक गोंधळ दूर करून सामाजिक प्रबोधनाचे शत्रू व मित्र कोण आहेत हे ओळखण्याचे रहस्य प्रकट करणारा निबंध संग्रह.

**५. महाराष्ट्रातील दुष्काळ आणि जलसंपत्तीचे नियोजन : परिसंवाद**

'दुष्काळ व पाणी' ह्या परिसंवादात सादर झालेले निबंध, त्यावेळी घडलेली उद्बोधक चर्चा, निवडक मूलग्राही प्रश्नोत्तरे, महाराष्ट्राशी संबंधित ८ खास तयार करून घेतलेले नकाशे, अवर्षण व पाणीविषयक महाराष्ट्रातील आयोगांचा गोषवारा इ. आणि जल आणि

भूमी व्यवस्थापनाशी संबंधित संशोधकांचे विशेष निबंध. श्री. अण्णासाहेब शिंदे, भूतपूर्व शेतीमंत्री, केंद्र सरकार यांच्या कुशल संपादनाखाली तयार केलेला संग्राह्य ग्रंथ.

पाने ४०४ + ८ नकाशे मूल्य रु. १६०/-

**६. माननीय शरद पवार ह्यांची संस्मरणीय २० भाषणे**

साहित्य, शेतीप्रश्न, ग्रामीण आर्थिक प्रश्न, रंगभूमी, चित्रपट, नाटके, साहित्य नवे ग्रंथ अशा सारख्या विषयांवरील रसीले विचार.

पाने २०८ व छायाचित्रे : मूल्य रु. ७५/-

## आगामी

**७. महाराष्ट्रातील महिला मुक्ती आंदोलनाचा आढावा**

(प्रबोधनाचा इतिहास) (१८१८ ते १९८५ पर्यंत)

डॉ. ज्ञानदा नाईक ह्यांच्या संशोधनातून साकार होत असलेला संग्राह्य ग्रंथ.

पाने अंदाजे २०० मूल्य : ६०/-

**८. यशवंतरावांची मराठी भाषणे (१९४६ ते १९६२)**

मुंबई विधी मंडळ व महाराष्ट्र राज्यातील विधानसभेतील महत्त्वाच्या प्रश्नांवरील १५० भाषणे. यशवंतराव चव्हाण जीवन संशोधन केंद्रातर्फे संशोधित ग्रंथ

संपादक : डॉ. वि. गो. खोबरेकर

पाने १६० उत्तम पुठ्ठा बाइंडिंग अंदाजे किंमत रु. १६०/-

**९. यशवंतराव चव्हाण यांची इंग्रजी भाषणे : भाग १. :**

इंग्रजीमध्ये दिलेल्या ३९० भाषणांच्या आधारे, तयार होत असलेला ग्रंथ.

पाने अंदाजे ४४८ (ऑक्टोव्हो साइझ) उत्तम बाइंडिंग,

अंदाजे मूल्य रु. २४०/-

**यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान प्रकाशन - ग्रंथप्रेमी सदस्य व्हा आणि** ग्रंथ ५० टक्के सवलतीत मिळवा. रु. ५०/- सदस्य फी.

संस्था, रचनात्मक ग्रामीण कार्यकर्ते ह्यांना विशेष सूट, ग्रंथविक्रेत्यांना विशेष सूट.

आजच संपर्क स्थापित करा :

प्रकाशन विभाग,

**यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान**

प्लॉट नं. ७ व ९ जनरल जगन्नाथ भोसले मार्ग,

सचिवालय जिमखान्यास लागून, मुंबई ४०० ०२१.

दूरध्वनी : मुंबई २०२८५९८.

अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ

# शुद्ध लेखन – प्रश्नावली

मराठी साहित्य महामंडळाचे लेखनविषयक नियम गेली सुमारे तीस वर्षे प्रचारात आहेत. या लेखन-नियमांच्या संदर्भात अनेक अभ्यासकांनी वेळोवेळी उलटसुलट मतप्रदर्शन केले आहे. अलिकडेच महामंडळाने एक शुद्धलेखन-समिती नियुक्त केली असून या प्रश्नांची साकल्याने चर्चा करून ही समिती सध्याच्या नियमांचा पुनर्विचार करणार आहे. मराठी भाषा व शुद्धलेखन यांसंबंधी आस्था व अभ्यास असणाऱ्या सर्वांनी या प्रश्नासंबंधीचे आपले विचार महामंडळाकडे त्वरित पाठवावेत, अशी विनंती आहे. अभ्यासकांच्या सोयीसाठी एक प्रश्नावली तयार केली आहे, ती अवश्य मागवून घ्यावी, असे महामंडळाचे कार्यवाह डॉ. गं. ना. जोगळेकर कळवितात. पत्रव्यवहारासाठी पत्ता : डॉ. गं. ना. जोगळेकर, निमंत्रक, शुद्धलेखन समिती, अ.भा.मराठी साहित्य महामंडळ, द्वारा– महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

(विनंती : स्वतंत्र कागदावर एकेक प्रश्न व त्याचे उत्तर असा क्रम कृपया ठेवावा.)

१. महामंडळाचे शुद्धलेखनाचे प्रचलित नियम समाधानकारक आहेत काय? नसल्यास, कोणकोणत्या बाबतीत सुधारणा होणे आवश्यक आहे असे आपणांस वाटते? का?

२. “ऱ्हस्व – दीर्घ” याबद्दल मराठी लेखनात कोणते तत्त्व अनुसरावे असे आपणांस वाटते?

३. अनुस्वारांच्या लेखनाबद्दल कोणते धोरण अनुसरावे असे आपणांस वाटते?

४. “तत्सम” शब्दांचे मराठी लेखन करताना कोणती भूमिका असावी असे आपणांस वाटते? “तत्सम” या संज्ञेत केवळ संस्कृतचा अंतर्भाव करावा की अन्य भाषांचाही?

५. लेखन उच्चारानुसारी असावे असे आपणांस वाटते का? नसल्यास का नाही?

६. परसवर्णांच्या लेखनाच्या बाबतीत काय धोरण असावे असे आपणांस वाटते? परसवर्णांचा विकल्प ठेवावा की ठेवू नये?

७. जोडाक्षरांच्या लेखनाबाबत कोणते धोरण असावे असे आपणांस वाटते? उदाहरणार्थ, खालीलपैकी कोणते लेखन आपणांस योग्य वाटते? का? (क्रम – क्‍रम – क्रम – क्‌रम), (शुद्ध, शुद्‌ध) (सल्ला, सल्ला, सल्‌ला) (भक्त, भक्त, भक्‌त)

८. दंतमूलीय व्यंजने (उदा– चमचा, जहाज, झरा) आणि तालव्य व्यंजने (उदा– चमत्कार, विजय, झकू) यांसाठी सध्या एकच लेखनचिन्ह वापरले जाते. ही स्थिती बदलावी असे आपणांस वाटते काय? असे असल्यास कोणत्या उच्चारांसाठी कोणती वेगळी चिन्हे आपण सुचवू इच्छिता?

९. व्याकरणविषयक घटकांना लेखननियमांत स्थान द्यावे असे आपणांस वाटते काय? (उदा– अनेकवचन, सामान्यरूप, सामासिक शब्द इ.) असे स्थान देऊ नये असे आपणांस वाटत असल्यास त्याची कारणे कोणती?

१०. मराठी लेखनाच्या दृष्टीने देवनागरी लिपीत काही बदल (किंवा सुधारणा) करणे आपणांस आवश्यक वाटते काय? असल्यास कोणकोणते बदल आपण सुचवू इच्छिता?

११. मराठीसाठी रोमन लिपीचा स्वीकार करावा असा काहीजणांचा प्रयत्न आहे. यासंबंधी आपली भूमिका काय आहे? रोमन लिपीचा स्वीकार करावा किंवा करू नये असे आपले मत असल्यास त्याची कारणे कोणती?

१२. लेखनाच्या नियमांत काही बदल (किंवा सुधारणा) केल्यास नवे नियम किमान किती काळ राबवावेत, असे आपणांस वाटते?

१३. प्रश्नावलीतील वरील कलमाखेरीज आपणांस शुद्धलेखन, देवनागरी लिपी इ. बाबतीत काही सुचवावयाचे आहे काय? (कृपया आपल्या सूचना तपशीलवार द्याव्या.)

०

## शाश्वत साहित्य माला वर्गणीदार अर्ज

शुभदा-सारस्वत प्रकाशन
६७ पाटील इस्टेट, पुणे ४११००५.

स.न.वि.वि.

मी / आम्ही 'शाश्वत साहित्य माला' या योजनेचे माहिती पत्रक वाचले असून त्या योजनेचा वर्गणीदार होऊ इच्छितो/इच्छिते. वर्गणी रु. १००/- रोखी/*चेकने भरत आहे/आहोत. रु. २००/- दर्शनी किंमतीच्या निवडलेल्या पुस्तकांची यादी सोबत जोडत आहे/आहोत.

रु. २५/- रोखी/*चेकने पाठवीत आहे.

आपला / आपली

नाव ______________________________

पत्ता ______________________________

______________________________

चेक / क्र. ______________________________

*पुण्याबाहेरील चेक्स रु. ५/- वटवणावळीसह रु. १०५/- अगर रु. ३०/- चे करावेत.

Maharashtra Sahitya Patrika Regd. No. 6398/57




**म. म. दत्तो वामन पोतदार**

**जन्मशताब्दी वर्ष आदरांजली**

**जन्म : ५ ऑगस्ट १८९०] [मृत्यू : ६ ऑक्टोबर १९७९**

मुद्रक - प्रकाशक - राजा फडणीस, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळकरस्ता, पुणे ४११ ०३०. फोन — ४४ २९ ६३